

उज्वल भवितव्यासाठी

# ओंकार ट्रस्ट

स्थापना २६ जुलै १९९१


'विसावा' अनिकेत सोसायटी नं. १,
बिबवेवाडी, पुणे - ४११ ०३७.
दूरध्वनी क्रमांक : २४२१ ००४७




॥ श्रीराम ॥

सप्रेम नमस्कार

श्री समर्थ रामदास स्वामी व स्वामी विवेकानंद आदि थोर सत्पुरुषांच्या शिकवणी व तत्वज्ञानापासून प्रेरित होऊन 'ओंकार ट्रस्ट' या संस्थेची स्थापना गुरुपौर्णिमा या शुभदिनी - दिनांक २६ जुलै १९९१ रोजी करण्यात आली. (रजि. क्र. इ. १५०५, दि. १०-१०-१९९१)

देणगीदारांना ८० ग अन्वये प्राप्तीकरांत सूट मिळते.

आमच्या न्यासाच्या उद्दिष्टाप्रमाणे - सामाजिक बांधिलकीस्तव विविध उपक्रम ''विनामूल्य'' राबविले जातात, त्यापैकी महत्वाचे काही उपक्रम पुढील प्रमाणे -

१) गुजरवाडी - निंबाळकरवाडी (कात्रजपासून पुढे ५ कि.मी. अंतरावर ग्रामीण भागात) येथे न्यासातर्फे मुले-मुलींसाठी संस्कार वर्ग घेण्यात येतो.

२) मांगडेवाडी ( कात्रजपासून सुमारे ३ कि.मी.) येथे जिल्हा परिषद शाळेतील मुला-मुलींसाठी संस्कार वर्ग आयोजित केला जातो.

३) कर्वे स्त्री शिक्षण संस्था येथील इयत्ता आठवीतील निवासी मुलींसाठी (सुमारे १८० मुली) संस्कार वर्ग घेतला जातो.

४) डॉ. पारस शहा यांचे नेतृत्वाखाली आतापर्यंत निरनिराळ्या वर्षी आठ नेत्र चिकित्सा शिबिरे गरीब व गरजू व्यक्तींसाठी घेण्यात येवून गरजूंना औषधे व चष्मे मोफत देण्यात आली.

५) तसेच न्यासाने कॅन्सर चिकित्सा शिबीर - मांगडेवाडी येथे, मधुमेह चिकित्सा शिबीर - बिबवेवाडी पुणे येथे व सर्वसाधारण रोगनिदान शिबीर - गुजरवाडी-निंबाळकरवाडी येथे आयोजित केली आहेत.

६) उत्कृष्ट सामाजिक कार्य करणाऱ्या व्यक्तिला अथवा संस्थेला ''वसुंधरा कृतज्ञता'' (न्यासाच्या संस्थापिकेच्या नांवाने) पुरस्कार गेली १२ वर्षे देण्यात येत आहे. या पुरस्काराचे स्वरुप मानपत्र, स्मृतिचिन्ह व रोख रक्कम रु.५०००/- असे आहे. पुरस्कार देण्यात आलेल्या व्यक्ति-संस्था - १) डॉ. स्वर्णलता भिशीकर-सोलापूर २) प्रा. डॉ. अशोक कामत-पुणे ३) समर्थ भक्त सुनीलजी चिंचोलकर-पुणे ४) द्वा. वा. केळकर - पुणे ५) डॉ. सुनीलकुमार लवटे - कोल्हापूर ६) सौ. सिंधूताई सपकाळ - ता. पुरंधर (जि. पुणे) ७) डॉ. पारस शहा - पुणे ८) श्री. श्रीकांत मुंदडा - पुणे ९) श्री. गिरीष यशवंत प्रभुणे - चिंचवड १०) मानव्य संस्था - (संस्थापिका - कै. विजयाताई लवाटे) पुणे ११) डॉ. राजा व सौ. रेणूताई दांडेकर - ता. दापोली (जि. रत्नागिरी) १२) आपल घर (संस्थापक - श्री. विजयजी व सौ. साधनाताई फळणिकर)

७) न्यासाने मराठी व इंग्रजी हस्ताक्षर सुधार प्रकल्प श्री. नानासाहेब लाभे, नागपूर यांचे मार्गदर्शनाखाली ६ वर्षांच्या कालावधीत सुमारे ३५ शाळांमधून

घेतला व त्याचा फायदा सुमारे १०,००० पेक्षा जास्त विद्यार्थ्यांना झाला.

८) न्यास वेळोवेळी आध्यात्म, संतविचार इ. करिता थोरामोठ्यांची प्रवचने / व्याख्याने आयोजित करते. समर्थ भक्त श्री. सुनीलजी चिंचोलकर यांची श्री. एकनाथ महाराज यांचे चिरंजीव काव्य या विषयावर ३ प्रवचने आयोजित करण्यात आली होती.

तसेच यावर्षी ''यांनी घडविला महाराष्ट्र'' या विषयांवर अधिकारी व्यक्तिंची व्याख्याने आयोजित केली होती.

क्रांतीकारक - श्री. निनाद बेडेकर

समाजसुधारक - डॉ. सदानंद मोरे

संतांचे कार्य - डॉ. यशवंत पाठक

याशिवाय डॉ. यशवंत पाठक, प्रमुख - ज्ञानदेव अध्यासन, पुणे विद्यापीठ, पुणे यांनी १) येणे वाग्यज्ञे तोषावे - श्री ज्ञानेश्वर महाराज २) एका जनार्दनी शरण - श्री एकनाथ महाराज ३) उत्कट भव्य तेचि घ्यावे - श्री समर्थ रामदास स्वामी या विषयांवर ३ दिवसांची प्रवचन माला गुंफली.

९) न्यास दरवर्षी खालील शिष्यवृत्या - पारितोषिके देत आहे -

१) हुशार व गरीब विद्यार्थीनीला उच्च शिक्षणासाठी रु. ५०००/- ची शिष्यवृत्ती कै. नलिनी विष्णू जोगळेकर यांचे नावाने, त्यांचे बंधु श्री. गजानन विष्णू जोगळेकर यांनी दिलेल्या देणगीतून देण्यांत येते.

२) श्रीमती मृणालिनी अशोक जोगळेकर यांनी त्यांचे पती कै. श्री. अशोक विष्णू जोगळेकर यांचे स्मरणार्थ दिलेल्या देणगीतून गुजरवाडी - निंबाळकरवाडी येथील एक विद्यार्थी व एक विद्यार्थीनीस प्रत्येकी रु. ७००/- ची शिष्यवृत्ती देण्यांत येते.

३) श्री. विष्णू काशिनाथ आठल्ये यांनी दिलेल्या देणगीतून शालांत परिक्षा, पुणे विभागांत संस्कृत व मराठी विषयांत प्रथम येणाऱ्या विद्यार्थ्यांना कै. श्री. काशिनाथ लक्ष्मण आठल्ये व कै. सौ. विजया काशिनाथ आठल्ये या नावांने पारितोषिके देण्यांत येतात.

१०) ओंकार न्यास गेली १० वर्षे गरीब मुले-मुली दत्तक घेत असून त्यांचा पालन-पोषण, शिक्षण इ. खर्च करत आहे. त्यांचे निवासासाठी गुजरवाडी - निंबाळकरवाडी येथे रु. ६,००,०००/- खर्च करून १६०० चौरस फूट इमारत बांधकाम केले आहे. सध्या ६ मुले-मुली दत्तक घेतली आहेत. त्यांच्या व वाडीतील मुलांच्या विकासासाठी खालील कार्यक्रम राबविले जातात.

दररोज २ तास इंग्रजी व हिंदीचा वर्ग घेतला जातो व त्यालाही मुलांची उपस्थिती चांगली असते आणि त्यांना त्याचा छान उपयोग होत आहे.

संस्कार वर्गात नेहमीच्या उपक्रमाशिवाय गीतापाठ चालू केला आहे. गीता शिकविण्यास कसबा पेठ, पुणे येथून श्री. किशोर वैद्य सर विना मानधन नियमीत येतात. त्यांनी स्वत: मुलांसाठी पुस्तके, सीडी इ. सर्व साहित्य आणले आहे. त्यांच्या सुलभ रीतीने शिकविण्याच्या पद्धतीमुळे मुलांना सुद्धा गीतापाठाची गोडी लागली आहे.

याशिवाय विश्वस्त श्रीमती मालती निमोणकर यांनी यावर्षी नवीन उपक्रम चालू केला आहे. वाडीतील इयत्ता १०वी मध्ये असणाऱ्या काही मुलींना घरी अडचणी असतात, अभ्यासाचे वातावरण नसते, मार्गदर्शन करणारे कोणी नसते. श्रीमती निमोणकर अशा मुलींना न्यासाच्या वाडीतील जागेत अभ्यासाला बोलावून त्यांचेकडून योग्य रीतीने अभ्यास करुन घेतात, त्यांच्या अडचणी समजावून घेऊन त्यांना आर्थिक व मानसिक आधार देतात. खरेतर मुलींना मनापासून शिकायचे असते परंतु घरातील वातावरण, अडचणी इ. मुळे त्या नापास होतात व नंतर शिक्षण बंद होते ह्यावर मात करण्याच्या दृष्टीने श्रीमती निमोणकर हा प्रयत्न करत आहेत.

१२) ओंकार न्यास दरवर्षी कल्याणी विशेषांक वेगवेगळ्या संतांवर प्रकाशित करत असते. आतापावेतो न्यासाने एकूण १७ अंक प्रकाशित केले आहेत. त्यातील काही संतांची नावे अशी - श्री ज्ञानेश्वर महाराज, श्री गुरुदेव रानडे, श्री टेंबे स्वामी, श्री स्वरुपानंद, पावस, श्री स्वामी चिन्मयानंद, श्री गोंदवलेकर महाराज, श्री समर्थ रामदास स्वामी इ. यापैकी कल्याणींच्या २००० साली प्रकाशित झालेल्या स्वामी श्री स्वरुपानंद विशेषांकास मराठी वृत्तपत्र लेखक संघाचा उत्कृष्ट आध्यात्मिक अंक म्हणून पांडुरंग भाटकर स्मृति पुरस्कार मिळाला आहे.

न्यासाने प्रकाशित केलेल्या सर्व कल्याणी विशेषांकास साधक / वाचक यांचेकडून फारच उत्तम प्रतिसाद मिळाला आहे. मागील कल्याणी विशेषांक एप्रिल २००८ मध्ये समर्थ रामदास स्वामी यांचेवर श्री. चंद्रशेखर महाराज आठवले (पंढरपूर) यांचे शुभहस्ते प्रकाशित करण्यांत आला असून पुढील कल्याणी विशेषांक आद्य श्री शंकराचार्य यांचेवर एप्रिल २००९ मध्ये प्रकाशित करण्यात येत आहे. तसेच समाजासाठी अतुलनीय कार्य केल्याबद्दल वसुंधरा पुरस्कार देण्यांत येणार आहे.

सुसंस्कृत समाज बनण्यासाठी बालांचे मन सुसंस्कृत होणे आवश्यक आहे. ट्रस्टच्या या कार्यात समाजातील विविध स्तरांतून सक्रिय पाठिंबा व सहभाग मिळत आहे.

आपण आमच्या कार्यास

१) देणगी रुपाने २) वस्तु रुपाने

३) न्यासात कार्यरुपाने भाग घेऊन

मदत करु शकता.



भगवी वसने पांघरलेली अद्वैताची मूर्ती उभी ही ।
अढळ ध्रुवासम अभंग किर्ती विश्ववंद्य हा स्वामी जगती ॥

# श्री जगद्गुरु शङ्कराचार्य महासंस्थानम्,

दक्षिणाम्नाय श्री शारदापीठम् शृङ्गेरी-५७७ १३९


*PRIVATE SECRETARY*

To His Holiness Sri Jagadguru
Shankaracharya Dakshinamnaya
SRI SHARADA PEETHAM
SRINGERI-577139 (Karnataka)





Phone : 2234


Ref No : D7/9180

Camp : शृंगगिरिः

Date : 9 - 9 - 93

ओंकार ट्रष्ट अध्यक्षमहोदयेषु सादरा विज्ञप्तिः ।

समासादितं भवदीयं पत्रं समर्पितं श्रीचरणचरणनलिनयोः।
भवन्तः ओंकारट्रष्टद्वारा धर्मार्थरुग्णालय,वाचनालयादि संचालनेन समाजाभिवृद्धिकार्याणि वर्षत्रयादारभ्य कुर्वन्तीति विदित्वा श्रीजगद्गुरुचरणा अमोदन्त ।

भवतामुद्यमोयं श्रीशारदाशशिकलावतंसयोरसीमया कृपया फलेग्रहिर्भूयादिति श्रीचरणा आशासते ।

श्रीचरणानुगृहीता आशीर्मन्त्राक्षताःश्रीशारदा प्रसादश्च प्रेष्यते ।

इति निवेदयिता

दक्षिणामूर्ति

**श्री जगद्गुरू शंकराचार्य**

**● यांचा आशिर्वाद ●**

अध्यक्ष महाराज ओंकार ट्रस्ट यांस

सादर निवेदन,

श्री शंकराचार्यांच्या चरणारविंदी अर्पण केलेल आपले पत्र मिळाले.

ओंकार न्यासद्वारा आपण धर्मार्थ रुग्णालय, वाचनालय इत्यादि चालवून समाजविकास कार्य करीत आहात हे पाहून श्री जगद्गुरू शंकराचार्यांना आनंद होत आहे.

आपले हे कार्य श्री शारदा शंकरांच्या अमर्याद कृपेने सफल होवो असा श्रींचा आशीर्वाद आहे.

श्रींच्या कृपाशीर्वादाने युक्त मंत्राक्षता व श्री शारदेचा प्रसाद पाठविला आहे.

निवेदक
दक्षिणामूर्ति



## उज्वल भवितव्यासाठी

# ओंकार ट्रस्ट

(स्थापना २६ जुलै १९९१)
'विसावा' अनिकेत सोसायटी नं. १, बिबवेवाडी, पुणे ४११०३७
टेलिफोन क्रमांक ४२००४७

मुंबई सार्वजनिक विश्वस्त कायदा १९५० अन्वये नोंदणीकृत संस्था नोंदणी क्रमांक - ई १५०५ दिनांक १० ऑक्टोबर १९९१
कलम ८० ग खाली आयकर सवलत क्रमांक : पी एन्/१६५/०२० १९९३-९४ दि. १३-९-९३
१-४-९३ ते ३१-३-९६ पर्यंत



### १) ट्रस्टची उद्दीष्टे

धर्मार्थ दवाखाना
लहानमुलांसाठी कल्याण केंद्र
वाचनालय व वाचण्यासाठी हॉल
अध्यात्मिक केंद्र

### २) कार्यक्षेत्र

पुणे शहरापासून ५ कि. मी. अंतरावर असलेला कात्रज जवळील **गुजरवाडी निंबाळकरवाडीचा** रम्य परिसर वरील उद्दीष्ट पूर्तीसाठी निवडला.

### ३) आजपर्यंतची प्रगती

**निंबाळकरवाडी** येथे ४२ गुंठे जागा मिळवली व त्यास कंपौंड घालण्यात आले आहे. संस्कार वर्ग व वाचनालय सुरू केले. नोव्हेंबर ९२ पासून प्राथमिक वैद्यकीय सेवा केंद्र सुरू झाले असून ग्रामस्थ दवाखान्याचा, लाभ घेत आहेत.

**मांगडेवाडी** येथे संस्कारवर्ग सुरू आहे.

जुलै १९९२ पासून स्त्रियांसाठी शिवण प्रशिक्षण वर्ग सुरू असून ग्रामस्थ महिला मोठ्या आवडीने सहभागी झाल्या आहेत. काही स्त्रिया स्वयंरोजगार मिळवत आहेत.

ओंकार ट्रस्टच्या प्रथम वर्धापनदिनी १९९२ च्या गुरूपौर्णिमेस व १९९३ फेब्रुवारीमध्ये दासनवमीस **कल्याणी** चे विशेषांक प्रसिद्ध करण्यात आले.

**आपण हेही करू शकता –**
१) देणगी २) विशेषांकात जाहीरात ३) जागेचा विकास - वनीकरण अथवा बांधकाम साहित्याद्वारे ४) शालेयसाहित्य खेळ व वाचनालयासाठी पुस्तके ५) शिवणयंत्रे - टंकलेखन यंत्र देवून ६) रूग्णोपयोगी साहित्य, उपकरणे, औषधे पुरवणे ७) आपली सेवा (पुस्तके व वस्तूंचा स्वीकार ट्रस्टच्या उपयुक्ततेवर अवलंबून राहील.)

**धनादेश 'ओंकार ट्रस्ट' पुणे या नांवे पाठवावा.**

# अनुक्रमणिका



## कविता

# संपादकीय

हितचिंतकांच्या मदतीने व आशिर्वादाने "कल्याणी"च्या रूपाने ट्रस्टने दिलेल्या ज्ञानामृताचा गोरस आवडल्याची पोचपावती बहुसंख्य वाचकांच्याकडून मिळाली. त्यामुळे आमचा उत्साह नुसताच वाढला नाही तर तो द्विगुणित होत आहे. या उत्साहाचाच एक अविष्कार म्हणून दिनांक १२ जानेवारी ९४ रोजी स्वामी विवेकानंद यांच्या जयंती दिवशी "कल्याणीचे" आणखी एक भावपुष्प सत्गुरू चरणी समर्पित करीत आहोत.

मान्यवर व्यक्तींनी आपल्या ज्ञानाचा खजिना वाचकांच्या ओंजळीमध्ये भरभरून ओतला आहे. त्यामुळे हे तिसरे पुष्प गेंदेदार बनले आहे.

ट्रस्टनी आपल्या कार्याची व्याप्ती वाढवली असून संस्कारवर्ग, धर्मार्थ दवाखाना, वाचनालय या बरोबरच ग्रामीण महिलांना शिवण कामाचे प्रशिक्षण देऊन त्यांना स्वावलंबी बनविण्याच्या कार्याला चांगलीच गती आली आहे.

ट्रस्टने खरेदी केलेल्या जागेवर ट्रस्टची वास्तु उभारली गेली की आत्ता कोवळ्या स्वरूपात असणारे रोपट चांगलेच फोफावेल या बद्दल तिळमात्र शंका नाही. कारण निरपेक्ष सेवाभावी समर्थ भक्त कै. वसुंधरा सातवळेकर (ट्रस्टच्या माजी कार्यवाह) यांनी या कार्याची मुहूर्तमेढ रोवलेली आहे आणि शुद्ध बीजाचे रोपण केले आहे. तसेच सदरहू कार्यास श्रीमत् श्री जगद्गुरू शंकराचार्य शारदापीठ (श्रृंगेरी) यांचे बहुमोल आशिर्वाद लाभलेले आहेत.

या सर्व गोष्टी जरी पाठीशी असल्या तरी हितचिंतकांची मदत व सदिच्छा असल्याशिवाय कार्याला वेग येणार नाही म्हणून सढळ हाताने ट्रस्टला मदत करण्याची पुन्हा विनंती करण्यात येत आहे.

हा अंक प्रकाशित करण्यासाठी मदत केलेल्या सर्व लेखकांचे, जाहीरातदारांचे व इतर सहाय्यकांचे आभार मानून मनोगत समाप्ती.

जय जय रघुवीर समर्थ.

*— सौ. रजनी काळे*

# बीज अंकुरले - भावपूर्ण श्रद्धांजली

*'स्वामीजी' माझे 'समर्थ' माझे*
*'ज्ञानमाऊली' माझीच*
*'अखंड महायोग' स्वप्न तयांचे*
*कार्यरत मी त्यातच ।।*
*मी मी माझी वृत्ती नसे जरी*
*व्यवहार ही तो सुटतो ना*
*कसला 'मी' अन् कसले वैभव?*
*स्वरूपी ध्यान असताना ।।*
*यः कश्चित् हे जीवन दिसते*
*'नरदेही' ते सार्थकते*
*'प्रतिक्षणी' जर 'सजगता' तर*
*'महावाक्य' ते उजळतसे ।।*

१६ जून १९९३, दिदीच्या जन्मदिनी एकत्र जमुन त्यांच्या स्मृतीना उजाळा देतांना त्यांची वरील कविता वाचली आणि मन गहिवरले. या चार ओळीत त्यांचे जीवन साकारले होते. गौरकायकांती तेजःपूंज पण करारी चेहऱ्याच्या या जगावेगळ्या व्यक्तीमत्वाने मनांवर कुठेतरी खोल ठसा उमटवला होता.

स्वामीजींना आणि श्री समर्थांना आदर्श मानणारी संत सहवासाचा हव्यास असणारी आणि एका सद्गुरुवाचून अन्य काहीही न भावणारी ही व्यक्ती कुणाची दिदी होती, कुणाच्या बाई, तर कुणाची वसुधा मावशी होती आणि कुणाची नुसतीच वसुधा.

त्यांच्या निकट सान्निध्यांत जे आले त्यांनी त्या 'माऊलींच्या' अंतर्यामी झुळझुळ वाहाणाऱ्या प्रेम झऱ्याचा आस्वाद मनमुराद लुटला. अगदी तृप्त होईतो. प्रेमापोटी कठोर निर्भिडपणे बोलण्याच्या त्यांच्या वरलीया रंगावर ज्यांनी त्यांना पारखले त्यांना फक्त 'या' फणसांचे काटेच बोचले कारण फणसांतल्या गोड गऱ्यांची गोडी चाखण्याची कुवत त्यांचे जवळ नव्हती.

१०-११ वर्षांपूर्वी सोसायटीत सौ. वसुंधरा सातवळेकर यांनी संस्कार वर्ग सुरू केला आणि याच निमित्ताने त्यांच्याशी परिचय झाला. गणेशोत्सवाचे निमित्ताने जवळीक निर्माण झाली. दासबोध वाचनाच्या निमित्ताने बाळगोपाळांबरोबरच मोठ्यांची आवक जावक – ही 'विसाव्या'त वाढू लागली. नामस्मरण सप्ताह, दासबोधवर्ग दासनवमी रामनवमी आदी उत्सव इत्यादी निमित्ताने एकत्र जमणाऱ्या आमच्या कुटुंबाच्या 'दिदी' हा केंद्र बिंदू बनला. अनेकांना हरीभजनी लावणाऱ्या दिदींचे ध्येय होते अनेकांना घेऊन मुक्ती सोहळा साधण्याचे आणि त्यासाठी त्या कार्यरतही होत्या. बाळाला अपचन होऊ नये म्हणून आई त्याला भाताचे मऊमऊ घास करून भरविते. 'परमार्थाची गोष्ट आम्हा 'वयाने थोर' असणाऱ्यांना लागावी म्हणून दिदीही 'तो' सोपा करून आम्हाला रुचेल आणि पचेल अशा शब्दांत सांगायच्या.

संस्कार वर्गातील मुलांच्या जीवनांत अंतर्बाह्य 'नेटकेपणा' येण्यासाठी त्या त्यांना जीवनाचा अर्थ समजावून सांगायच्या. जीवन कसे जगावे हे लहान मोठ्या गोष्टींतून समजावयाच्या. शरिरसंपदेसाठी खेळाबरोबरच सूर्यनमस्कार, योगासने आदी त्यांचेकडून करून घ्यावयाच्या. कुशाग्र बुद्धीमत्ता व एकाग्रता साधण्यासाठी स्मरणशक्ती सारखे खेळ वर्गात घ्यावयाच्या. एक पिढी सर्वार्थाने संस्कारक्षम बनवण्याच्या मार्गावर होती. ८० वर्षांच्या आजींपासून ४ वर्षांच्या गोट्या पर्यंत सर्वांचा सहभाग दिदी परिवारांत होता व आहेही. बघता बघता दिवस उलटत होते. टॉलस्टॉयच्या लिखाणाने आणि श्वाइट्झरच्या व्यक्तीमत्वाने प्रेरित झालेल्या दिदींच्या मनांत काहीतरी घोळत होते. काहीतरी रुजले होते. तशातच डॉ. सौ. घोळे यांच्यासारख्या व्यक्तीची साथ त्यांना मिळाली आणि ९१ सालच्या गुरु पौर्णिमेस 'ओंकार-स्वरूपी' ओंकार ट्रस्टच्या बीजाने अंकुर धरला. "शिव भावे जीव सेवा" ही स्वामीजींची शिकवण दिदींच्या तोंडून आम्ही ऐकली होती. पण ती मूर्त स्वरूपात आणण्यासाठी ट्रस्ट कार्यरत झाला. व्यवहारी जगाचे दृष्टीने सकृतदर्शनी एकाकी वाटणाऱ्या ठिकाणी ट्रस्टचे कार्य सुरू झाले. डोंगराच्या कुशीत वसलेल्या पुण्यापासून केवळ ४-५ कि.मी. अंतरावर असणाऱ्या छोट्या छोट्या वाड्यातील बाळ गोपाळांच्या भल्यासाठी दिदीनी तिथेही संस्कारवर्ग सुरू केला. वाचनालय सुरू केले. [illegible] दवाखाना सुरू झाला, बायकांसाठी शिवणवर्ग चालू झाला आणि दासबोध वर्गही. ट्रस्टच्या कार्याची वाटचाल 'दिदींच्या' भक्कम आधाराने चालू होती. 'कल्याणी'च्या रुपाने दोन गेंदेदार साहित्य पुष्पांचा आस्वाद रसिकांना मिळाला. पण अचानक विपरीत घडले. २३ मार्च ९३ ला आम्हां सर्वांचा आधारस्तंभ आम्हाला देहाने सोडून गेला. भयानक आणि भयावह पोकळी निर्माण झाली. आमच्या 'दिदी' आम्हाला पोरके करून निघून गेल्या. वाटलं सारं संपलं. आम्ही अनाथ झालो. पण नाही. 'दिदी' सर्वार्थाने आमच्या माऊली होत्या. आमचा असला दुबळेपणा त्यांना कधीच रुचला नसता. त्यांच्या शिकवणीत तो बसणाराही नव्हता. दिदी आमच्यातून देहाने गेल्या तो दिवस मंगळवारचा मांगडेवाडी येथील संस्कार वर्गाचा, आश्चर्य घडले. त्या माऊलीचा धीरगंभीर भक्कमपणा आमच्या मागे उभा ठाकला. पिंकी, दिपा, अश्विनी सारख्या कुमार वयांतील मुली त्यांनी अतुल धैर्य दाखविले त्या वर्ग घेण्यासाठी

मांगडेवाडीकडे रवाना झाल्या. कारण शेकडो डोळे त्यांच्या येण्याची वाट पाहात रस्त्याकडे लागलेले असणार आणि त्यांना निराश करणे दिदींना भावणारे नव्हते. त्या ठिकाणी जमलेल्या सर्वांच्या डोळ्यांतील आसवे आपोआप आवंढ्याबरोबर गिळली गेली. टिपे गाळण्यांत पुरुषार्थ नव्हता. दिदींना ही श्रद्धांजली परवडणारीही नव्हती. बस् मनांचा निर्धार झाला ठरले. समाजसेवा नव्हेतर समाजपूजा करणे, दरिद्री नारायणाची सेवा करणे, शिव भावे जीव सेवा हेच आपले ध्येय. दिदींच्या या महायज्ञांत आपणच समिधा होऊन जाणे हीच खरी श्रद्धांजली त्यांनी पेरलेल्या बीजांचा वटवृक्ष करण्यासाठी प्रयत्नशील राहाणे हेच खरे जीवन. म्हणूनच दिदींच्या प्रेरणेतून साकार झालेली त्यांच्याच लाडक्या स्वामींच्या जन्मदिनी प्रकाशित झालेली ही कल्याणी आमच्या 'कल्याणीच्या' (दिदींच्या) स्मृतीस अर्पण.

॥ जय जय रघुवीर समर्थ ॥

*सौ. उज्वला काळे,*
*कार्यवाह*

## गुरुमाऊली

*अध्यात्माचे बीज रोविलेस मम देही ।*
*सुविचारांचे खत घालूनी ।*
*वर्षाव करी काव्य सुमनांचा ।*
*अंकुरले ते बीज । उमलले लहानसे रोप ।*
*येतील तयाला फळे । साधनेची गोड रसाळ ।*
*अहंकाराचा चीक तो । जाईल निघोनी ।*
*मग उरेल ते शुद्ध सत्व ।*
*पाजीयले जीने मला ज्ञानामृत ।*
*नमस्कार त्या गुरुमाऊलीस ।*
*जय जय रघुवीर समर्थ ।*

**सौ. अनुराधा ढवळे,**
धनश्री अनिकेत सोसायटी,
नं.१ बिबवेवाडी, पुणे ४११०३७

ओंकार ट्रस्ट, १९९४ च्या स्वामी विवेकानंद जन्मदिनानिमित्त 'कल्याणी विशेषांक' संपादक सौ. रजनी गोपाळ काळे ट्रस्टी यांनी स्मिता प्रिंटर्स, पुणे ३० येथे छापून श्री. भालचंद्र वासुदेव सातवळेकर, ट्रस्टी, यांनी १२ जानेवारी १९९४ रोजी 'विसावा' अनिकेत सोसायटी क्र. १, बिबवेवाडी, पुणे ४११ ०३७. येथे प्रकाशित केला.
टीप : (१) सदरचा विशेषांक फक्त खाजगी वितरणासाठी असून तो विनामूल्य आहे.
(२) या अंकात प्रसिद्ध झालेल्या लेखनाशी संपादक सहमत असतीलच असे नाही.

मुखपृष्ठ व चित्रे : भरत केतकर

छपाई : स्मिता प्रिंटर्स
अजित एजन्सीज, पुणे

अक्षर जुळणी : गणेश मुद्रा,
६९२ बुधवार पेठ, पुणे २.
दूरध्वनि : ४५११४४, ४५११०९

व्यवस्थापकीय सहकार्य : शाम देऊळकर
अनंत सर्व्हीसेस,
पुणे ४११ ०३८.

## श्री माता काली

हे दक्षिणेश्वरी
श्री माता काली,
रूप तुझे पाहुनी
गं भुलला
एक बालयोगी ... ॥१॥

धर्मवीर जो
जगज्जेता
कृतार्थ त्याने
केली भूमाता
हरपला भान
त्या क्षणी ॥२॥

जगी फडकवी
धर्मपताका
वाढवी महिमा
तीनही लोकां
हा पुत्र तुझा जगती ॥३॥

रूप जरी तुझे
उग्र दिसतसे
भान हरपुनी
काय बघतसे?
मागणे विसरूनी ॥४॥

गं भुलला एक
बालयोगी
गं भुलला एक
बालयोगी

**सौ. स्मिता के. आव्हाड**

## कल्पनातीत किमयागार कर्मयोगी एकनाथजी रानडे

परमात्म्याशि होती एकरूप । एकनाथजी कृतार्थतेने
कार्याशी ते सदैव तद्रूप । कणाकणाने, तना-मनाने ॥१॥
शीळाखंडावरती मोहक । भव्य, दिव्य ते विशाळ मंदिर
उभारवूनी दैवी स्मारक । अमर जाहले पृथ्वी-तळावर ॥२॥
अमेरिकेतील स्वातंत्र्याच्या । देवीचा तो तेथे पुतळा
अमेरिकेतील हिंदुत्वाच्या । उद्‌गात्याचा येथे पुतळा ॥३॥
कोणी केली कमाल किमया? । एकनाथजी नाव तयांचे
अमाप कोठुनि पैका-रुपया? । दृश्य, सुदर्शन, कर्तृत्वाचे ॥४॥
"अशक्य" नव्हता शब्दची माहित । कर्तृत्वाला नव्हत्या सीमा
सतत परिश्रम, स्वार्थ न जाणत । त्यांच्या सम ते, नाही उपमा ॥५॥
स्वामीजींच्या अपुऱ्या इच्छा । एकनाथजी साकारविती
अपुऱ्या त्यांच्या साऱ्या इच्छा । पूर्ण होऊ द्या आपुल्या हाती ॥६॥
चिता-साक्षिने शपथा घेऊ । अनुसरू या मार्ग तयांचा
श्रद्धांजली ही त्यांना वाहू । गिरवूया आदर्श तयांचा ॥७॥

*श्री. रा. पु. गोडबोले*

---

## કૃષ્ણને ભક્તોની વિનંતી

શરણ આવી પડેલાને પ્રભુ સંભાળશો ક્યારે
તમારે દ્વાર ઉભેલાને ક્યાં ઉગારશો ક્યારે
લૂંટાતી લાજ ને લક્ષ્મી, લૂંટાતી પુણ્ય ભૂમિ આ
નાનકડા બાળની હત્યા તમારી દ્રષ્ટિની સામે
મરે છે અસંખ્ય માનવ અહિં ક્યાં તમે બચાવશો ક્યારે
ક્યાં તુ સર્વધર્મને તજી ને શરણ તુ મારું
બચાવીશ સર્વ પાપોથી ક્યાં તમે આવશો ક્યારે
અનન્યા કહી ચિંતવંતોમાં વિચારે ભાવના વચનો
તમારા અનન્ય વિશ્વાસે તમારે દ્વાર ઉભો છું
બન્યા તમે સારથિ અર્જુનના જગતને બોધ તમે આપ્યો
તમારા એ ભાવના વચનો, ફરી સંભળાવશો ક્યારે
તમારો પુણ્ય ભારત દેશ, તમારી સંત ભૂમિ છે
તમારા દેશને આજે ફરી અવતરશો ક્યારે
ફરી અહિં આવશો ક્યારે
તમારી રાહ જોઈને હવે હું ખૂબ થાક્યો છું
નહી તડપાવશો અમને અમારા પ્રાણના ભોગે
રડે છે હિંદ ભૂમિ આ, રડે છે બાળુડા તારા
અમારી છેલ્લી આશાને ફરી નિરાશ કરશો મા
જીવું છુ છેલ્લો આશાએ કે દર્શન આપશો ક્યારે

**કલ્પરચીત**
**ધર્મપત્નીશ્રી**
**વિદ્યાબેન ઠક્કર**

# स्वामी विवेकानंदांचे काही विचार

● जेव्हा जगाला देण्यासारखे दुसरे काही तुमच्याजवळ नसेल त्यावेळी एक सुंदर विचार जगाला द्या.

● जीवनात संघर्ष नसेल तर जगण्यात काय हशील? संघर्षातच जीवनाचे काव्य आहे.

● जी गोष्ट दुसऱ्याने करू नये असे आपल्याला वाटते ती गोष्ट आपण दुसऱ्याच्या बाबतीत करू नये.

● सत्याचे तीन भाग आहेत.
जिज्ञासा : जी सत्याची आराधना असते.
ज्ञान : जिथे सत्याची उपस्थिती असते.
विश्वास : जो सत्याचा उपभोग असतो.

● प्रेमाची ४ लक्षणे
प्रेमात सौदेबाजी नसते. असले तर फक्त देणे. घेणे कधीच नाही.
प्रेम भिती जाणत नाही.
आपला सर्वोच्च आदर्श प्रेमास्पंदात दिसणे हे प्रेम
प्रेम केलेल्या व्यक्तीचा गुणदोषांसकट सहज स्वीकार करणे.

● जो सर्वांवर प्रेम करू शकेल तोच भगवंताला प्रिय होईल. आपल्या बांधवांवर प्रेम करणारा माणूस परमेश्वराचा लाडका होय.

● भिती हाच मृत्यू होय. निर्भय व्यक्तिच सहजतेने आपल्या जीवनाचे सार्थक करू शकेल.
भितीने मरत मरत जगण्यापेक्षा निर्भयतेने जगून एकदाच देहाने मरू.

● ज्याचे हृदय गरिबांसाठी तळमळते, ज्यांच्या हृदयास गरिबांसाठी पीळ पडतो, त्यालाच मी महात्मा म्हणतो, एरवी तो दुरात्माच होय.

● मी ज्या देशात आलो आहे, तेथे शिंपी माणसाला सभ्य बनवितो आणि मी ज्या देशातून आलो आहे, तेथे चारित्र्य माणसास सभ्य बनविते.

● स्वतःच्या दुःखावर हास्याचा पडदा टाकून दुसऱ्याला हसवण्यातच खरा आनंद असतो.

● पशुला द्रव्याचा लोभ नसतो परंतु हाच द्रव्यलोभ माणसाला पशु बनवितो.

● मी देह नाही हे म्हणण्यापेक्षा मी आत्मा आहे हे म्हणण्यामुळे 'नाहमकर्ताची' जाणीव होवून नरदेहाचे सार्थक होते.

● प्रत्येक राष्ट्राला आणि प्रत्येक व्यक्तिला महान बनविण्यासाठी तीन गोष्ट आवश्यक असतात.
– चांगल्या गोष्टी ग्रहण करण्याची क्षमता.
– संशयरहित असणे आणि द्वेषरहित असते.
– जे चांगलं बनण्याचा आणि चांगलं करण्याचा प्रयत्न करत आहेत त्यांना सहकार्य करणे.

● तुम्ही जसा विचार करता तसे स्वतःला घडविता. स्वतःला दुर्बल मानलत तर दुर्बलच व्हाल, स्वतःला आत्मविश्वासू मानलंस, आत्मविश्वास तुमच्यात सदैव वास करेल.

● आज आपल्या देशाची उन्नती करण्याकरिता सुसंस्कृत माणसांची गरज आहे. केवळ सुशिक्षित असणे व्यर्थ आहे.

●●●

# अध्यात्मयोग आणि स्वामी विवेकानंद

पंडित हिंगे

फलज्योतिष शास्त्र हे माणसांचे स्वभाव वर्णन धन, सौख्य, शिक्षण, नोकरी, विविध विषयांची आवड ह्याच बरोबर व्यक्तिचा ओढा अध्यात्म मार्गाकडे जाऊ शकेल किंवा कसे? इत्यादि अनेक गोष्टींचे दर्शन घडविणारा कुंडली हा एक आरसा आहे. तो आरसा अचूक असेल तर घडणाऱ्या घटनांची निश्चिती कधीच चुकत नाही. आपल्या प्रगल्भ भाषणाने जगातील सर्व सामान्य नागरिकच नव्हे तर धर्मगुरूंना आश्चर्याचा धक्का बसावा आणि भारतातील अध्यात्मयोगाचे आणि बुद्धिमत्तेचे दर्शन घडविणारे श्री स्वामी विवेकानंद ह्यांच्या पत्रिकेबाबत असे काय योग होते ते आजच्या लेखात पाहू या!

फलज्योतिष शास्त्रात कुंडलीमध्ये धर्म, अर्थ, काम मोक्ष असे चार त्रिकोण सांगितलले आहेत. त्यामध्ये कालपुरुषाची मेष लग्नाची कुंडली पाहिली असता प्रथम (तनुस्थान) पंचम (विद्या) आणि नवम (भाग्य) ही स्थाने धर्मत्रिकोणात येतात. दुसरे (धन) सहावे (रिपु) आणि दहावे (कर्म) ही स्थाने अर्थ त्रिकोणात तर तिसरे (भ्रातृ) सातवे (जाया) आणि अकरावे (लाभ) ही स्थाने काम त्रिकोणात तर चतुर्थ (सुख) अष्टम (मृत्यू) व बारावे (व्यय) ही स्थाने मोक्ष त्रिकोणात येतात.

कुंडलीतील पंचमस्थान, पंचमस्थानातील ग्रह आणि त्या स्थानाचा अधिपती म्हणजेच पंचमेश ह्यांचा परमार्थातील उपासना, जपजाप्य आन्हिक नित्योपासना ह्या गोष्टींशी जवळचा संबंध असतो. पंचमस्थानावरून श्रद्धा, भक्ती, उपासना यांचा विचार होतो. परमार्थातील भक्तिचा कारकग्रह आहे शुक्र. तर परमार्थातील भक्ती तत्त्वाचे ज्ञान आणि स्वरूप समजावून सांगणारा ग्रह आहे गुरू. तसेच शनि आणि केतू हे वैराग्य संपन्न करणारे आणि परमार्थात पूर्ण करणारे ग्रह! कुंडलीमध्ये पंचमेश पंचमात किंवा पंचमेशाचा शुभ ग्रहाशी (चंद्र, बुध, गुरू, शुक्र) योग किंवा संबंध आला असता तसेच पंचमस्थानी चंद्र, बुध, गुरू, शुक्र हे ग्रह असता नित्योपासना, नामस्मरण वगैरे अध्यात्ममार्गातील गोष्टींना स्थान प्राप्त होते.

कुंडलीत महातपाचे कारकत्व हे केतूकडे दिलेले आहे. कुंडलीत मेष, वृश्चिक, वृषभ, तूळ आणि धनु-मीन ह्या अनुक्रमे मंगळ, शुक्र व गुरूच्या राशीत पारमार्थिक साधनासाठी फलदायी होतो. रवि, चंद्र, बुध ह्यांचे हर्शल, नेपच्यून, प्लुटो बरोबर योग होत असतील तरच परमार्थात प्रगती होते. केतू हा ग्रह चंद्राच्या नवांशात (मूळ कुंडलीत चंद्र ज्या राशीत त्याच राशीत तो नवमांश कुंडलीत असता) पंचम, नवम आणि व्ययस्थानी गुरूच्या दृष्टीत असता अध्यात्माची गोडी लागते. कुंडलीत केतू हा लग्नाच्या नवमात असून जर चंद्राच्या पंचमात (चंद्रापासून पाचव्यास्थानी) गुरूच्या दृष्टीत असेल तरच अध्यात्म विद्येची प्राप्ती होऊ शकते.

पंचमस्थान आणि व्ययस्थान यांचे ग्रहाशी एकमेकाचे संबंध असता ईश्वरभक्तीची ओढ लागते. पत्रिकेत गुरू, शनीची परस्पर दृष्टी असता दोन्ही अध्यात्म ग्रहांची देवाण घेवाण होते. एक, पाच व नऊ तसेच चार, आठ, बारा ही स्थानेच अध्यात्मिक प्रगती करिता उपयोगी असतात. गुरू शनिबरोबर केतू महत्त्वाचा ठरतो, तर काही विशिष्ठ परिस्थितीत राहूचा विचार करावा लागतो. आत्माकारक रवि, मनकारक चंद्र, बुद्धिकारक बुध ह्याबरोबरच उत्साह आणि शक्तीचा कारक ग्रह मंगळ तपाचरणाच्या प्रगतीस साथ देणारा असतो. पंचमस्थानावरून धर्म, मंत्र शास्त्र प्रगती पाहतात तर नवमस्थानावरून धार्मिक आचार विचार ह्यांचा बोध होतो. दशमावरून कृती, तपाचरण, तर व्ययस्थानावरून परलोक प्राप्ती, मोक्ष व ईश्वरोपासना पाहिली जाते. मोक्ष प्राप्ती करिता गुरूग्रह पाया असला तरी कळसापर्यंत जाण्यास शनिची आवश्यकता असतेच.

॥ स्वामी विवेकानंद - कुंडली ॥

जन्मतारीख - १२ जानेवारी १८६३

जन्मस्थळ - कलकत्ता. जन्मवेळ सकाळी ६-४०

● जन्मलग्न कुंडली ●




माहिती - रामकृष्ण परमहंस यांचे पट्टशिष्य! संन्यासी, योगी व भक्त. उग्र बुद्धिमत्ता, अगाध स्मरणशक्ती, साक्षात्कारी, अफाट लोकप्रियता, शिकागो येथे सर्व धर्म परिषदेत हिंदु धर्माच्या तत्त्वज्ञानाची

विजयध्वजा रोवली. पाश्चिमात्य राष्ट्रात धर्म प्रचाराचे अतिशय महत्त्वपूर्ण काम.

विवेकानंद पत्रिका -

● नवमांश कुंडली ●




पत्रिकेमध्ये बुध, शुक्र युती २) गुरू, मंगळ प्रतियोग ३) पंचमेश मंगळ हा पंचमात प्लुटो बरोबर ४) लाभातील तुळेचा गुरू हा नवमांशात वर्गोत्तम! ५) धनु लग्न हे गुरूचे लग्न तेही वर्गोत्तम झालेले आहे ६) लग्नेश गुरू हा रविच्या लाभात तुळ राशीत. ७) पंचमेश व्ययेश मंगळाने दृष्ट ८) धर्म स्थानाधिपती रवि लग्नी ९) शुक्र बुधाची युती नेपच्यूनचे लाभ योगात १०) वैराग्य संपन्न करणारे आणि परमार्थात पूर्ण करणारे शनि, केतू हे मूळ पत्रिकेत नवपंचम योगात आहेत. ११) शुक्राच्या राशीत केतू हर्षल बरोबर असून चंद्र, शनिचे नवपंचम योगात आहे. १२) पंचमेश व्ययेश मंगळ हा रविचे नवपंचम योगात आहेच!

एकंदर वरील पत्रिका पाहाता अध्यात्माकरिता फलज्योतिष शास्त्रात कुंडलीत जे प्रमुख योग व्हावे लागतात तेच योग स्वामी विवेकानंदांचे कुंडलीत असल्याने ते अध्यात्मात प्रगती करू शकले आणि मोक्ष प्राप्तीचा मार्ग मिळविता आला. अध्यात्म, भक्ती, उपासना ह्या करिता लेखात वर दिलेले योग असतील तरच त्या मार्गात प्रगती होऊ शकते.

---

*टीप : वाचकांनो आपणही आपली कुंडली तपासून पाहू शकता!*


पंडित हिंगे
अमरबाग, गाडीतळ
(ज्योतिष भास्कर) हडपसर-पुणे ४११०२८.

# जीव, जगत् आणि जगदीश!

प्रा. विद्याधर गोखले



'दैनंदिन जीवनांत मानवाचा मानवाशी संबंध येतो. कुत्रा-मांजर, शेळी-मेंढी, घोडा-गाढव इत्यादि पशूंशीही मानवाचा संबंध येतो! ऊन-पाऊस-वारा, सूर्य-चंद्र-तारा, दगड-धोंडे-गारा वगैरे वगैरे अनेक गोष्टींशी त्याचा संबंध आहे. पण ज्याचे अस्तित्वच विवाद्य त्या ईश्वराचा संबंध येतोच कुठे? त्या कल्पित ईश्वराचा विचार कराच कशाला? ईश्वर बिश्वर कुछ नही! 'ईश्वर' ह्या भोळसट भ्रामक कल्पनेने अनेक अंधश्रद्धांचे मात्र पोषण होते. ईश्वराच्या नांवे धूर्त मंडळींची बुवाबाजी मात्र माजते. म्हणूनच ईश्वराला रिटायर करा, डिसमिस् करा', असे कोणी पाखंडी 'पुरोगामी' कितीही सांगोत, बहुसंख्य माणसांना ईश्वराचा विचार करणे अपरिहार्य आहे.

फार काय सांगावे, ह्या पुरोगामी जडवादी पंडितांना देखील ह्या ना त्या प्रकाराचा परमेश्वर जगचालक-जगदीश विचारांत घेणे भागच पडते. ईश्वराच्या जागी कोणते ना कोणते मूलतत्त्व, कोणते ना कोणते ध्येय स्वप्न त्यांना ठेवावेच लागते. भौतिक विज्ञानवादी निरीश्वरवादी महाभागही ह्या दृश्य जगताचे अदृश्य मूलतत्त्व (म्हणजे ईश्वरच की!) शोधू पाहतात. ते ईश्वराच्या ऐवजी निसर्ग, आद्यशक्ती, प्रायमल कॉज असे शब्द योजतात इतकेच! एका व्यवहारवादी थोर विचारवंताने असे म्हटले आहे की, "समजा परमेश्वर नसलाच, तर तो जगत्कल्याणासाठी आपण निर्माण करूया. (If there is no God; Let us create one!)

परमेश्वराची (वाटल्यास निसर्गाची म्हणा!) सर्वश्रेष्ठ निर्मिती म्हणजे मानव! इतर कोणत्याही प्राण्याला लाभली नाही अशी चिकित्सक बुद्धिमत्ता, जिज्ञासा, आणि संवेदनाक्षम मनोवृत्ती ईश्वराने मानव प्राण्याला दिली आहे. म्हणून हा बुद्धिमान मानव-प्राणी (Rational Animal) अगदी प्राथमिक अवस्थेत होता तेव्हा पासून "मी कोण? कसा निर्माण झालो? मला कोणी निर्माण केले? 'कस्त्वम्? कोऽहम्? कुत आयातः? का मेजननी? को मे तातः?" ह्या प्रश्नांचा विचार करू लागला.

मी ज्या जगात जन्मतो वावरतो, ते जग कोणी कसे नि का निर्माण केले? हे हि प्रश्न त्याच्या मनांत घोळू लागले आणि तेव्हापासून सर्व शक्तिमान परमेश्वराची संकल्पना त्याच्या मनात घोळू लागली. मानवाच्या प्रगतिशील वाटचाली बरोबरच त्याची परमेश्वर विषयक कल्पनाही प्रगत रूप घेऊ लागली. आपल्या देशांतील महान बुद्धिमान चिंतन-मननशील ऋषीमुनींनी तर ही संकल्पना अगदी पूर्णत्वाला नेली. ह्यांतूनच भारताचे श्रेष्ठ अध्यात्मशास्त्र निर्माण झाले. 'जीव, जगत् आणि जगदीश्वर' ह्या तिघांचा संयुक्तिक विचार करणारे शास्त्र म्हणजेच अध्यात्म शास्त्र. सर्व शास्त्रांना ते आधारभूत असल्याने, सर्व विद्यांत अध्यात्म विद्या श्रेष्ठ (अध्यात्म विद्या विद्यानाम्) ही आपल्या पूर्वजांची दृढ धारणा होती. इतर भौतिक शास्त्रांची, भौतिक विद्यांची महती आपल्या पूर्वजांनी जाणलीच

नाही असे नाही. शेती, वैद्यक, वाणिज्य, रसायन, गणित-भूमिती, ज्योतिष, धनुर्विद्या, व्याकरण, संगीत, नृत्य, स्थापत्य, शिल्प इत्यादि अनेक क्षेत्रांत त्यांनी प्रगती केली. "तथापि ह्या सर्व भौतिक शास्त्रांत अथवा कलांत निष्णात असलेल्या माणसाला जर अध्यात्म ज्ञान नसेल तर? तर त्याची स्थिती जन्मांधासारखी आहे," असे आपले ब्रह्मवेत्ते मानत असत. ज्ञानेश्वर महाराजांनी सुरेख दृष्टांत दिला आहे.

"मोराच्या अंगी असोसे ।
पिसे आहाती डोळसे ।
परी एकली दिठी नसे । तैसें तें गा ॥

मोराच्या पिसाऱ्यावर अनेक सुंदर डोळे असतात. पण त्यांना दृष्टी नसते. तशीच गत अध्यात्मज्ञान, अध्यात्मिक दृष्टी नसणाऱ्या भौतिकशास्त्र संपन्न लोकांची असते!

आपल्या जिज्ञासू बुद्धिमान पूर्वजांनी ह्या अध्यात्मशास्त्राच्या आधारे 'जीव, जगत् नि जगदीश्वर' ह्या संबंधी जो विचार मांडला तो अगदी शास्त्रीय आहे. सूचित करण्यासाठीच की काय आद्य शंकराचार्यांनी त्याला 'ब्रह्मविज्ञान' ही यथायोग्य संज्ञा दिली. ब्रह्म म्हणजेच 'सत्- चित्-आनंद स्वरूप' परमेश्वर परमात्मा! जीवात्म्याला (Personal Soul) त्या परमात्म्याचा (Universal Soul) साक्षात्कार घडविण्याचा मार्ग जे पद्धतशीरपणे दाखविते तेच ब्रह्मविज्ञान. हे काही भोळसट कल्पनांचे गौडबंगाल नव्हे.

आमच्या प्रज्ञावंत पूर्वजांनी जेव्हा अत्यंत नियमबद्ध चालणारी ही विश्वरचना पाहिली तेव्हा त्यांच्या मनांत सहजच विचार उद्भवला की ह्या "प्रचंड विश्वयंत्राचा कोणी तरी शक्तिशाली निर्माता नि नियामक असलाच पाहिजे!" (जसे एखादे नियमबद्ध घड्याळ पाहिले की आपल्या मनांत येते की ह्या घड्याळाचा कोणीतरी घड्याळजी असलाच पाहिजे!) चंद्र-सूर्य-नक्षत्र-तारे ह्यांची गति नि उदयास्त, जन्म-मृत्यू, शैशव-तारुण्य-वार्धक्य; समुद्राची भरती- ओहोटी, सहाऋतूंचे क्रमानेच होणारे आगमन-निर्गमन इत्यादि सर्व गोष्टींत कमालीची सुसूत्रता नि काटेकोर नियमितपणा पाहून त्यांनी हे तर्कशुद्ध अनुमान केले की ह्या विशाल दुनियेचा कोणीतरी जन्मदाता नि पालनवाला असलाच पाहिजे. मग त्याला ईश्वर म्हणा, परमात्मा म्हणा अथवा निसर्ग म्हणा!

त्या परमात्म्याचा म्हणजेच सृष्टीच्या बुडाशी असलेल्या परमतत्त्वाचा साक्षात्कार हेच मानवी जीवनाचे परमध्येय, परम साफल्य हे आपल्या त्या ध्येयवादी पूर्वजांच्या लक्षांत आले. त्यासाठी त्यांनी अहर्निश मनन-चिंतन केले. सर्वस्वाचा त्याग स्वीकारला. तेव्हा त्यांच्या हेही लक्षांत आले की त्या परमात्म्याचा साक्षात्कार केवळ बुद्धिमत्तेच्या नि तर्कशास्त्राच्या बळावर होणे शक्य नाही. **ते बुद्धीप्रामाण्यवादीच होते आणि म्हणूनच बुद्धीच्या मर्यादा त्यांच्या लक्षांत आल्या.** एखाद्या उत्तुंग शैल शिखराकडे जाताना विशिष्ट मर्यादेपर्यंतच एखादे वाहन जाऊ शकते. पुढे नाही. त्याचप्रमाणे बुद्धीच्या सामर्थ्याला प्रस्तुत आत्मसाक्षात्काराचे शिखर गाठताना मर्यादा पडतात. ते निर्गुण-निराकार-अव्यक्त ब्रह्मतत्त्व बुद्धीच्या नि तर्काच्या पलिकडे आहे. (**'यो बुद्धेः परतस्तुसः'**) हे लक्षांत येतांच मनांतच दडलेल्या अतींद्रिय शक्तिंचा शोध त्यांनी घेतला. त्या शक्ती जागृत करणारे 'योगशास्त्र' त्यांनी परिणत केले. तसेच ज्ञानयोग-भक्तियोग-कर्मयोग हे तीन मार्ग ही त्यांनी शोधून काढले. ते जगताला उपलब्ध करून दिले. आत्मतत्त्वाचा अनुभव महत्त्वाचा. केवळ बुद्धिग्राह्य शब्दज्ञान कामाचे नाही. असे त्यांनी रोखठोकपणे सांगितले. जीवात्म्याला परमात्म्याचा साक्षात्कार होण्यासाठी प्रथमतः मन निर्मळ होण्याची आणि ते काबूत आणण्याची नितांत गरज आहे.

'मन एव मनुष्याणां कारणं बंध मोक्षयोः' (**मन करारे प्रसन्न । सर्व सिद्धींचे कारण**) ह्या मंत्राचा पुकारा त्यांनी केला.

अशा त्या आपल्या पूर्वजांचे केवळ भारतावरच नव्हे, तर साऱ्याजगतावर हे केवढे उपकार आहेत! त्यांनी ५००० वर्षांपूर्वीच केवळ बुद्धिप्रामाण्याच्याच नव्हे तर अनुभव प्रामाण्याच्या आधारावर जगताला सांगितले.

"तो जगदीश्वर एकच आहे. पण विद्वान लोक त्याचे भिन्न भिन्न प्रकारे वर्णन करतात. एकं सद्विप्राः बहुधा वदन्ति ।'

मग उगाच अज्ञानाच्या आहारी जाऊन, 'माझाच देव खरा, इतरांचा खोटा, असा दुराग्रह का धरता? एकमेकांशी का भांडता? तो जगदीश्वर एकच आहे एवढेच नाही, तर तोच ह्या जगताच्या अणुरेणूंत भरला आहे, प्रत्येक प्राणिमात्रांत तोच आहे. 'ईश्वरः सर्व भूतांना हृद्देशेऽर्जुन तिष्ठति! **'एकमेवाही भूतात्मा भूते भूते व्यवस्थितः ।'**

भारतीय ब्रह्मविज्ञानाचा हा सिद्धांत केवळ वेदांत-उपनिषदांत-गीतेतच राहिला नाही. तो खेड्यापाड्यापर्यंत संतांनी नेला आणि म्हणूनच सामान्य माणूसही सहज म्हणू लागला. "बाबारे! जे पिंडी तेच ब्रह्मांडी! जे पोहऱ्यांत, तेंच विहीरीत!"

ह्या साऱ्या विश्व प्रपंचाच्या मुळाशी असलेले चैतन्य म्हणजेच तो जगदीश्वर. हे समान चैतन्यच माणसांना परस्परांशी जोडते. परस्परांच्या सुख-दुःखाचा अनुभव घडविते. ह्या चैतन्याचा परमतत्त्वाचा साक्षात्कार, झाल्याविना खरीखुरी समता-एकता-बंधूता निर्माण होणे शक्य नाही. माणसे परस्परांवर निर्लोभी प्रेम करणे शक्य नाही.' 'खरा तो प्रेमा न धरी लोभ मनीं' 'अद्वेष्टा सर्व भूतानाम्-मैत्रः करूण एवच' (With Malice to wards none; with charity and love for all) अशी थोर माणसे निर्माण होणेही, ह्याच समान चैतन्याच्या सिद्धांताच्या जाणिवेने सुलभ होते.

खरा समष्टिधर्मही ह्याच सिद्धांताच्या पेरणीतून उदयास येणे सहज शक्य होते. "एकच जगदीश्वर, एकच चैतन्य सर्व व्यक्तींमध्ये वास्तव्य करीत असल्यामुळे मी समाजाहून अलग नाही. समाज हा सिंधू तर मी त्याचाच अविभाज्य बिंदू!" ही भावना साहजिकच निर्माण होऊ शकते. महोदार मेघ समुद्रापासूनच पाणी घेतो; त्याचा खारटपणा काढून टाकतो आणि ते सर्वच्यासर्व दुनियेला पर्यायाने सागरालाच देऊन टाकतो. बिलकुल ह्याच प्रकारे समाजाकडून आपल्याला जें जे काही

चांगले प्राप्त होते ते ते समाजालाच देऊन टाकावे. त्याला सुखी करावे ही समर्पण भावना देखील ह्याच चैतन्य सिद्धांताच्या संस्काराने सहजनिर्माण होते आणि समष्टिधर्माचे पोषण घडते.

येथवर ज्याचे अगदी त्रोटक नि धावते निरूपण केले, ते 'ब्रह्मविज्ञान'च आपल्या भारतीय हिंदू संस्कृतीचा म्हणजेच हिंदूधर्माचा म्हणजेच हिंदूत्वाचा पाया आहे. 'विश्वाच्या अणुरेणूत भरलेले चैतन्य म्हणजेच तो सर्वशक्तिमान जगदीश्वर. त्याचा साक्षात्कार हेच सर्वश्रेष्ठ सुख', ह्याच केंद्रबिंदू कल्पून आमच्या थोर पूर्वजांनी एक सर्वसमावेशक जीवनपद्धती (Way of Life) आकारास आणली. बहुविधतेत एकात्मता पाहणारी, धर्म-अर्थ-काम-मोक्ष ह्या चारीही पुरुषार्थांना वाव देणारी ही जी ज्ञानविज्ञाननिष्ठ संस्कृती तिलाच 'धर्म' हे व्यापक नांव दिले. 'Religion म्हणजे हा धर्म नव्हे. रिलिजन म्हणजे उपासना पद्धती. देश-काल-परिस्थिती आणि माणसांच्या भिन्नभिन्न क्षमता ह्यानुसार उपासना पद्धती देखील भिन्नभिन्न असू शकतील. कोणी मंदिरात जाऊन मूर्तीला (त्या चैतन्य प्रतीकाला) दंडवत घालील. कोणी मशिदीत जाऊन माथा टेकून (सिजदा करून) नमाज पढेल! कोणी शरीराच्या नि मनाच्या शुद्धीसाठी एकादशीचा उपवास करील, तर कोणी 'रोझा' पाळील! कोणी 'हर हर महादेव' हा पुण्य घोष करील तर कोणी 'अल्ला हु अकबर' हा पाक पुकारा करील! पण त्याने काय बिघडले? परमेश्वरी तत्त्व-चैतन्य-ह्या विशाल विश्वांत नाना रंगरूपांत प्रकट झाले असल्यामुळे त्याच्या साक्षात्कार मार्गात बहुरंगी बहुविधता उपासना पद्धती येणारच!

परंतु उपासना पद्धतीचे भिन्नभिन्न प्रकार अखेर त्या एकाच परमात्म्याकडे नेणारे असल्यामुळे ह्या देशाच्या दिलदार संस्कृतीने 'साधनानां अनेकता' हा परमत सहिष्णु सिद्धांत ह्या पुण्यभूमीत रुजविला. त्यामुळेच ही संस्कृती अगदी प्रारंभापासूनच 'सर्व धर्म समभावी' बनली. 'विश्वाचिया अखिल मंगल धारणार्थ' तिने मानवजातीस चिरंतन सुख मिळवून देऊ शकतील अशी मूल्ये (व्हॅल्यूज) निर्माण केली. 'हे विश्वचि माझे घर' असे मानून विश्वात्मक देवाला संतोष देणारे संतमहंत निर्माण केले. मानवाला अंतिम सत्याकडे (चैतन्यरूप परमेश्वराकडे) आणि शाश्वत सुखाकडे नेण्याची महत्त्वाकांक्षा बाळगणाऱ्या ह्या संतांनी नाना मत मतांतरे नि नानामार्ग ह्यांचा समन्वय घालण्याचा आटोकाट प्रयत्न केला. त्यांनी संघर्षापेक्षा समन्वयावर भर दिला.

जीवात्मा आणि जगदीश्वर म्हणजेच ब्रह्म ह्यांचे परस्परसंबंध कसे आहेत ह्याचा जो सखोल विचार आपल्या साक्षात्कारी थोर पुरुषांनी केला, तोही महत्त्वाचा आहे. हा विचार असा की ब्रह्म हेच अंतिम नि अविनाशी तत्त्व. ते 'सत्-चित्-आनंद' स्वरूप आहे. काही असणे म्हणजे 'सत्' आणि नसणे म्हणजे असत्. ब्रह्म हे असत् नसून 'सत्'च आहे. कारण सत् मध्येच असण्याचे स्वयंभू सामर्थ्य असू शकते; 'असत्' मध्ये नव्हे. 'असत्'च्या अस्तित्वाची ग्वाही कोणी तरी असल्याशिवाय कोण देऊ शकणार? म्हणूनच कोणी 'काही नाही' असे म्हणताच वदतो व्याघाताचा दोष निर्माण होतो! 'असत्' चे असणे हेच स्वयंविरोधी आहे. ब्रह्म आहेच, (ब्रह्मसत्यम्). एवढेच नव्हे तर ते चैतन्यरूप आहे. ते अचेतन जड असूच शकत नाही. कारण अचेतनाचे असणे हे नसल्यासारखेच नव्हे काय? जडांना (अचेतनाला) त्याच्या अस्तित्वाचे भान असेलच कसे? सारांश, सत् हे चिदात्मकच आहे. हे चैतन्यमय ब्रह्म आनंदमयही आहे, असा आपल्या वेदांताचा प्रमुख सिद्धांत आहे आणि तो अगदी युक्तीसंगत आहे. सत्य नि चैतन्यमय ब्रह्म हा आनंदाचा महासागर असेल तर जीवात्मा हा त्याच महासागराचा एक तरंग आहे! कशावरून? माणसाची जी आनंदप्राप्तीची कोशीश चालू असते, तिच्यावरून त्याची सुखाची-आनंदाची ओढच सिद्ध करते की त्याचे मूळ स्वरूप आनंदमय आहे. माणूस आपल्या मूलतः आनंदमय असलेल्या स्वरूपाचा अनुभव घेण्यासाठी धडपडतो. पण तो क्वचितच यशस्वी होतो, बहुशः पडतोच. असे का होते? ह्या अपेशास त्याचे अज्ञान कारणीभूत असते, माया कारणीभूत असते, असे वेदांताचे उत्तर आहे. सर्वत्र 'सत्-चित्-आनंद-स्वरूप' परमात्मा भरलेला आहे. पण जणू तो हरपल्यागत आहे. त्याला शोधून काढण्याची तळमळ जितकी तीव्र होत जाईल तितकी यशस्विता मानवाला प्राप्त होत जाईल. प्रयत्नांती परमेश्वर!

माणूस अज्ञानाच्या आहारी जाऊन स्वतःच्या देहासच आत्मा मानून, क्षणभंगूर सुखासाठी धडपडतो. पण ते सुख खरे शाश्वत सुख नसल्याने, त्याला निराश व्हावे लागते. ह्या निराशेच्या भरात तो 'सर्व क्षणिक, सर्व दुःखम्' अशी जीवनाविषयी चुकीची कल्पना करून बसतो. पण त्याने आनंद यात्रिकाची भूमिका स्वीकारली पाहिजे. कारण हे जग म्हणजे आनंद स्वरूप परमेश्वराचाच आविष्कार आहे. असे भारताचे ब्रह्मविज्ञान उच्च रवाने सांगते. "आनंदी आनंद गडे, जिकडे तिकडे चोहीकडे." अशीच त्याची ग्वाही आहे.

हे ब्रह्मविज्ञान भौतिक विज्ञानाचा तिरस्कार करणारे नाही, उलटपक्षी त्याला परिपूर्णता आणणारे आहे. हे जीवन विमुख नाही. व्यवहारापासून शतयोजनेदूर राहणारे हे तत्त्वज्ञान नाही. ते रिकामटेकड्या लोकांचे बौद्धिक मनोरंजनाचे साधन नाही. तर मानव समाजाला सुखाशांतीचा ठेवा मिळवून देणारे श्रेष्ठ साधन आहे. जीव, जगत् नि जगदीश्वर ह्यांची यथायोग्य संगती लावून देणारे शास्त्र आहे.

*प्रा. विद्याधर संभाजीराव गोखले*
*८/४०२ प्रियदर्शनी सहकारी गृहरचना संस्था,*
*भवानी शंकर रोड,*
*दादर, मुंबई ४०० ०२८.*

# स्वामी विवेकानंद व विशिष्टाद्वैत

डॉ. श्रीकृष्ण द. देशमुख

स्वामी विवेकानंद पाश्चात्य श्रोत्यांना वेदान्तातील अद्वैतमताच्या विविध छटा समजावून सांगत असत. जडवाद आणि भोगवादाच्या भोवती पिंगा घालू असलेल्या पाश्चात्यांना अजातवाद किंवा विवर्तवाद जर सांगितला तर तो त्यांना मानवणे त्या काळी तरी महाकठीण होते. मोजक्या तत्त्वजिज्ञासू प्राध्यापकांना वेदान्ताची ओळख करून देणे व सर्व सामान्यांना वेदान्त सांगणे ह्यांत फार फरक पडतो. संत दयाळू असल्याने हा फरक लक्षात घेऊनच ते तत्त्वज्ञान सांगतात. ज्या देशात (भारतात) वेदान्त तत्त्वज्ञानाचा कळस गाठला गेला त्याच देशात ब्राह्मोसमाजासारखे कलम केलेले तत्त्वज्ञान काही भागात तरी लोकप्रिय झाले. वेदान्ताचे वैराग्य बाजूला सारून ऐहिक प्रलोभनाना बळी पडून ख्रिश्चन तत्त्वज्ञान स्वीकारले गेले. वेदान्ताची निर्भयता भयभीत होऊन इस्लामाचे तत्त्वज्ञान बेडरपणे भारतात शिरले. मानवाचे ऐहिकाशी असलेले घट्ट नाते गीतेसारख्या वेदान्तग्रंथात परोपरीने सांगितले असूनही ते जबाबदार पारमार्थिक धुरीणांकडून तितक्याच परोपरीने मांडले गेले नाही. व जे मांडले गेले ते अज्ञान, आळस, स्वयंतुष्टता बेफिकिरी व उन्मत्तपणामुळे समाजाकडून स्वीकारले गेले नाही. विशिष्ट अद्वैतमतामध्ये 'अद्वैत' ही संकल्पना स्वीकारली आहे. परंतु त्या संकल्पनेला मानवी मनात रुजलेल्या दृश्य जगताची उघड उघड जोड दिली आहे. त्या दृश्य जगताने विशिष्ट असे अद्वैतमत सांगितले आहे. त्या दृष्ट जगताला प्रतिष्ठा देऊन त्याचा समावेश असलेले अद्वैतमत हिरिरीने मांडले आहे.

जगताचा अंतर्भाव असलेले विशिष्ट अद्वैतमतसुद्धा श्री. रामानुजाचार्यांच्या कालाच्या वैशिष्ट्यानुसार निवृत्तीवादाकडे बरेच झुकले होते, ही खरोखर दुर्दैवाची गोष्ट आहे. त्यांनी त्यांच्या अनुयायांना केलेल्या सहा आज्ञा व्यष्टी व समष्टीच्या प्रगतीसंबंधी – ऐहिक उत्कर्षासंबंधी – काहीच सांगत नाहीत. त्या अशा -

१) भगवंताचे आपण किंकर आहोत असे समजून कर्माचे विधिवत् अनुष्ठान करावे. फळाची अपेक्षा न ठेवता भगवन्नामाचा जप करावा. श्रीभाष्याचा मनन चिंतनपूर्वक अभ्यास करून त्याचा सर्वत्र प्रचार करावा. त्याने ईश्वराचे दास्यत्व केल्याचे फळ मिळते.

२) वरीलप्रमाणे वागणे शक्य नसेल तर श्री रामानुजाचार्यांच्या इतर सुमारे पन्नास द्रविड ग्रंथांचे रात्रंदिवस पठण करावे.

३) हेही शक्य नसेल तर महान तीर्थक्षेत्रांमध्ये राहून भगवंताची सेवा करावी. जागोजागी भगवंताच्या मूर्तीची प्रतिष्ठापना करावी.

४) हे शक्य नसले तर सांप्रदायिक दोन मंत्रांचा अर्थ समजावून घेऊन जप करावा.

५) हे शक्य नसेल तर पवित्र ठिकाणी झोपडी बांधून तेथेच अखंड रहावे.

६) हे शक्य नसेल तर ज्ञान, भक्ती, वैराग्य व धर्म यांचे वर्म जाणणाऱ्या, अहंता व ममत्वमुक्त अशा श्रेष्ठ पुरुषाच्या आश्रयाने रहावे.

स्वामी विवेकानंदांनी विशिष्ट अद्वैत मताचे तात्त्विक सिद्धान्त समजावून सांगताना वरील सहा आज्ञांचा उल्लेखही केला नाही. या मतामध्ये चित्, अचित् व ब्रह्म अशी तीन तत्त्वे सत्य म्हणून स्वीकारली आहेत. त्यांपैकी चित व अचित हे ब्रह्माचे शरीर असून त्या दोन्हींनी विशिष्ट असे ब्रह्म एकच आहे, असे त्यांच्या अद्वैताचे स्वरूप आहे. या मतामध्ये चित् व अचित् या दोन्हींचे प्रत्येकी स्थूल व सूक्ष्म असे दोन भेद मानले आहेत. त्यांतील सूक्ष्म चित् व सूक्ष्म अचित् हे मिळून ब्रह्म असून स्थूल चित् व स्थूल अचित् यांनी त्या ब्रह्माचे शरीर बनले आहे. पैकी ब्रह्म हे कारण असून, शरीर हे कार्य आहे. म्हणून स्थूल व सूक्ष्म चिद्चिद् विशिष्ट ब्रह्म यांचे ऐक्य म्हणजे अद्वैत आहे. शांकर अद्वैत मतामध्ये ब्रह्माच्या निर्विशेषत्वावर दिलेला भर रामानुजांना मान्य नाही. ते आपल्या ब्रह्मसूत्रावरील भाष्यात म्हणतात -

''न स्थानतोऽपि'' इति सर्व विशेषरहितं ब्रह्मेति च वक्ष्यतीति; तन्न सविशेषं ब्रह्मायेव हि तत्र वक्ष्यति' (श्रीभाष्य पृ. ११८)

'न स्थानतोऽपि' या व्याससूत्राने ब्रह्म निर्विशेष आहे असे सिद्ध होत नाही. ते सविशेष आहे असेच सांगितले आहे. ते पुढे म्हणतात -

'मायामात्रंहि' या सूत्रात स्वप्नात दिसणाऱ्या पदार्थांना जागृतीमध्ये दिसणाऱ्या पदार्थांहून वेगळेपणा असल्याने ते मायिक आहेत, असे मानले नसून दोन्ही पारमार्थिक सत्य आहेत असे मानले आहे. दृश्य जगत् हे स्वप्नाप्रमाणे भ्रमरूप आहे असे न मानता स्वप्नसृष्टी जागृत सृष्टीप्रमाणे सत्य आहे असे मानण्याकडे श्री रामानुजाचार्यांचा कल आहे.

कधीही न संपणाऱ्या तात्त्विक चर्चेचा फार ऊहापोह न करणे बरे. कोणत्याही पारमार्थिक तत्त्वज्ञानाने मानवाचे जगाशी असलेले दृढमूल नाते पूर्णपणे लक्षात घेऊनच मोक्षाचा विचार सांगितला पाहिजे, हे मात्र खरे. असे झाले नाही, तर मोक्षाच्या पारमार्थिक तत्त्वज्ञानाला भीती, आश्चर्य, परकेपणा, नकार, टवाळी इ. प्रकारे प्रतिक्रिया होतात. विशिष्ट अद्वैत मतात चित् ही जीवसृष्टी अचित् ही जडसृष्टी व चित् व अचित् अशी उभयस्वरूपाची ईश्वर किंवा ब्रह्मरूप मूळ किंवा कारणरूप सूक्ष्मसृष्टी सत्य मानली असल्याने यातील कोणत्याच घटकाला गौणत्व नाही. ब्रह्म सविशेष मानले असल्याने त्या तत्त्वाची 'सृष्टी'च्या भाषेत मांडणी करण्यात अडचण येत नाही. शांकर अद्वैतामध्ये दृश्य जगत्

अध्यस्त मानले असून ब्रह्म अधिष्ठान मानले आहे. अध्यस्ताला अधिष्ठानावाचून सत्ता नाही. अधिष्ठान सत्य आहे. म्हणून अध्यस्तही अधिष्ठानमय असल्याने, दिसते तेवढ्यापुरते सत्य असतेच. अशा आडवळणाने जगताचे अस्तित्व मान्य केले आहेच. असे असूनही दोन्ही मतांमध्ये जगताकडे दुर्लक्ष करण्याची परंपरा चालत आली, हे मात्र सत्य आहे!

स्वामी विवेकानंद भारतीयांना जरा रजोगुणी बनायला सांगत असत. याचा अर्थ भारतीय त्या काळी सात्विक होते असा नाही! अज्ञान, आळस, मोह, परधार्जिणेपणा, गुलामी, मनोरचना व रूढीप्रियता या तमोगुणाच्या व शबल रजोगुणाच्या प्रवृत्तींचे सर्वत्र राज्य होते. त्यातून बाहेर पडून शुद्ध रजोगुण व नंतर सत्त्वगुण यांचा प्रभाव वाढावा अशी त्यांची अपेक्षा होती. सामाजिक समता, शारीरिक क्षमता, आर्थिक सुबत्ता, राजकीय स्वतंत्रता व बौद्धिक कुशलता त्यांना अभिप्रेत होती. विशिष्ट अद्वैत मतानुसार चितूरूप जीव व अचितूरूप जग सत्य मानल्यावर या सर्वांचा विचार करण्यात कोणती अडचण आहे? तत्त्वज्ञानाच्या बैठकीची नीटनेटकी मांडणी करूनही रूढीच्या अनावर प्रवाहाच्या बलवान वेगाने ती बैठक कशी वाहून जाते याचे उदाहरण म्हणून या मताकडे बोट दाखविता येईल.

स्वामी विवेकानंदांप्रमाणेच श्री ज्ञानेश्वर महाराज व समर्थ रामदास स्वामींनी निवृत्तिवादाचा सतत पाठपुरावा न करता जगताची व्यावहारिक सत्ता मान्य केली आहे. प्रवृत्तीला प्रतिष्ठा दिली आहे.

'गृहस्थाश्रमाचे ओझे । कपाळी आधीच आहे सहजे
की तेचि संन्यासे वाढविजे । सरिसे पुढती ॥ ज्ञा. ६-५०

बहुतेक सर्वांना गृहस्थाश्रमाच्या जबाबदाऱ्या जीवनप्रवाहाच्या अनुषंगाने असतातच. त्यातच संन्यासाश्रमाची वाढीव जबाबदारी का घ्यावी? श्री ज्ञानदेवसुद्धा विहित भोगांच्या भाषेत बोलतात,

'ऐसे समस्त भोगभरित । होआल तुम्ही अनार्त ।
जरी स्वधर्मैक निरज । वर्ताल बापा ॥ ज्ञा. ३-१०२

विषयभोग सहज असले तरी ते ध्येयरूप नाहीत एवढेच सर्व संतांना सतत सांगावयाचे असते. समर्थांचा 'आधी प्रपंच करावा नेटका । मग घ्यावे परमार्थ विवेका ।' हा विचार तर सर्वप्रसिद्धच आहे.

वेदान्ती व संत यांत मुख्य व फार महत्त्वाचा फरक म्हणजे वेदान्ती शास्त्राभिमुख असतात, तर संत समाजाभिमुख असतात. म्हणून समाज संतांच्या पायाशी नतमस्तक होतो. रामानुजाचार्यांनी विशिष्टाद्वैतमताचे शास्त्र सांगितले. स्वामी विवेकानंदांनी ते समाजाभिमुख बनविले. श्रीभाष्याच्या अनुयायांनी सोवळे सोडले नाही. स्वामी विवेकानंदांनी त्याचा धिक्कार केला! रामानुज निवृत्तीचे खंदे पुरस्कर्ते झाले. स्वामी विवेकानंदांनी निवृत्तीच्या खांद्यावर उभी राहिलेली प्रवृत्ती सांगितली. श्री रामानुजांनी उपासना हे ध्येय मानले. स्वामी विवेकानंदांनी उपास्याला सर्व जीवमात्रांत पाहून त्याची सेवा सांगितली. अद्वैताची छटा कोणतीही असो संत तिला समाजहिताचा रंग दिल्याशिवाय राहत नाहीत हेच खरे!

*डॉ. श्रीकृष्ण द. देशमुख*
*नेहरू पथ, मु. पो. मुरगुड, ता. कागल, जि. कोल्हापूर.*

# श्रेयो ही ज्ञानमभ्यासत्

बा. रा. अंतरकर

कोणतेही कर्म करताना त्यातील मर्म न समजता किंवा न समजावून घेता ते नुसते पुनः पुन्हा करीत राहणे (यालाच 'अभ्यास' म्हणतात- "पौनःपुन्येन करणं अभ्यासः ।") यापेक्षा त्यातील मर्म शक्यतो समजावून घेऊन ते करणे अधिक चांगले (श्रेयः) असा वरील गीतावचनाचा भावार्थ आहे. व्यवहारात असे कर्म करण्याला लागू असलेला हा नियम परमार्थात किंवा अध्यात्मात अतिशय महत्त्वाचा आहे, हे वेगळे सांगण्याची गरज नाही. परमार्थ समजून करावा यासंबंधी उद्बोधक वाटतील अशा काही गोष्टी पुढे देत आहे.

१) एका गृहस्थाने एका चांगल्या सत्पुरुषाकडून उपदेश घेतला होता. त्याने आपल्या गुरूंची एक तसबीर पूजेत ठेवली होती व तो त्या तसबिरीतील गुरूची रोज पूजा, धूप, दीप, नैवेद्य इत्यादी उपचारपूर्वक सेवा करीत असे. त्याचे गुरू त्या वेळी हयात असून एक दिवस दुपारी त्याच्या घरी आले व आपल्याला भूक लागली असून जेवावयास वाढण्यास त्यांनी शिष्याला सांगितले. त्याने त्यांना बसावयास पाट वगैरे देऊन व नमस्कारपूर्वक स्वागत केले. तो म्हणाला, 'गुरूदेव, माझी पूजा जवळजवळ संपलीच आहे. नैवेद्य समर्पण झाले की मी आपणास वाढतोच. त्यावर ते म्हणाले, "अरे, मी प्रत्यक्ष तुझ्या घरी येऊन भूक लागली आहे, मला जेवण वाढ असे सांगत असता माझ्याच फोटोला नैवेद्य समर्पण करीपर्यंत मला थांबावयास सांगतोस, याला काय म्हणावे?"

२) श्री गोंदावलेकर महाराजांचे श्री. कृष्णशास्त्री उप्पिनबेटगेरी या नावाचे एक प्रकाण्ड पंडित असे शिष्य होते. ते कर्नाटकातील असून त्यांचे सोवळे अतिशय कडक होते. एकदा ते श्री महाराजांबरोबर कर्नाटकातील वेंकटपूर या खेडेगावी गेले होते. ते स्वयंभू वेंकोबाचे स्थान असून तेथील सोवळेही अतिशय कडक होते. श्री महाराजही सोवळे ओवळे पाळीत असत. परंतु ते इतके कडक नव्हते. त्या दृष्टीने त्या वेळी तेथे आलेल्या गं. भा. गंगूताईंनी त्या बोलण्यात फटकळ होत्या शास्त्रीबुवांना 'तुमच्या सोवळ्या ओवळ्याचे येथे कसे काय जमते?" असे जरा खोचून विचारले. तेव्हा शास्त्रीबुवा म्हणाले, 'गंगूताई, येथे श्री महाराजांचे सान्निध्य हेच खरे व सर्व सोवळे आहे. यापेक्षा अधिक सोवळ्याची काय गरज आहे?' श्री महाराज खरे काय आहेत व त्यांच्या सहवासाचे खरे महत्त्व काय आहे, या दोहोंचेही मर्म शास्त्रीबुवांना समजलेले होते.

३) एका खेडेगावात राहणारा एक इसम श्री विष्णूचा एकनिष्ठ पण एकान्तिक भक्त होता. श्री विष्णूशिवाय इतर कोणत्याही देवाची पूजा करणे त्यास मान्य नव्हते. आपल्या पूजेकरिता त्याने श्री विष्णूची एक प्रतिमा/मूर्ती करवून घेतली होती व बाहेरगावी जावयाचे झाल्यास तो ती प्रतिमा नेहमी बरोबर घेऊन जात असे. एकदा दुसऱ्या ठिकाणी जाताना ती प्रतिमा बरोबर न्यावयास तो विसरला. त्यामुळे त्याच्या पूजेची अडचण झाली व गावात कोठे श्री विष्णूचे देऊळ आहे किंवा काय याबद्दल त्याने चौकशी केली. तसे मंदिर तेथे नव्हते. पण श्री दत्ताचे देऊळ तेथे होते व त्यात श्री विष्णू आहे असे त्यास सांगण्यात आले. शेवटी नाइलाज म्हणून तो त्या देवळात पूजा करायला गेला. प्रत्यक्ष पूजा करताना मात्र त्रिमूर्तीपैकी तो फक्त मधल्या म्हणजे श्रीविष्णूच्या मूर्तीचीच पूजा करीत होता. त्याने देवाचे कपाळ पुसले व पाय धुतले. मग त्याच देवाला गंध, हळदकुंकू वाहिले फुले त्या देवाच्याच मस्तकावर व पायावर वाहिली. दीप त्याचे समोरच ओवाळला व नैवेद्यही फक्त त्यालाच समर्पण केला. परंतु धूप समर्पण करताना त्याचा वास इतर देवांकडेही जाणार, तो जाऊ नये म्हणून दोन कापडाचे लहान बोळे तयार करून ते प्रत्येकी श्री शंकर व श्री ब्रह्मदेव यांच्या नाकपुडीत घालून मग धूप समर्पण केला व अशा रीतीने त्याने आपली पूजा पूर्ण केली. त्याची एकनिष्ठतेची मूळ भावना चांगली असूनही ईश्वराच्या खऱ्या स्वरूपाची यथार्थ कल्पना अथवा जाण त्याला नसल्याने त्या भावनेचे हास्यास्पद विकृतीकरण झाले.

४) एक फौजदार होता. तो बाळकृष्णाची उपासना करीत असे. त्याला रोजच्या पूजेला सुमारे ३ तास लागत व त्या काळात तो कडक मौन पाळीत असे. एकदा एका चोराचा तपास जारीने चालू होता व तो ज्या वेळी सापडेल त्या वेळी तत्काळ आपल्यास कळविण्यासंबंधी त्याने हाताखालच्या शिपायांना सूचना दिल्या होत्या. त्याचे काय करावयाचे ते तो ताबडतोब सांगणार होता. एक दिवस तो चोर सकाळीच सापडला व शिपायाने फौजदाराच्या घरी येऊन त्यांनी त्याला ती गोष्ट सांगितली. त्या वेळी फौजदार पूजेला बसला असल्यामुळे त्याचे मौन होते; परंतु सूचना ताबडतोब द्यावयाच्या. तेव्हा त्याने पूजेतील बाळकृष्णाची (पितळेची) मूर्ती तिचा पाय धरून उचलली व आपल्या जानव्याने बांधून पूजेतील पळीने तिच्या पाठीवर चार पाच फटके जोराने मारले. त्याबरोबर शिपाई म्हणाला, 'साहेब, समजलो. चोराला उचला व उलटा करून त्याच्या ढुंगणावर जोराने चाबकाचे फटके मारावयाचे.' यातही मौन पाळण्यातील खरे स्वारस्य न समजल्याने पूजेचे विडंबन झाले.

५) एक इसम काशीला गेला असता गंगेवर स्नानाला गेला.

त्याच्याबरोबर एक छोटासा तांब्याचा गडू होता. तो तीरावर ठेवून जाणार होता, म्हणून तो चोरीस जाऊ नये परंतु परत आल्यावर तो आपल्यास सहज सापडावा म्हणून तीरावरील वाळूत उपडा करून पुसून ठेवला व मग तो स्नानास गेला. तो पुरलेला गडू एखाद्या शिवलिंगासारखा दिसत होता. त्यामुळे त्याच्या नंतर येणाऱ्यांना स्नानास जाण्यापूर्वी तीरावर शिवलिंग तयार करून मग स्नानास जाण्याची तेथील पद्धत आहे असे वाटले. त्याला अनुसरून नंतर येणाऱ्या प्रत्येकाने तसे एक शिवलिंग जवळपास तयार केले. त्यामुळे मूळचा मनुष्य स्नान करून परत आला तेव्हा त्याला तेथे एका आकाराची अनेक शिवलिंगे दिसली व त्यातून आपला गडू कोणता ते उमगेना. तसेच बाकीची शिवलिंगे असल्याने ती विसकटूनही पाहता येईना. शेवटी आपला गडू न मिळाल्याने त्याशिवायच त्याला तेथून जावे लागले. त्यासंबंधात तो म्हणाला,

वालुकालिङ्गमात्रेण गतं मे ताम्रभाजनम् ।
गतानुगतिको लोको न लोकः पारमार्थिकः ।।

परमार्थाबद्दल सर्वसामान्यांच्या मनात समजापेक्षा गैरसमजच फार अधिक प्रमाणात आढळून येतात. त्यामुळे त्या मार्गात पुष्कळ काळपर्यंत असलेल्यांचीही फारशी प्रगती झाल्याचे दिसत नाही. म्हणूनच परमार्थ अतिशय समजून करणे जरुरीचे आहे व तरच त्यात खरी प्रगती होऊ शकेल.



*वा. रा. अंतरकर*
*विलेपारले, पूर्व,*
*मुंबई - ४०० ०५७.*

# स्वामी विवेकानंदांचे राष्ट्रचिंतन

**सुनील चिंचोलकर**

सन् १८८८ ते १८९२ अखेरपर्यंत स्वामी विवेकानंदांनी हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंत भारत भ्रमण केले. भगवान बुद्ध, आद्य शंकराचार्य, समर्थ रामदास यांच्या पावलावर पाऊल ठेवून स्वामी विवेकानंदांनी संपूर्ण देशस्थितीचे निरीक्षण केले. केवळ पुण्यप्राप्तीसाठी केलेली ती तीर्थयात्रा नव्हती तर भारतावर जीवापाड प्रेम करणाऱ्या राष्ट्रवादी संन्याश्याने भारताला झालेल्या रोगाचे अचूकपणे केलेले निदान होते. प्रवासाच्या शेवटी कन्याकुमारीच्या खडकावर ७२ तास बसून स्वामीजींनी भारतमातेचे ध्यान केले. राष्ट्रदेवतेचे ध्यान करणारा भारताच्या इतिहासातला हा पहिला संन्यासी होता. एका पत्रात स्वामीजी लिहितात –

"दादा, आपल्या देशातील दारिद्र्य व अज्ञान पाहून मला झोप देखील येत नाही. कन्याकुमारी येथे कन्याकुमारी देवीच्या मंदिरात बसलो असताना-भारताच्या दक्षिणेकडील त्या शेवटच्या खडकावर बसलो असताना मला एक उपाय सुचला. आम्ही लाखो संन्यासी आहोत. इकडे तिकडे फिरून लोकांना तत्त्वज्ञान किंवा दर्शनशास्त्र शिकवतो. हा सारा खुळेपणा नाही काय? उपाशीपोटी धर्म काय पचणार असे आपले गुरूदेव म्हणत नव्हते काय? गरीब लोक हे जे पशुवत् जीवन कंठीत आहेत त्याचे कारण अज्ञान हेच होय. वर्षानुवर्षे आम्ही पाजी लोक त्यांचे रक्त शोषित आलो आहोत. त्यांना आपल्या टाचेखाली तुडवीत आलो आहोत.

समजा काही निःस्वार्थी, परहितेच्छु संन्यासी जर गावोगावी, खेडोपाडी भ्रमण करून शिक्षणाचा प्रसार करतील, चांगल्या उपयुक्त गोष्टी सांगून, नकाशे कॅमेरे इत्यादि वस्तू घेऊन ते जर उच्चनीच साऱ्याच जातींच्या उन्नतीसाठी फिरतील तर कालांतराने सगळ्यांचेच हित होणार नाही का? आपण आपले राष्ट्रीय सत्व, आपले राष्ट्रीय वैशिष्ट्य हरवून बसलो आहोत आणि हेच भारतातील साऱ्या दुःखाचे कारण होय."

**भारताला रजोगुणाची गरज :**

बहात्तर तासांनंतर त्या संन्यस्त योग्याची समाधी अवस्था भंग करण्यात अखेर त्या लाटांना यश आले. वसिष्ठ मुनींच्या बोधप्रद शब्दांनी प्रभुरामचंद्राची निर्विकल्प समाधी उतरली. लाटांच्या त्या गर्जनाद्वारे त्या स्वामीजींना अवघ्या भारतीयांची दुःखे आक्रोशपूर्ण शब्दात सांगत होत्या व अखेर स्वामीजींना निर्विकल्प समाधीपासून परावृत्त करण्यात त्या यशस्वी झाल्या होत्या. दक्षिणेच्या त्या अखेरच्या खडकावर स्वामीजी पार्वती देवीच्या चरणचिन्हावर देहाने उभे होते. त्यांचे मन हिमालयातील कैलास शिखरावरील शिवाच्या ध्यानात मग्न होते. उत्तरेकडून स्वामीजी दक्षिणेपर्यंत पोहोचले होते. त्यांच्या नेत्रासमोरून तिन्ही समुद्रांच्या अखंड लाटांवर अवघा भारत त्यांना दोलायमान होताना दिसत होता. त्यांच्या डोळ्यासमोरून तरळून जात होते. हजारो, लाखो भारतीय बांधव, जे प्रारब्धाच्या दुष्टचक्रात पूर्णपणे अडकून पडले होते व त्यातून बाहेर पडण्याचा कोणताही मार्ग त्या दुर्दैवी गोरगरीबांना सापडत नव्हता. त्यांच्या डोळ्यासमोर दिसत होते ते श्रीमंत सरदार, संस्थानिक व पाषाणहृदयी राजे, ज्यांना या भीषण अशा दारिद्र्याची व अज्ञानाची जणू गंधवार्ताही नव्हती. त्यांच्या डोळ्यासमोर होते सामाजिक गुन्हेगार असलेले ते पंडे, पुरोहित व पंडित, ज्यांनी जातीयतेच्या वरवंट्याखाली वर्षानुवर्षे अवघा समाज भरडून व चिरडून काढला होता. अज्ञान दुःख-दैन्य-दारिद्र्य-अंधश्रद्धा-स्त्रीयांची अवहेलना-द्वेष-मत्सर-परस्पर संघर्ष-रुढीप्रिय-भोळसट-निष्प्राण-लाचार-आगतिक असा भारतीय समाज त्यांच्या डोळ्यासमोर तीन सागरांप्रमाणे पसरला होता. या कृतघ्न समाजावर ते मनापासून प्रेम करीत होते. या निष्प्राण राष्ट्रावर त्यांचे जीवापाड प्रेम होते. एका पत्रात स्वामीजी लिहितात - "मी जपानमध्ये असे ऐकले की, तेथील मुलींची अशी श्रद्धा असते की आपण आपल्या बाहुल्यांवर जीवापाड प्रेम केले तर त्या बाहुल्या जिवंत होतात. म्हणूनच जपानी मुलगी आपली बाहुली कधीच मोडत फोडत नाही. माझीसुद्धा अशी श्रद्धा आहे की, स्वतःचे पूर्वकालीन वैभव गमावून बसलेल्या, दुर्भागी, विवेकहीन, पददलीत भुकेने वखवखलेल्या, संटेखोर आणि मत्सरी अशा या भारतीयांवर जर कोणी हृदयापासून प्रेम करू लागला तर भारत पुन्हा जागा होईल. दारिद्र्य आणि अज्ञान यांच्या भोवऱ्यात सापडून जे दिवसेंदिवस अधिकाधिक बुडत आहेत अशा आपल्या कोट्यावधी देशबांधवांचे कल्याण व्हावे अशी तळमळ असणारे व त्यासाठी यावत् शक्य प्रयत्न करणारे मोठ्या मनाचे शेकडो स्त्रीपुरुष जेव्हा जीवनातील सुखविलास उपभोगण्याच्या साऱ्या इच्छा टाकून देऊन कार्यरत होतील तेव्हाच भारतात जागृती घडून येईल. सद्हेतु, निष्कपटता व असीम प्रेम ह्यांच्या योगाने जगाला जिंकता येते. हे गुण अंगी असलेली एकटी व्यक्ती, लक्षावधी ढोंग्यांच्या आणि नरपशूंच्या दुष्ट योजना धुळीस मिळवण्यास समर्थ असते."

आलसिंगा पेरुमल यांना लिहिलेल्या पत्रात स्वामीजी म्हणतात- "ज्यांची नैतिक उच्चाकांक्षा मरून गेली आहे, भावी उन्नतीसाठी जे

मुळीच प्रयत्न करीत नाहीत अशा या मृतवत् लोकात तुम्ही काही चैतन्य निर्माण करू शकाल काय? नाठाळ मुलाच्या छातीवर बसून त्याच्या भल्यासाठी त्याच्या नरड्यात औषध ओतण्याच्या वैद्याची भूमिका तुम्ही घेऊ शकाल काय?"

भारतातील काम हे असे अवघड होते. स्वामीजींनी जे आव्हान स्वीकारले होते ते महाभयंकर होते. एखाद्याची छातीच त्याच्या दडपणाने फुटून गेली असेल. एखाद्याला हे सर्व स्वप्नाळूपणाचे वाटले असते पण या योद्धा संन्याशाने दंड थोपटून नियतीचे हे आव्हान स्वीकारले.

संपूर्ण भारतीय समाजाचे अनुशीलन आणि परिशीलन केल्यावर स्वामीजींच्या ध्यानात आले की, भारत वेदांताचा अधिकारी नाही. भारत कर्माचा अधिकारी आहे. भारताला रजोगुणाची अत्यंत आवश्यकता आहे. आपल्या धर्मग्रंथात चार पुरुषार्थ सांगितले आहेत. धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष हे ते चार पुरुषार्थ होत. यात मोक्षाचा तोच अधिकारी आहे ज्याने की पहिले तिन्ही पुरुषार्थ यशस्वीरित्या पार पाडले आहेत. भाकरीची भ्रांत असताना वेदांत सांगणे धांदात खोटे आहे हे या प्रशांत पुरुषाने ओळखले व अवघ्या भ्रांतचित्त समाजाला निर्भ्रान्त अंतःकरणाने सांगितले. "जयाचे ऐहिक धड नाही । तयाचे परत्र पुससी काई ।" हा विचार संत ज्ञानदेवांनी तेराव्या शतकात मांडला होता.

प्रपंची जो अप्रमाण । तो परमार्थी खोटा ।। या परखड शब्दानं समर्थ रामदासांनी त्याची आठवण लोकांना करून दिली होती. परंतु कुंभकर्णासारखा निष्क्रिय, स्थितीशील, निद्राधीन भारतीय समाज अजूनही जागा झालेला नव्हता. भारतातील अज्ञान आणि दारिद्र्य ही निःस्पृहतेची लक्षणे नव्हती. तो आमच्या तमोगुणाचा प्रभाव होता आणि सर्वात दुर्दैवाची गोष्ट कोणती असेल तर ती म्हणजे या देशात ही तामसिकता, ही निष्क्रियता अध्यात्माच्या नांवाखाली जोपासली जात होती वैराग्याच्या नावाखाली विपन्नावस्थेचे संगोपन होणे हा होता या देशाचा दैवदुर्विलास. अहिंसेच्या नांवाखाली दौर्बल्याचे पोषण हा सामाजिक रोगच या देशाला जडला होता. भारताची अप्रतिकार शक्ती मनःशांतीतून जन्माला आली नव्हती. भारतीयांची शक्ती ही क्षमावृत्तीतून उदित झालेली नव्हती. ही अप्रतिकारता व ही शांती न्यूनगंडातून, आत्मविश्वासाच्या अभावातून जन्मलेली होती.

'कर्मयोग' या पुस्तकात स्वामीजी म्हणतात - 'अहिंसा परमो धर्मः' असल्याच्या गोंडस सबबीवर 'न योत्स्ये' म्हणून अर्जुन युद्धपराङ्मुख होताच श्रीकृष्णांनी क्लीब नि दांभिक संबोधून त्याची निर्भर्त्सना केल्याचे वर्णन आहे. आम्ही सर्वांनीच शिकावा असा हा एक प्रमुख व महत्त्वाचा धडा आहे की, प्रत्येक बाबतीतील दोन्ही विरुद्ध टोके दिसावयास अगदी सारखीच दिसत असतात; आत्यंतिक 'अस्ति' व आत्यंतिक 'नास्ति' आत्यंतिक धनात्मक आणि आत्यंतिक ऋणात्मक गोष्टी नेहमी सारख्याच भासत असतात. प्रकाशकंपने अत्यंत मंद अवस्थेत आपल्या दृष्टीस गोचर होत नसतात. अति द्रुत कंपनांचीही तीच गत. ध्वनींचेही असेच. अतिक्षिण वा मृदू असल्यास तो ऐकू येत नाही. 'प्रतिकार' व 'अप्रतिकार' यामधेही अशाच स्वरूपाचा फरक आहे. एकजण अन्यायाचा कसलाच प्रतिकार करीत नाही कारण तो दुर्बळ, आळशी व प्रतिकार करण्यास असमर्थ असतो. प्रतिकाराची इच्छाच नसल्यामुळे तो प्रतिकार करीत नाही असे नव्हे. दुसऱ्या एखाद्याला पक्की खात्री असते की, मनात आणल्यास तो जबरदस्त तडाखा लगावू शकेल आणि तरीही तो केवळ तसे करीत नाही. इतकेच नव्हे तर आपल्या शत्रूला आशीर्वाद देतो. जी व्यक्ती दुबळेपणामुळे प्रतिकार करीत नाही तिला पाप लागते. अत एव तिच्या ह्या 'अप्रतिकारा' पासून तिला कसलाच लाभ होणे शक्य नाही. ह्याच्या उलट जर त्या दुसऱ्या समर्थ व्यक्तीने 'प्रतिकार' केला तर तिने देखील पाप केल्यासारखे होईल. बुद्धदेवांनी सिंहासनाला लाथ मारून आपल्या राजपदाचा त्याग केला. ह्याला त्याग म्हणता येईल. परंतु ज्याच्या जवळ त्याग करण्यासारखे काहीच नाही अशा एखाद्या कंगालाच्या बाबतीत त्याग करण्याचा मुळीच प्रश्न उद्भवू शकत नाही आणि म्हणून, ह्या 'अप्रतिकारा'च्या नि 'आदर्श प्रेमाच्या' गोष्टी बोलताना आपल्याला खरोखर काय म्हणायचे आहे इकडे विशेष लक्ष देणे नेहमीच अत्यावश्यक असते. आपल्यात प्रतिकाराची शक्ती आहे किंवा नाही हे आधी काळजीपूर्वक अजमावून पाहाणे अत्यंत उचित होय. त्यानंतर मग अंगी शक्ती असूनदेखील जर आपण प्रतिकाराचा थोडाही प्रयत्न करणार नाही तर आपण प्रेमाने प्रेरित होऊन खरेखरे महत्कार्य केले असे म्हणता येईल. पण जर का आपल्यात प्रतिकाराची शक्ती नसेल आणि तरीही स्वतःची प्रतारणा करून, 'आपण अति उच्च प्रेमाने प्रेरित होऊन कार्यास प्रवृत्त होत आहोत' अशी आपल्याच मनाची समजूत घालण्याचा आपण खटाटोप करू लागलो, तर मात्र आपण आपल्या बोलण्याच्या अगदी विरुद्ध आचरण करीत आहोत असेच म्हणणे भाग पडेल.

'अप्रतिकाराच्या' त्या सर्वोच्च आदर्शप्रत पोहोचण्यापूर्वी 'प्रतिकार' करणेच त्याचे कर्तव्य होय. त्याला कर्म करावे लागेल, सारी शक्ती एकवटून उद्यमाची शिकस्त करून चढाओढ करावी लागेल. त्याच्या ठायी जेव्हा ही प्रतिकाराची शक्ती येईल तेव्हाच कुठे 'अप्रतिकार' त्याच्या पक्षी धर्म ठरेल. एकदा स्वदेशात माझी एका परिचित इसमाशी गाठ पडली. स्वारी पराकाष्ठेची निर्बुद्ध नि आळशांचा राजा असल्याचे मला आधीपासून ठाऊक होते. ज्ञानाच्या नांवाने पूज्य, ज्ञानलाभाची स्पृहाही बिंदूमात्र नाही असे पशुतुल्य जीवन तो जगत होता. माझ्याशी भेट होताच राजेश्रींनी पृच्छा केली.'

"ब्रह्मज्ञानाच्या लाभासाठी मी काय करू? कशाने मला मुक्ती लाभेल?" मी त्याला विचारले, "तू खोटे बोलू शकतोस काय?" त्याने

उत्तर दिले नाही. त्यावर मी म्हणालो, "तर मग तुला खोटे बोलणे शिकावे लागेल. एखाद्या पशूसारखे किंवा लाकडाच्या ठोकळ्यासारखे असण्यापेक्षा खोटे बोलणे चांगले. तू निष्क्रिय आहेस, पण अर्थातच सर्वकर्मातीत, शांत, गंभीर अशी जी सर्वश्रेष्ठ निष्क्रियावस्था ती तुला लाभलेली नाही हे तर नक्कीच. एखादे दुष्कर्महीही हातून होऊ शकणार नाही. इतका तू जड प्रकृतीचा आहेस." अर्थातच मी हे ज्या माणसाविषयी बोलत आहे, त्याच्याइतके तामसिक प्रकृतीचे लोक साधारणतः आढळत नाहीत, आणि मी थट्टा करीत होतो हेही तितकेच खरे, पण माझ्या म्हणण्याचा अभिप्राय मात्र हाच होता की, संपूर्ण निष्क्रिय अवस्था वा शांत भाव प्राप्त करून घ्यावयाचा असल्यास माणसाला कर्मशीलतेमधूनच जावे लागेल."

सर्वसामान्य मनुष्याला सुख आणि संपत्ती यांचे स्वाभाविक आकर्षण असते. त्यामध्ये तसे काही वावगे देखील नाही. संतांनी स्त्रीजातीविषयी जे विपरीत लिहिले आहे त्यामध्ये स्त्रीजातीची निंदा नसून परस्त्रीकडे पापी बुद्धीने पाहण्याची पुरुषांची जी मनोवृत्ती त्याबद्दलची ती चीड आहे. तसेच संतांनी संपत्ती आणि वैभव याबद्दल जे तुच्छतादर्शक लिहिले आहे त्यामध्ये वाममार्गाने संपत्ती मिळविणे अथवा माणसांपेक्षा संपत्तीला जास्त महत्त्व देणे याबद्दलचा संताप आहे. परंतु स्त्री आणि संपत्ती यांचे सन्मानपूर्वक आणि संयमपूर्वक सेवन शास्त्राला धरुनच आहे. संताच्या ह्या वचनाचा नेमका अर्थ न कळल्यामुळे त्याबद्दल समाजात विपरीत भावना निर्माण झाली. काही तथाकथित विचारवंतांनी संतांचे अंतःकरण समजावून न घेता संतांनी समाज निष्क्रिय केला असा घाईघाईने निष्कर्ष काढला. म्हणून स्वामीजींनी अहिंसा आणि वैराग्य या संकल्पना स्पष्ट केल्या आणि रजोगुणाचे समर्थन केले.

तमोगुण हा नेहमी सत्वगुणाचा मुखवटा धारण करूनच व्यक्त होतो. कारण त्याशिवाय त्याला सामाजिक प्रतिष्ठा प्राप्त होत नाही. भारतीयांची आळशी वृत्ती, निष्क्रियता, द्वेष, मत्सर ही सारी वृत्ती वैराग्य शांती, अहिंसा यांचे मुखवटे धारण करून जोपासली जात होती आणि हीच स्वामीजींची नेमकी खंत होती. सतराव्या शतकापूर्वीचे (शिवसमर्थ कालखंडापूर्वी) एक साधे उदाहरण पाहू. संत एकनाथांवर एक यवन थुंकला. एकशे आठवेळा त्याने तो प्रमाद केला. नाथ शांतिब्रह्म होते. त्यांनी ते सहन करण्यात त्यांच्या संतत्वाचेच दिव्य दर्शन घडते. प्रश्न आहे पैठणमधील इतर जनतेचा! ते त्यावेळी काय करीत होते? सारी पैठणकर मंडळी तर शांतिदूत झाली नव्हती ना? पैठणमधील बाकीच्या मंडळींनी नाथांचे रक्षण का केले नाही? त्यांनी त्या यवनास ताडन का केले नाही? एकटे नाथ सत्वगुणी होते. बाकीचा समाज तमोगुणी होता. पण नाथांच्या शांतीचा मुखवटा त्या दुबळ्या समाजाने धारण केला होता. नाथ स्वतः बलसंपन्न होते. त्यांचे गुरू जनार्दन स्वामी त्यांच्या आज्ञेवरून नाथांनी लढाई केल्याची व त्यात विजय संपादन केल्याची नोंद आहे. त्यांना त्या यवनाला धडा शिकवणं अवघड नव्हते. आम्ही धड नाथांची व तुकोबांची अवस्था प्राप्त करून घेतली नाही. मात्र त्यांची नक्कल तितिक्षेच्या बाबतीत केली आणि मुळात ती तितिक्षाही नव्हती. तो एक मानसिक रोग होता. संपूर्ण भारतभ्रमणांत स्वामीजींच्या हे लक्षात आले की, भारताला संपन्न व्हावे लागेल. वैभवशाली व्हावे लागेल. अज्ञान व दारिद्र्य यांनी ग्रस्त झालेल्या भारताला जर जगाला अद्वैत तत्त्वज्ञान प्रदान करावयाचे असेल तर त्याला आधी आपला पुरुषार्थ वाढवावा लागेल. दुबळ्या लोकांचे तत्त्वज्ञान कुणीही ऐकून घेणार नाही व स्वीकारणार नाही. तेव्हा भारताला महत्त्वाकांक्षी व्हावे लागेल. काळाची पावले ओळखून त्याला औद्योगिक क्रांती करावी लागेल. भारतीयांना क्रियाशील करण्यासाठी स्वतः संन्याशांना क्रियाशील व्हावे लागेल. म्हणजे त्यांची कर्मप्रवणता पाहून गृहस्थाश्रमी लोक कर्मप्रवण होतील.

म्हणून स्वामी विवेकानंदांनी अमेरिका व इंग्लंड या राष्ट्रात वेदांतावर व्याख्याने दिली. भारतात मात्र स्वामीजी सर्वत्र कर्मयोगावर बोलले. पाश्चात्य जगतात रजोगुणाचा अतिरेक झाला होता. त्यांना सत्वगुणाची गरज होती. भारतीय लोक कमालीचे तमोगुणी झाले होते. म्हणून त्यांना रजोगुणाची आवश्यकता होती. म्हणून भारतात आपण कर्मयोगावर का भर देतो याचा खुलासा करताना स्वामीजी म्हणाले, "या देशात आधी Ground (जमीन) तयार करावी लागेल. पश्चिमेची भूमी तयार आहे. पोटभर खायला मिळत नसल्याने सुकून गेलेल्या देहांच्या आणि दुबळ्या मनांच्या लोकांपुढे व्याख्याने देण्यात काय अर्थ? रोगशोकांचे आणि दुःखदैन्यांचे आगरच अशा भारतात लेक्चरेबिक्चरे देण्यात काय हशील? पहिल्या प्रथम काही त्यागी माणसांची गरज आहे. स्वतःच्याच संसाराच्या चिंतेत न घुटमळता दुसऱ्यांसाठी जीवन अर्पिण्यास तयार होतील अशा माणसांची गरज आहे. मठ स्थापून मी काही तरुण संन्याशांना अशाच रीतीने तयार करीत आहे, मठातील अध्ययन समाप्त झाल्यानंतर ते दारोदारी जाऊन सर्वांना त्यांच्या आजच्या शोचनीय अवस्थेची नीट जाणीव करून देतील. त्याचबरोबर, ह्या अवस्थेत बदल घडवून स्वतःची उन्नती कशी करून घेता येईल हेही त्यांना शिकवतील आणि त्याबरोबरच धर्माची महान् तत्त्वे सोप्या शब्दांत अगदी सुबोध रीतीने समजावून देतील. बघत नाहीस? पूर्वाकाशांत अरुणोदय होऊन गेला आहे. सूर्य उगवायला आता फार उशीर नाही. हीच वेळ आहे. तुम्ही लोक कंबर बांधून कामास लागा, संसार फंसार करून काय होणार आहे? तुमचे आता कार्य म्हणजे प्रांतोप्रांती, शहरोशहरी, खेडोपाडी जाऊन लोकांना समजावून देणे, पटवून देणे की, आता आणखी आळसात लोळत सुस्तपणे बसून चालावयाचे नाही. शिक्षणहीन, धर्महीन अशा त्या लोकांना आजच्या अवनीतीची जाणीव करून देऊन समजावून सांगा की 'बंधूनो, उठा, जागे व्हा, आणखी किती दिवस घोरत पडणार?' अन् शास्त्रांतील महान् महान् सत्ये त्यांना

समजतील अशा भाषेत विशद करून सांगा. इतके दिवस या देशातील फक्त ब्राह्मणांनीच धर्माचा मक्ता घेतला होता. पण कालगतीपुढे ते सारे टिकू शकले नाही. म्हणून आता तो धर्म देशातील सर्वच लोकांच्या उपयोगी पडू शकेल. अशी काहीतरी व्यवस्था करा. जा, सगळ्यांना समजावून सांगा की, ब्राह्मणांप्रमाणेच तुमचाही धर्मावर समान अधिकार आहे. आचंडाल सर्वांना या अग्निमंत्रांची दीक्षा द्या, आणि सरळ सोप्या भाषेत त्यांनी शेतकी, उद्योगधंदे वगैरे गृहस्थजीवनाला अत्यावश्यक बाबींचे शिक्षण द्या. नाहीतर धिक्कार असो तुमच्या शिकण्यासवरण्याला आणि तुमच्या वेदवेदान्त वाचण्याला! जा, कामाला लागा. किती दिवस जगणार तरी आहांत? जन्मास आला आहात तसे एखादे चिन्ह मागे ठेवून जा. एरवी झाडेझुडपेही तर उपजतात नि मरतात. तसे जन्मणे आणि मरणे माणसाला कधीतरी रुचेल काय? मला प्रत्यक्ष कार्य करून दाखवून द्या की तुमचे वेदांना वाचणे सार्थकी लागले आहे. जाऊन सर्वांना ही गोष्ट ऐकवा, की तुम्हा सर्वांमध्ये अनंत शक्ती विद्यमान आहे. त्या शक्तीला जागी करा." केवळ आपलीच मुक्ती साधून काय होणार? मुक्तीची कामना ही तर महास्वार्थीपणा होय. दे फेकून मुक्ती बिक्ती मी ज्या कामाला लागलो त्याच कामाला लागून जा. तुम्ही लोक याप्रमाणे आधी जमीन तयार करा. माझ्यासारखे शेकडो, हजारो विवेकानंद मग व्याख्याने देण्यासाठी पृथ्वीच्या पाठीवर निपजतील. त्याची काही काळजी नको.

हेच बघा ना, जे आधी समजत होते की, आपल्यात काही शक्ती नाही, तेच आता सेवाश्रम, अनाथाश्रम, दुष्काळनिधी वगैरे कितीतरी उभारत आहेत! पाहात नाहीस-निवेदिता इंग्रजांची मुलगी असूनही तुम्हा लोकांची सेवा करायला शिकत आहे अन् तुम्ही लोक स्वतःच्या देशातील लोकांसाठी तसे करू शकणार नाही? जिथे रोगराई पसरली आहे, जिथे जीव दुःखात पडले आहेत, जिथे दुष्काळ पडला आहे-तडक निघून जा तिथे. फार फार तर मरशील, इतकेच ना? तुझ्यामाझ्यासारखे किडे जन्मतात आणि मरतात - त्यात जगाचे काय कमी जास्त झाले? एक महान उद्देश घेऊन तरी मर. मरणार तर आहेसच. मग उच्च उद्देश घेऊन मरणे चांगले, ह्या आदर्शाचा घरोघरी प्रचार कर. स्वतःचे आणि देशाचे मंगल होईल. तुम्हा लोकांवरच तर देशाचा भरवसा. तुमच्यावर देशाची आशा, भिस्त सारे काही. तुम्हा लोकांना कर्महीन बघितल्याने मला मोठे कष्ट होतात. कामाला लागा. उशीर करू नका. मरण तर दिवसेंदिवस जवळजवळ येत आहे! 'मग करू' म्हणून आता आणखी हातपाय गुंडाळून बसू नकोस नाहीतर काहीसुद्धा व्हायचे नाही!"

*सुनील चिंचोलकर,*
*३२१, शुक्रवार, पुणे-२.*

# मानवसेवा हीच ईश्वरपूजा

डॉ. स्वर्णलता भिशीकर

**तो मी सर्व भूतांच्या अन्तरी...**

ईश्वराच्या निर्गुण स्वरूपाचे ज्ञान आणि साक्षात्कार आजवर फारच थोड्या लोकांना शक्य झाला आहे. 'तुज सगुण म्हणू की निर्गुण रे, तू सगुण निर्गुण एक गोविंदु रे' असा उभयविध साक्षात्कार असलेले श्री ज्ञानेश्वर महाराजांसारखे संत विरळा. बहुतेक सत्पुरुषांनी सगुणाच्या मनोहारी रूपांची भक्ती केलेली आपल्याला दिसते. 'तुळसीहार गळा कासे पीतांबर' हे वेध लावणारे विठ्ठलरूप किंवा 'मुरलीधर मनमोहन' श्रीकृष्णरूप अथवा धनुर्धारी रामरायाचे रूप संतांना प्रिय होते. त्याची कास धरून ते निर्गुणाकडे गेले आणि मग चराचरात तोच परमेश्वर नटून राहिल्याचा अनुभव त्यांनी घेतला. जड अशा काष्ठपाषाणापेक्षा चेतन अशा वृक्षवेलींमध्ये परमेश्वर अधिक उत्कटतेने प्रत्ययास येतो. त्याहून चेतन अशा पशुपक्ष्यांच्या सृष्टीत परमेश्वराचे उत्कटतर दर्शन घडते, आणि मनुष्य किंवा नर हे तर नारायणाच्या अभिव्यक्तीसाठी अधिकच सुलभ माध्यम ठरते. असे संतांना अनुभवास आले. गीतेमध्ये भगवान श्रीकृष्ण अर्जुनाला सांगतात -

*ईश्वरः सर्व भूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ।*
*भ्रामयन् सर्व भूतानि यन्त्रारूढानि मायया ॥ (१८-६१)*

ईश्वर सर्व भूतमात्रांच्या हृदयात वास करतो. सूत्रधार ज्याप्रमाणे कठपुतळ्या नाचवितो त्याप्रमाणे तो सर्व भूतमात्रांच्या जीवनक्रिया खेळवीत असतो.

ज्ञानेश्वर महाराजांनी वरील श्लोकाचा पूर्वार्ध एका सुंदर ओवीत आणला आहे -

*तो मी सर्व भूतांच्या अन्तरी, हृदय महाअंबरी ।*
*चिद्वृत्तींच्या सहस्रकरी, उदैजत असे ॥*
*म्हणून जे जे भेटिजे भूत, ते ते मानिजे भगवन्त ।*
*हा भक्तियोग निश्चित जाण माझा ॥*

अशी भक्तीची व्याख्या ज्ञानेश्वरांनी केली आहे. आपण जेव्हा आपल्या भोवतीच्या माणसांकडे पाहतो, तेव्हा त्यांचे ईश्वरस्वरूप आपल्या ध्यानी येत नाही. त्यांची सुष्ट वा दुष्ट प्रकृती ध्यानी येते. शरीराचे, कांतीचे गुणधर्म ध्यानी येतात, बरे वाईट बोलणे ध्यानी येते. प्रकृतीच्या अंगाने पाहिले तर जगात खूप भिन्नता, नानाविधता आहे. पण ईश्वराच्या अंगाने पाहिले तर या भिन्न-भिन्न प्रकृतींमध्ये एकच आत्मतत्त्व नटलेले आहे, असा जाणत्यांना अनुभव येतो. 'मागे पुढे विठ्ठल भरला, रिता ठाव नाही उरला' असे तुकाराम महाराजांनी या अनुभवाचे वर्णन केले आहे.

केवळ बुद्धीच्या पातळीवर हा अनुभव असला तर ती व्यक्ती रुक्ष, घटपटांची खटपट करणारी होईल. पण जाणिवेच्या सर्व पातळ्यांना जेव्हा आत्मानुभवाचे स्नान घडते तेव्हा व्यक्तीमध्ये मूलभूत परिवर्तन होते. ज्ञानाबरोबर भावही जागृत होतो. वेदान्त ही आचरण करण्याची गोष्ट स्वाभाविकपणे बनून जाते. त्यासाठी प्रयास करावे लागत नाहीत. श्रीरामकृष्ण यांनी वेदान्ताची चर्चा फारशी केली नाही. ते वेदान्त साक्षात जगले. त्यांच्या जगण्यावरून अद्वैत वेदान्त म्हणजे काय ते जगाने समजून घेतले. गणिकांच्या ठिकाणी ते जगदंबा पाहू शकत होते आणि भंग्यांची घरे आपल्या केसांनी पुसून जगन्मातेची सेवा करण्याचा आनंद ते लुटू शकत होते.

**शिवभावाने जीवसेवा**

स्वामी विवेकानंदांनी जेव्हा मोक्षसुखात मग्न राहण्याची इच्छा व्यक्त केली तेव्हा श्रीरामकृष्ण रागावून म्हणाले, की माझी अपेक्षा होती तू मोठा वटवृक्ष बनशील, पण तू तर एवढीशीच आकांक्षा बाळगतोस! श्रीरामकृष्णांचे व्यक्तिगत मोक्षाने समाधान नव्हते. 'उपासनेसि लावावे जग' अशी आकांक्षा त्यांना होती. योग्य मार्ग न मिळाल्याने भांबावून भटकणाऱ्या जीवांविषयी अपार करुणा त्यांच्या चित्तात होती. एका मनुष्याने दुसऱ्या मनुष्याला केलेले सर्वश्रेष्ठ साहाय्य म्हणजे त्याला आत्मस्वरूपाची ओळख करून देणें होय. हे कार्य मानवजातीसाठी स्वामी विवेकानंदांनी करावे अशी त्यांची अपेक्षा होती.

म्हणून मे १८९७ मध्ये श्रीरामकृष्ण संघाची स्थापना झाली तेव्हा 'शिवभावाने जीवसेवा' हेच त्या कार्याचे प्राणसूत्र ठरले. या दोन शब्दांमध्ये आशयाचे फार मोठे विश्व सामावलेले आहे. जीव हा भ्रान्त आहे. त्याला आपल्या शिवस्वरूपाचे आकलन झालेले नाही. पण 'नायमात्मा बलहीनेन लभ्यः ।' असेही श्रुतिवचन आहे. क्षीण शरीराने, दुर्बल मनाने, अशक्त बुद्धीने आत्म्याचे ज्ञान होऊ शकत नाही. भुकेल्या पोटी उपासना होणार नाही. म्हणून शिवाचे वसतिस्थान जे शरीर, ते प्रथम चांगले केले पाहिजे. जीवसेवेमध्ये पोषण, संगोपन हे सर्व आले. रुग्णसेवाही आली. आपत्ती निवारण कार्याचा त्यातच समावेश झाला. या सर्वांची उपेक्षा करून शिवाची सेवा होऊ शकत नाही.

*न त्वहं कामये राज्यं न स्वर्गं नापुनर्भवम् ।*
*कामये दुःखतप्तानां प्राणिनां अर्तिनाशनम् ॥*

'मी राज्याची, स्वर्गाची वा मोक्षाचीही कामना धरीत नाही. दुःखितांचे दुःख दूर करावे एवढीच कामना मला आहे' हे महाभारतातील

वचन व्यावहारिक वेदान्ताचाच एक उत्कट उद्गार आहे!

**'मनात करुणा रुजविली पाहिजे!'**

स्वामी विवेकानंदांनी म्हटले आहे, 'इतरांविषयी तुमच्या मनात ओलावा असतो का? असेल तर तुमची आत्मौपम्य बुद्धीकडे वाटचाल सुरू आहे आणि तुमच्या मनात कोणाविषयी ओलावा नसेल तर तुम्ही प्रकांड पंडित असलात तरी काही उपयोग नाही - कोरडे पाषाण राहाल तुम्ही!

जगाचा इतिहास तुम्ही वाचला आहे का? महापुरुषांचे, प्रेषितांचे सामर्थ्य कशात असते ते तुम्हास कळले आहे का? त्यांच्या बुद्धीत असते का ते? कोण्या प्रेषिताने तत्त्वज्ञानावर किंवा तर्कशास्त्रातील कूटांवर भाष्य लिहिल्याचे तुमच्या ऐकिवात आहे काय? असल्या गोष्टी त्यांच्यापैकी कोणी केल्या नाहीत. ते शब्दही अगदी मोजकेच बोलले. ख्रिस्ताची करुणा तुमच्या ठिकाणी प्रकटू द्या म्हणजे तुम्ही ख्रिस्तच व्हाल. बुद्धाचे थोर प्रेम तुमच्या अंतःकरणात उदेजू द्या म्हणजे तुम्ही बुद्धच व्हाल.

भावना हेच जीवन आहे. भावनेची शक्ती, भावनेची उत्कटता, यांवाचून केवळ बौद्धिक कसरतींनी कोणी परमेश्वराकडे पोहोचत नाही. बुद्धी ही चैतन्यरहित अवयवांसारखी असते. तिच्यात जेव्हा भावनेचा संचार होतो तेव्हा ती गतिशील होते आणि कार्य करू लागते. जगाच्या पाठीवर सर्वत्र तुम्हाला असेच आढळेल. म्हणून तुम्ही सदैव मनात करुणा रुजविली पाहिजे. (हिंदूतेजा जाग रे! पृ. १०७)

**दरिद्रदेवो भव**

स्वामीजींचे गुरूबंधू स्वामी अखंडानंद यांच्या हृदयात या करुणेचा शुभंकर निर्झर सदैव वाहता होता. त्यातून अनेक सेवाकार्ये आकाराला आली. राजस्थानमध्ये फिरताना त्यांनी अपार दारिद्य, शेतमजुरांचे हाल पाहिले. त्यांनी स्वामीजींना लिहिले, 'लोकांमध्ये अपार दैन्य आहे. आपण तर संन्यासी. आपले कर्तव्य काय?' स्वामीजींनी उत्तर लिहिले, 'केवळ श्रीरामकृष्णांचे नाव मुखाने घेत राहण्यापेक्षा खेत्रीच्या भागात जे कोणी गोरगरीब व खालच्या जातींचे लोक असतील त्यांच्या घराघरातून जा. त्यांना जीवनाला उपयोगी पडेल अशी विद्या आणि धर्म दोन्हींचे शिक्षण दे. भगवे वस्त्र हे काही भोगासाठी नाही. ते महत्कार्याचे निशाण आहे. "मातृ देवो भव । पितृ देवो भव ।" असे आजवर तुम्ही वाचले आहे. पण मी तर म्हणतो की 'दरिद्र देवो भव । मूर्ख देवो भव ।' दरिद्री आणि अज्ञानी हेच तुमचे देव होवोत. त्यांची सेवा हाच परमधर्म. याहून अधिक काय सांगणार?'

स्वामीजींचे हे शब्द स्वामी अखंडानंदांनी शिरोधार्य मानले. बंगालमधील दुष्काळात महुला येथे श्रीरामकृष्ण संघाचे पहिले अधिकृत दुष्काळनिवारण केंद्र त्यांनी उभे केले. त्यानंतर रामकृष्ण संघाच्या सेवाकार्यांची मोठी मालिकाच निर्माण झाली. आजपर्यंत ती अधिकाधिक समर्पित संन्याशांच्या बळावर वाढत राहिली आहे. कोयना, बिहार येथील भूकंपांमध्ये, आंध्र वादळलाटेने उत्पन्न केलेल्या अनर्थात रामकृष्ण मठाने मोठमोठी मदतकार्ये चालविली. भारतीय समाजाला मानवसेवेतून चाललेली ही ईश्वरपूजा प्रारंभी मानवली नाही.

**'भंगी' संन्यासी**

स्वामी रंगनाथानंदजी महाराज यांनी आपल्या एका व्याख्यानात वाराणशीच्या 'भंगी' संन्याशाची गोष्ट सांगितली होती. रामकृष्ण संघाचे रुग्णालय वाराणशीत सुरू झाले तेव्हा तेथील स्थानिक लोकांमध्ये नापसंतीची प्रतिक्रिया उमटली. भगवी वस्त्रे घालणारे संन्यासी रुग्णांना तपासत आहेत, औषधे देत आहेत, सर्व प्रकारची शुश्रूषा करीत आहेत, हे चित्र वाराणशीला नवीन होते. संन्याशांनी ध्यान करावे, पूजा करावी, वेदान्तावर वाद करावेत, पण रुग्णांची शरीर स्वच्छता? छे! छे! या सेवाभावी संन्याशांवर वाराणशी नगरीतील सनातनी मंडळींनी बहिष्कार घातला. रामकृष्ण संघाच्या कार्यक्रमांना ही मंडळी उपस्थित राहत नसत. असा उपेक्षेचा काही काळ गेला. हळूहळू या सेवाव्रती संन्याशांविषयी समाजात आदर निर्माण होऊ लागला. बहिष्कार संपला. 'भंगी संन्यासी' म्हणून होणारी हेटाळणी थांबली. त्यांची जागा आदर नि भक्तिभावनेने घेतली.

**ख्रिस्ती धर्मातील सेवाव्रत**

भारतीय संन्यासधर्मात सेवेला प्रथम स्थान नव्हते. पण ख्रिस्ती संन्यासधर्मात होते. ख्रिस्ती मिशनरी आफ्रिकेसारख्या जंगलात भयंकर संकटांशी सामना करीत धर्मप्रसाराचे काम करीत होते. सुप्रसिद्ध लेखिका पर्ल बक यांचे वडील चीनमध्ये धर्मोपदेशक म्हणून काम करीत होते. भगिनी निवेदिता यांचेही वडील धर्मोपदेशक होते. आजही भारतात ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या मोठ्या संघटना सेवाकार्ये करीत आहेत. वेलोरच्या आयडा स्कडर आणि कलकत्त्याच्या आजच्या काळातल्या मदर तेरेसा ही नावे आपल्याला परिचित आहेत. भगिनी निवेदितांना 'The imitation of Christ' हे पुस्तक फार आवडत असे. त्यात म्हटले आहे –

'If you intend to seek nothing else but the will of God and the good of your neighbour, you shall thoroughly enjoy inward liberty. If your heart were right, then every creature would be mirror of life and a book of holy doctrine.'

*(The Imitation of Christ, Thomas A. Kempis P. 69)*

'तुम्ही जर ईश्वरेच्छेशिवाय आणि भोवतालच्यांचे शुभ व्हावे याशिवाय अन्य कोणती आकांक्षा धरत नसाल तर आंतरिक मुक्तीचा आनंद तुम्हाला लाभल्यावाचून राहणार नाही. तुमची भावना शुद्ध असेल तर जीवनचैतन्याचे प्रतिबिंब तुम्हाला सर्व भूतमात्रात दिसेल. प्रत्येक व्यक्ती तुम्हाला धर्मग्रंथाप्रमाणे प्रिय आणि पूजनीय वाटेल.'

आजच्या काळातल्या एक आत्मदर्शिनी श्रीमती विमला ठकार यांनी अशा सेवेला आत्मोत्सर्ग असे म्हटले आहे. फार मोठा आनंद-निर्विषय आनंद साठविलेला आहे, असे म्हटले आहे.

**निष्काम आणि निरपेक्ष**

पण ख्रिस्ती धर्माच्या प्रेरणेने सुरू झालेल्या सेवाकार्यात आणि रामकृष्ण संघाच्या सेवाकार्यात एक महत्त्वाचा फरक आहे. मिशनऱ्यांची सेवाकार्ये मनःपूर्वक प्रेमाने चाललेली असली तरी जीवाचे अंतिम कल्याण येशूला शरण जाण्यातच आहे. अशी ठाम धारणा सर्व ख्रिस्ती मिशनऱ्यांमध्ये आढळून येते. उलट स्वामीजींनी निःसंदिग्धपणे सांगितलेले आहे, की आपल्या धर्माचे अनुसरण करत प्रत्येक जण अंतिम आनंदाची, कैवल्याची प्राप्ती करून घेऊ शकतो. ते म्हणतात –

'Do I wish that the Christian would become Hindu? God forbid! Do I wish that the Hindu or Buddhist should become Christian? God forbid...... But each one must assimilate the spirit of others and yet preserve his individuality and grow according to his law of growth.'

(Complete Works — Volume II P. 22 of Swami Vivekananda)

ख्रिश्चनांनी हिंदू व्हावे किंवा हिंदू व बौद्धानीं ख्रिश्चन व्हावे असे मला वाटते काय? ईश्वर करो नि तसे न होवो. पण प्रत्येकाने इतर धर्मांचे मर्म आत्मसात करून आपल्या स्वतःच्या पद्धतीने विकास करून घेतला पाहिजे.'

श्रीरामकृष्ण संघाच्या सेवाकार्यामागे हा व्यापक नि उदार दृष्टिकोन आहे. स्वामी अखंडानंदांनी सुरू केलेल्या अनाथाश्रमात सर्व जाती- धर्मांची बालके होती आणि त्यांना आपापल्या पद्धतीने प्रार्थना करण्यासाठी ते प्रोत्साहन देत स्वामीजींनी शिकागोच्या धर्म परिषदेत जो मंत्र म्हटला –

*रुचीनां वैचित्र्यात् ऋजुकुटिल नाना पथजुषाम् ।*
*नृणामेको गम्यस्त्वमसि पयसामर्णव इव ॥*

त्याचा आचार रामकृष्ण संघामध्ये आणि त्याच्या सेवाकार्यांमध्ये अशा रीतीने प्रतिबिंबित झालेला दिसतो. कुठलाही अभिनिवेश धरून केलेली मानवसेवा ही पूजेत उन्नीत होऊ शकत नाही. सेवा ही निष्काम, निःस्वार्थ आणि निरपेक्ष असली तरच परमेश्वराची पूजा ठरते, अन्यथा नाही.

**'स्वकर्मणा तमभ्यर्च्य....'**

'कर्मे ईशु भजावा' हा गीतेचा संदेश आहे.

*यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततम् ।*
*स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धीं विन्दति मानवः ॥*

*(गीता १८-४६)*

'ज्या परमात्म्यापासून सर्व भूतांची उत्पत्ती झाली आहे, ज्याने हे सर्व जगत व्यापले आहे, त्या परमेश्वराचे आपल्या कर्मांनी पूजन करून मनुष्य परमसिद्धी प्राप्त करून घेतो.'

ब्रह्मार्पण वृत्तीने केलेले सर्वच कर्म ईश्वराप्रत नेते हे खरे असले तरी मानवसेवा हे त्यातही अधिक ईश्वराभिमुख कर्म आहे. सेवेचा धर्म हा सूक्ष्म आणि गहन आहे. भुकेल्याला अन्नदान, वस्त्रहीनाला वस्त्रदान, अज्ञानी मनुष्याला शिक्षण आणि आर्त-रुग्ण मनुष्याची शुश्रूषा ही ठळक सेवाकर्मे आपल्याला दिसतात आणि ती करणे फार महत्त्वाचे आहे, यात शंकाच नाही.

पण स्वामी रंगनाथानंदांसारख्या संन्याशांनी अमेरिका आणि रशिया यांसारख्या संपन्न देशांमध्ये जाऊन व्याख्यान-प्रवचनांमधून जी मानवसेवा केलेली आहे ती सूक्ष्म आणि अनमोल आहे. ती समजून घ्यायला हवी. भारतासारख्या देशात प्राथमिक गरजा भागल्याशिवाय अध्यात्मविचार सांगता येत नाही. पण अमेरिकेसारख्या देशात भौतिक संपत्ती आणि उपभोगांच्या अतिरेकाने माणसाला मनोरुग्णता आली आहे. तरुण पिढी गर्द-हशीशसारख्या मादक व्यसनांना बळी पडताना दिसत आहे. कुटुंबव्यवस्था मोडकळीला येत आहे. वृद्ध माणसे भयाण एकाकीपणाच्या गर्तेत सापडताहेत. तरुण उद्योजकांना निर्घृण व्यावसायिक स्पर्धेला झगडताना हृदयरोगाचे बळी व्हावे लागत आहे.

**अद्वैताचे अधिष्ठान**

अशा या बदलत्या समाजात शाश्वत मूल्यांचे दर्शन घडविणारे तपस्वी त्या समाजाचे दिशादर्शक बनत असतात. मानवी जीवनाचा हेतू काय, तो सिद्धीला जायचा असेल तर व्यक्तिगत जीवनाची, कौटुंबिक आणि सामाजिक जीवनाची मांडणी कशी असली पाहिजे, हे सांगणारा पथदर्शक फार आवश्यक असतो. हे काम स्वामी रंगनाथानंदांनी केले आणि आजही करीत आहेत. पाश्चात्य देशांमध्ये 'वेदान्त सोसायटी' या नांवाने श्रीरामकृष्णांचेच कार्य अनेकानेक संन्यासी आणि गृहस्थ बांधव करीत आहेत. अणुबॉम्बच्या छायेत असलेल्या, युद्धाच्या भयाने पछाडलेल्या या जगाला अद्वैत वेदान्ताची सर्वाधिक गरज आहे. गेल्या शतकात ती स्वामी विवेकानंदांनी पुरविली. या शतकात स्वामी रंगनाथानंदांसारखे थोर संन्यासी ही गरज पूर्ण करीत आहेत.

पाश्चात्त्य देशांमध्ये सेवाकार्य व्यवसाय म्हणून करणाऱ्या काही संघटना आहेत. वृद्ध लोकांसाठी, अपंगांसाठी, मतिमंदांसाठी, पीडीत स्त्रियांसाठी काम करणाऱ्या सामाजिक संस्था आहेत. व्यसनमुक्तीसाठी काम करणाऱ्या संस्था भारतातही आहेत. या संस्थांमध्ये काम करणाऱ्या व्यक्तींनी केलेली मानवसेवा ही ईश्वरपूजा म्हणता येईल का?

**चित्तशुद्धीचे साधन**

कोणत्याही कर्माचे मोल त्यामागील भावनेवर, त्या कर्माच्या हेतूवर अवलंबून असते. असे अनुभवाला आले आहे, की अनेक सेवाभावी संस्थांमधील कार्यकर्त्यांमध्ये श्रेयासाठी स्पर्धा, परस्परांसंबंधी पराकोटीची कटुता, हेवेदावे आढळून येतात. कार्याच्या मूळ हेतूचा विसर पडून बाकी क्षुद्र गोष्टींनाच महत्त्व प्राप्त होऊन बसते. अशा ठिकाणी सतत श्रेष्ठ ध्येयाचे दर्शन घडविणारी कोणी व्यक्ती असेल तर त्या व्यक्तीभोवतीची माणसे सामान्यतेतून वर उठून काम करू शकतात.

सेवेच्या कर्मात अशुद्धी आणणारे विकार मनुष्याच्या चित्तात असतात. त्यापासून सावध राहिले पाहिजे. लोकेषणा आणि वित्तेषणा

या सेवाकर्माला मलिनता आणणाऱ्या गोष्टी आहेत. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात -

*किंबहुना हे मिया केले, हे माझेनि सिद्धी गेले ।*
*ऐसेही नाही ठेविले, वासनेमाजी ॥*
*मी माझे ऐसी आठवण, विसरले जयाचे अंतःकरण ।*
*पार्था तो संन्यासी जाण, निरन्तर ॥*

सेवाकर्म करणाऱ्याला असे केव्हाही वाटता कामा नये हे मी केले, हे माझ्यामुळे पार पडले. मी आणि माझे याचे स्मरणही ज्याला नाही तो संन्यासी.

सेवाकर्माच्या प्रारंभीच एवढी चित्ताची शुद्धी सेवा करणाऱ्याच्या जवळ असेल असे नाही. पण सेवेच्या कर्माचा परिपाक चित्तशुद्धीत होतो आहे की नाही हे त्याने वेळोवेळी पाहिले पाहिजे.

**एक बोधक प्रसंग**

या संदर्भात रामकृष्ण संघातील एका प्रसंगाचा उल्लेख करावासा वाटतो. डॉ. वि. रा. करंदीकर यांच्या 'रामकृष्ण संघ : एक शतकाची वाटचाल' या पुस्तकात ही घटना आली आहे.

वाराणसीमध्ये सेवाश्रम आणि अद्वैताश्रम अशा रामकृष्ण संघाच्या दोन संस्था एकमेकींच्या शेजारी काम करीत होत्या. या दोन ठिकाणच्या व्यक्तींमध्ये किरकोळ गैरसमज आणि स्वभावाचे कंगोरे यांमुळे दुरावा उत्पन्न झाला. रामकृष्ण संघाचे सर कार्यवाह स्वामी सारदानंद हे वाराणसीला आले. सर्व मंडळींचे त्यांनी शांतपणे ऐकून घेतले. खटके उडणार नाहीत यासाठी व्यावहारिक काळजी जी काही घेणे आवश्यक होती तिची व्यवस्था त्यांनी केली. ते सर्वांपुढे हात जोडून उभे राहिले आणि त्यांनी नम्रपणे विनंती केली की छोट्या गोष्टींवरून कलह करू नका. परस्परांवर प्रेम करण्यास शिका. त्या बळावरच अखेर सारे प्रश्न सुटतील.' पण स्वामी सारदानंदांनी निर्माण केलेली शांतता फार काळ टिकली नाही. विसंवादाचे वारे फिरून वाहू लागले. शेवटी सारदानंद रामकृष्ण संघाचे अध्यक्ष स्वामी ब्रह्मानंद यांना घेऊन वाराणसीला गेले. स्वामी ब्रह्मानंद कोणत्याही तक्रारीत प्रत्यक्ष शिरले नाहीत. कामाच्या पद्धतीत काय सुधारणा व्हायला पाहिजे याचीही चर्चा त्यांनी केली नाही. मात्र ज्याला आध्यात्मिक जीवन म्हणतात ते कोणत्या स्वरूपाचे असते, किती उदात्त पातळीवरील असते आणि ते आत्मसात् करण्यासाठी साधकाने आपली वृत्ती कशी ठेवावी लागते, याबद्दल ते प्रत्येकाशी स्वतंत्रपणे आणि सर्वांशी एकत्रितरीत्या बोलत राहिले. ३० जानेवारी १९२१ ला विवेकानंदांच्या जन्मतिथीला ब्रह्मानंदांनी एकूण पस्तीस तरुणांना ब्रह्मचर्य व संन्यास व्रताची दीक्षा दिली. जन्मतिथीनिमित्त झालेल्या सार्वजनिक सभेत स्वामी सारदानंदांचे 'निष्काम सेवेचे महत्त्व' या विषयावर अतिशय तळमळीचे व्याख्यान झाले. ब्रह्मानंद महाराज आणि सारदानंद महाराज यांची तपःपूत, ईश्वरीय प्रेमाने संपन्न आणि आध्यात्मतेजाने तळपणारी जीवने जवळून पाहून व त्यांच्या केवळ अस्तित्वानेच वाराणसीच्या कार्यकर्त्यांच्या मनोभूमिकेत इष्ट तो बदल घडून आला.

**संघटित सेवाकार्यात**

संघटित सेवाकार्यात काम करत असताना व्यक्तिगत अहंकाराचे पूर्ण विसर्जन करावे लागते, सहकाऱ्यांवर विश्वास असावा लागतो. ज्येष्ठांनी घेतलेल्या निर्णयांची कार्यवाही करताना पूर्ण आज्ञांकितता असावी लागते. 'अंतरी असता सद्गुरूस्मरण, सकल कार्ये झाली पूर्ण, ऐसी खूणगाठ मनी बांधोन, कर्तव्यपरायण राहावे गा' अशी फलाशारहित कर्तव्यपरायणता लागते. कोणीही व्यक्ती उपजत ही सर्व गुणसंपदा घेऊन येत नाही. ध्येयावरच्या अढळ श्रद्धेतून सेवाकार्यातले हे गुण संपादन करण्याची शक्ती येते. कविश्रेष्ठ रवींद्रनाथ टागोर यांनी एका प्रार्थनेत म्हटले आहे -

*Give me the strength*
*to make my love*
*fruitful in service*
*This is my prayer to thee my Lord*
*Strike, Strike at the root of penury in my heart*

'माझ्या अंतर्यामीचे प्रेम सेवेमध्ये सुफलित होऊ दे. माझ्या अंतःकरणात जर कुठे क्षुद्रता, हीनता असेल तर तिच्यावर कठोर प्रहार करून तिला काढून टाक.'

मानवसेवा ही ईश्वरपूजा व्हायला हवी असेल तर त्यासाठी ती विकाररहित आणि शुद्ध चित्ताने केली पाहिजे. तसेच सेवाकार्य करता करता चित्तशुद्धी होते आहे ना याकडे लक्ष असले पाहिजे. कारण चित्तशुद्धी हाच आत्मदर्शनाचा, ईश्वरप्राप्तीचा उपाय आहे हे आपण आतापर्यंत पाहिले.

**निकडीची गरज**

आजच्या भारतीय समाजाला अशा ईश्वर पूजनरूप मानवसेवेची अत्यंत आवश्यकता आहे. इतिहासाचा आढावा जर आपण घेतला तर ध्यानात येते, की अतिशय श्रेष्ठ असे तत्त्वज्ञान या भूमीमध्ये जन्माला आले, पण इथला सामाजिक व्यवहार मात्र उंचावला नाही. हीन स्तरावरचा राहिला. परस्पर शोषणावर उभारला गेला. तत्त्वज्ञान आणि व्यवहार यांची जबरदस्त फारकत झाली. बिहारमध्ये जमीनदार हे शेतकरी वर्गाची आजही भयंकर पिळवणूक करीत आहेत. येथील सवर्णांनी अस्पृश्यांचे शतकानुशतके शोषण केले. त्यांच्यावर अत्याचार केले. स्त्रीला ग्रंथामध्ये देवता मानले गेले, पण प्रत्यक्षात मात्र ती हुंडा आणि सामाजिक अत्याचारांची बळी ठरली. या सगळ्या अन्याय-अत्याचाराची किंमत आपल्याला राजकीय गुलामीच्या रूपाने मोजावी लागली. स्वातंत्र्य मिळून चार दशके उलटली तरी जे सामाजिक आणि राष्ट्रीय परिवर्तन या देशात घडून यायला हवे होते ते आलेले नाही. अत्याचार, भ्रष्टाचार आणि शोषण यांचा शाप समाजजीवनाला सडवीत आहे.

अशा परिस्थितीत त्याग आणि सेवा यांचे कंकण बांधून विशुद्ध कार्याचे दीपस्तंभ समाजात उभे करणे, हे सर्वाधिक महत्त्वाचे आहे. आत्मसंतुष्टता, स्वार्थ आणि आत्मकेंद्रितता यांतून लष्करी आघाड्यांवर, आर्थिक क्षेत्रात आणि आंतरराष्ट्रीय राजकारणात आमची सदैव पीछेहाट होत आली आहे. सावरकरांनी 'मला काय त्याचे? अर्थात मोपल्यांचे बंड' नावाची कादंबरी लिहिली आहे. त्यात स्वार्थी, आत्मकेंद्रित समाज आक्रमक अन्य धर्मीयांच्या अत्याचाराला बोकडाप्रमाणे बळी कसा पडतो, याचे विदारक चित्रण केलेले आहे. जाती आणि पंथ यांची निरपेक्ष माणसाला माणसाच्या सुखदुःखाची चाड असणे, आर्थिक किंवा सामाजिक दर्जा काय आहे याची निरपेक्ष माणसाला माणूस म्हणून प्रतिष्ठा असणे, ही आजच्या भारतीय समाजाची महत्त्वाची गरज आहे. मानवसेवेची प्रेरणा लाखोंच्या अंतःकरणात जागी झाल्याशिवाय या दिशेने आपल्या समाजाचे चित्र बदलणार नाही.

**उत्क्रान्तीचा पुढचा टप्पा**

एकोणिसाव्या शतकापर्यंत उत्क्रान्तीची संकल्पना ही प्रामुख्याने जीवशास्त्रीय होती. विसाव्या शतकात मनुष्याच्या जाणिवेचा विकास हा उत्क्रान्तीच्या अभ्यासकांचा महत्त्वाचा विषय बनला. मनुष्य हा इतर प्राण्यांपेक्षा अधिक बुद्धिमान आहे. पण ती बुद्धी त्याच्या प्राथमिक गरजा भागवेल एवढीच काही मर्यादित नाही. संपूर्ण उत्क्रान्तीचे ध्येय काय हा विषय आता मानवी प्रज्ञेपुढे आव्हान म्हणून उभा आहे. ऐहिक समृद्धीची निर्मिती या प्रज्ञेने केली. अजूनही हे काम तिला करावे लागेल. पण तिची झेप याहून फार मोठ्या विराट अवकाशात असणार आहे. हा अवकाश मानवाच्या आन्तरिक विकासाचा आहे. आन्तरिक विकास जर झाला नाही तर पशुत्वाचा मानवी आत्मा अडकून राहतो. त्याच्या प्रतिभेला बेड्या पडतात. यंत्रयुगातले मोठमोठे शोध लावणारा माणूस नैतिक आणि आध्यात्मिकदृष्ट्या आज ठेंगणाच राहिला आहे. परस्परशोषणाकडून परस्परपोषणाकडे आणि परस्पर उन्नयनाकडे मानव समाजाचा विकास व्हायला हवा आहे. 'मी म्हणजे शरीर आणि शरीराशी निगडित सुखोपभोग मिळवणे हेच माझे ध्येय' असा भ्रम विसाव्या शतकातील मनुष्याला झाला आहे. त्या भ्रमातून तो मुक्त व्हायला हवा तरच उत्क्रान्तीचे पुढचे पाऊल पडू शकेल. 'मी म्हणजे केवळ शरीर नव्हे तर या शरीरात राहाणारा चित् आणि आनंदस्वरूप आत्मा आहे. माझ्याभोवती सर्वांमध्ये तेच चिदानंदस्वरूप विलसत आहे. म्हणून मी इतरांवर प्रेम करतो, इतरांचा आदर करतो इतर जीवांची शिवभावाने सेवा करतो. या धारणेपर्यंत मनुष्याचा प्रवास व्हायला हवा आहे. त्या आन्तरिक प्रवासाची त्याग आणि सेवा ही दोन फार महत्त्वाची साधने आहेत.

**लाजिरवाणा कलंक**

'न प्रजया न धनेन त्यागेन एके अमृतत्वमानशुः ।' असा महानारायण उपनिषदाचा उद्घोष आहे. त्यागपूर्वक केलेल्या कर्मानेच शाश्वत आनंदाची प्राप्ती होते. इतरांसाठी निःस्वार्थ बुद्धीने, त्यागपूर्वक केलेले कर्म म्हणजेच सेवा. अशा सेवेनेच मनुष्याचे चारित्र्य घडते. व्यक्ती व्यक्तीच्या चारित्र्यातून राष्ट्रीय चारित्र्य घडते. स्वामीजींनी म्हटलेआहे, 'हा देश रसातळाला चाललेला आहे. लक्षावधी लोकांचे अभिशाप आपल्या माथी आहेत. जेव्हा ते मरणोन्मुख अवस्थेत होते त्या वेळी आपल्याकडे भूतकाळातून शाश्वत अमृताची नदी वाहात आलेली असूनही त्यातले पाणी आपण त्यांना दिले नाही. डबक्यातले पाणी त्यांच्यापुढे फेकले. अपरंपार समृद्धता असतानाही ते लाखो लोक आपल्यापुढे भूकेने तडफडले. त्या लक्षावधी लोकांना आम्ही अद्वैतावरील प्रवचने ऐकवली आणि प्रत्यक्षात मात्र त्यांचा अत्यंत तिरस्कार केला. लोकाचाराच्या नांवाखाली आम्ही हृदयशून्य भेदभाव केला. तात्त्विकदृष्ट्या आम्ही सगळे सारखेच आहोत असे आम्ही म्हणत आलो. प्रत्यक्षात मात्र कणभरही समतेने वागलो नाही. हा कलंक आता पुसून काढा! उठा, जागे व्हा. हे लहानसे आयुष्य या प्रयत्नात संपून गेले तर काय बिघडले? प्रत्येकाला एक दिवस मरायचेच आहे. उठा, जागे व्हा आणि पूर्ण प्रामाणिकतेने वागा. या देशात भयानक अप्रामाणिकता भरून राहिली आहे! आज जर खरोखर कसली गरज असेल तर चारित्र्याची. स्थिरबुद्धी आणि चारित्र्य असेल तर मनुष्य मृत्यूच्या मुखातही निर्भय राहातो.' (समग्र वाङ्मय, खंड ३, पृ. ४२९-३१)

भूतकाळावर कठोर प्रहार केल्याने वर्तमान सुधारेल असे स्वामीजींना वाटत होते. खरोखर आपल्या पूर्वीच्या चुका ही आता प्रगती करण्याची संधी मानली पाहिजे आणि पुढे गेले पाहिजे असे ते म्हणत. स्वार्थ आणि शोषणवृत्ती, अज्ञान आणि अंधश्रद्धा, गुलामी आणि त्याबरोबर येणारी मत्सरीवृत्ती ही भारताच्या वरकरणी सात्त्विक भासणाऱ्या चेहऱ्यामोहऱ्या मागे लपली आहे. या अनिष्ट शक्तींनी आमच्या राष्ट्रीय चैतन्याची फार मोठी हानी केली आहे. इतर राष्ट्रांनी गौरवशाली इतिहास निर्माण केला पण आमचे राष्ट्र मात्र या स्वकृत दोषांमुळे इतरांमागे अगतिकपणे खेचले गेले.

**सेवापरायण अध्यात्माचे द्वारे**

आज भारतीयांनी व्यक्तिशः स्वतः मधल्या, आपल्या बांधवांमधल्या आणि समाजातल्या ईश्वरत्वाचा प्रामाणिक शोध घेणे जरूर आहे आणि त्याला सेवेसारखे दुसरे साधन नाही. ज्या यंत्र-तंत्रयुगातील सोयी आज महानगरांमधल्या उजागू लोकांपुरत्या मर्यादित आहेत. त्या लक्षावधी खेड्यापर्यंत पोचवून ग्रामजीवन सुखी, रोगमुक्त करणे ही श्रेष्ठ प्रकारची मानवसेवा आहे. सर्वसामान्य माणसाला सुखाची भाकरी खाता येईल. स्वाभिमानाने जगता येईल येवढी अर्थोत्पादनाची साधने निर्माण करणे ही सुद्धा महत्त्वाची मानवसेवा आहे. विचारात जी गुलामगिरी आलेली आहे तिचे प्रतिबिंब शिक्षणात पडत असते. आमच्या नव्या पिढीला स्वतंत्र, प्रतिभासंपन्न विचार करण्याची शक्ती देणे ही शिक्षणक्षेत्रातील मानवसेवा आहे. या कृषिप्रधान देशात शेतकऱ्याचे जीवन पावसाच्या आधीन आहे. तेव्हा कृषिजीवन पुरुषार्थी करणे ही सुद्धा मानवसेवा आहे. जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात पराक्रम करून त्या

पराक्रमाची फळे येथल्या निस्सत्व 'नाही रे' वर्गापर्यंत पोचवणे ही सर्वश्रेष्ठ प्रकारची मानवसेवा आहे. त्यासाठी प्रत्येक क्षेत्रात जयिष्णु आणि त्याच वेळी सेवापरायण अशा अध्यात्म्याचे झरे वाहते ठेवणे हे या देशातील अध्यात्मिक चिन्तक- साधक-विचारवन्त स्त्री-पुरुषांचे काम आहे.

**व्यापकतेतच सुख**

वास्तविक सेवाप्रेरणा हे मनुष्याच्या मानसिक, अध्यात्मिक विकासातून आपोआप सहज निर्माण होणारी गोष्ट आहे. आध्यात्मिक विकासाचे वैशिष्ट्यच हे की त्यामुळे मनुष्य व्यापक बनत जातो. क्षुद्रता सोडून उदार बनतो. छान्दोग्य उपनिषदात म्हटले आहे -

*यो वै भूमा तत्सुखम् । न अल्पे सुखमस्ति ।*
*यो वै भूमा तदमृतम् । अथ यदल्प तन्मर्त्यम् ।*

'जे व्यापक आहे त्यातच सुख आहे. संकुचितपणात सुख नाही. जे व्यापक आहे ते अमृत-शाश्वत आहे. जे संकुचित आहे ते मर्त्य - नाश पावणारे आहे.' व्यापकता आणि उदारता म्हणजे निःस्वार्थता स्वतः आधी इतरांच्या सुखाचा विचार करणे. म्हैसूरच्या महाराजांना स्वामीजींनी लिहिले आहे. 'हे जीवन अल्प आहे. जगातील सुखोपभोगांना मर्यादा आहेत. पण जे इतरांसाठी जगतात तेच खरोखर जगतात, बाकी लोक जगूनही मेल्यासारखेच आहेत.'

**व्यक्तीनिरपेक्ष सेवाप्रेरणा**

इतरांसाठी निःस्वार्थ जीवन जगणे, सेवेला समर्पित होणे या फार मोठ्या गोष्टी आहेत हे खरे. पण असे जीवन जगणाऱ्यांच्या हातूनही काही चुका झाल्याचे आपल्या ध्यानी येते. स्वामीजींनी काही समर्पणशील साधकांना आणि कार्यकर्त्यांना याबाबत सावध केले आहे. कोणीतरी फार थोर पुरुष अथवा स्त्री एखादे सेवाकार्य सुरू करते. त्या सेवाकार्यात काम करणारे कार्यकर्ते त्या व्यक्तीच्या ठिकाणी आपली भक्ती आणि निष्ठा जडवतात आणि तन-मन-धनपूर्वक काम करू लागतात. पण काळाच्या ओघात श्रद्धा-भक्तीचे केंद्र बनलेल्या त्या विभूतींनी देह ठेवला की त्यांच्या मागून काम करणाऱ्यांची प्रेरणा क्षीण होते. श्रीरामकृष्णांच्या निर्वाणानंतर गुरूबंधूंची प्रेरणा क्षीण होऊ नये यासाठी स्वामीजींना प्रयत्न करावे लागले. वराहनगरचे सहजीवन त्यासाठीच होते. पण सेवाप्रेरणा ही व्यक्तीनिरपेक्ष असली पाहिजे. लोकेषणा, वित्तेषणा बाकी चित्ताचे विकार या सर्वांचा त्याग केला. पण व्यक्तीपूजा आणि ती व्यक्ती निघून गेल्यावर चित्ताची दुर्बलता राहिली तर तो 'धृति-उत्साह समन्वित कार्यकर्ता' सात्विक कर्ता म्हणता येणार नाही. म्हणून सेवेची प्रेरणा बाहेर असता कामा नये. ती सेवा करणाऱ्याच्या अंतर्यामी त्याची शक्तिदायिनी बनून राहिली पाहिजे.

**सत्पुरुषांची शक्ती**

भर्तृहरीने नीतिशतकात एक श्लोक लिहिला आहे. 'हे तो सत्पुरुष स्वकार्य त्यजुनी अन्यार्थही साधिती हे तो मध्यम जे स्वकार्य करिती अन्यार्थही साधिती हे तो राक्षस जे स्वकार्य करूनी अन्यार्थ विध्वंसिती जे का व्यर्थ परार्थहानी करिती ते कोण की दुर्मती' या श्लोकात ज्यांचे वर्णन केलेले आहे ते चार प्रकारचे लोक प्रत्येक समाजात सापडतात. पहिल्या प्रकारचे लोक थोडे असतात, पण श्रीकृष्णाने करांगुलीवर गोवर्धन पेलला तसा सगळ्या समाजाचा भार हे सत्त्वसंपन्न लोक पेलत असतात. स्वतःच्या कामाची हानी झाली तरी ते दुसऱ्यांचे कल्याण करतात. तोच त्यांचा धर्म असतो.

स्वार्थ आणि परार्थ यांची सांगड घालणारे दुसऱ्या प्रकारचे लोक म्हणजे कारखानदार, उद्योजक, व्यापारी. जे नीतीने श्रीमंत होतात असे. काळाबाजार करणारे नव्हेत. जे औषधात भेसळ करून निष्पाप लोकांच्या मृत्यूला कारण होतात ते लोक तिसऱ्या श्रेणीचे म्हणजे राक्षस म्हणावेत आणि चौथ्या श्रेणीचे लोक जे स्वतः व्यसनाधीन आहेत आणि दुसऱ्यांनाही बरबाद करतात, जे फितुरी करून स्वतःच्या आणि देशबांधवांचा नाश ओढवून घेतात असे.

कोणत्याही राष्ट्राचे नैतिक सामर्थ्य हे वरील श्लोकात वर्णन केलेल्या सत्पुरुषांची शक्ती त्या राष्ट्रात किती, यावर अवलंबून असते. व्यक्तिगत जीवनाचा आणि व्यक्तीगत हितस्वार्थाचा त्यांनी समजाच्या हितामध्ये होम केलेला असतो. राष्ट्राय इदं न मम । समाजपुरुषाय इदं न मम । अशी त्यांची जीवनधारणा असते. ईश्वरी प्रेरणेचं वाहक बनून ते काम करत असतात. ते भगव्या वस्त्रात आढळतील. कधी इतरांप्रमाणे सामान्य वस्त्रांमध्ये दिसतील, संन्यासी असतील किंवा राजर्षी जनकाप्रमाणे गृहस्थाश्रमी असतील. पण त्यांच्या शुद्ध चित्तामध्ये लोक सेवा आणि लोकहिताखेरीज अन्य प्रेरणेला जागाच नसते. आचार्यांनी म्हटल्याप्रमाणे -

'वसन्तवत् लोकहितं चरन्तः ।' अशी त्यांची स्थिती असते.

**विवेकानंदांचे आवाहन**

श्रीरामकृष्णांच्या प्रेरणेने अशा लोकांना घडवणारी एक मूस श्रीरामकृष्ण संघ आणि श्रीसारदा मठ या ठिकाणी निर्माण झाली आहे. श्रीरामकृष्ण आणि विवेकानंद यांच्या विचारधारेत, भावधारेत ज्यांना प्रेरणा सापडली अशी या परिवारातील आणखी अनेक कार्ये हिन्दूस्थानात आहेत. कन्याकुमारीचे विवेकानंद केंद्र आहे. महाराष्ट्रात ज्ञान प्रबोधिनी आहे, विनोबा आणि गांधी परिवारातही त्याग आणि सेवा यांच्या प्रेरणा कार्य करीत आहेत. स्वामी रंगनाथानंदांनी या सर्व अध्यात्म प्रेरणेने काम करणाऱ्या संघटनांमधील कार्यकर्त्यांसमोर एकविसाव्या शतकातील आव्हाने मोठ्या तळमळीने आणि प्रभावी रीतीने मांडली आहेत. उद्याच्या जगाच्या प्रश्नांना श्रीरामकृष्ण-विवेकानंद विचारधारेतच उत्तर आहे याची खात्री जगातल्या अनेक विचारवंतांना पटत चालली आहे.

'त्याग' आणि 'सेवा' यांचे आवाहन आजही देशातल्या तरूण मनांना पोहोचते आणि ते समर्पणाला सिद्ध होतात. स्वामीजी अशा युवकांना म्हणतात,

'चारित्र्यसंपन्न, बुद्धिसंपन्न आणि लोकसेवेसाठी सर्वस्व समर्पण करणारे युवक हवेत. माझ्या कल्पना प्रत्यक्षात आणण्यासाठी प्राणही

ओवाळून टाकण्याची सिद्धता असलेल्या आणि त्याद्वारे स्वतःचे आणि संपूर्ण देशाचे कल्याण करू शकणाऱ्या आज्ञांकित युवकांवरच माझ्या भविष्यातील आशा केंद्रित झाल्या आहेत.

वैश्विक एकतेचा संदेश देणाऱ्या श्रीरामकृष्णांना माझी अंतःकरणपूर्वक प्रार्थना आहे की तुमच्या हृदयातून त्यांनी प्रकट व्हावे, तुमच्या सर्व वासनांचा त्यांनी स्वाहाकार करावा, म्हणजे आपल्या बांधवांना स्वतःमधले सर्वोत्तम प्रदान करीत मोहाच्या या भयप्रद सागरातून सुखी दृढचित्ताने पार व्हाल.

पुढे व्हा! माझ्या शूर मुलांनो, जे बंधनात जखडलेले आहेत त्यांना मुक्त करा. दुःखितांच्या खांद्यावरचे दुःखाचे ओझे हलके करा! अज्ञानी बांधवांच्या अंतःकरणात ज्ञानाची ज्योत पेटवा. वेदान्ताचा महाघोष निनादत आहे. 'निर्भय व्हा! तो पवित्र घोष पृथ्वीतलावरील सर्व प्राणिमात्रांची हृदयग्रंथी भेदून त्यांना मुक्त करू दे!'

(हिंदूतेजा जाग रे! पृ. १२२-१२३)

आपली मानवसेवा ही ईश्वरपूजा व्हायला हवी असेल तर मानवसेवेची स्वामीजींची ही कल्पना नीट समजून घ्यावी.

प्रथम आपल्या देशातील मानवसमाजाचे गुन्तागुन्तीचे प्रश्न समजून घ्यायला लागतील. तीक्ष्णतम बुद्धीने आणि सर्वस्पर्शी करुणेने त्या प्रश्नांवरती उत्तरे शोधायला लागतील. सेवेसाठी परमेश्वराने आपल्याला कोणते साधन दिले आहे, आपले शरीर, मन आणि बुद्धी कशाप्रकारच्या सेवासाधनेला आज अनुकूल आहे, भविष्यकाळात सेवेच्या कोणत्या क्षमता आपल्याला प्राप्त करून घेणे शक्य आहे. याचा अनुभवी साधकांच्या पायाशी बसून आपल्याला विचार करावा लागेल. सेवेला अनुकूल असे शरीर-मन-बुद्धी होण्यासाठी तपाचरण करावे लागेल, चित्तशुद्धी करावी लागेल. मगच ईश्वर आपली पूजा स्वीकारील. तद् हि तपः ।

आत्मदर्शन हे मानवी जीवनाचे परम लक्ष्य आहे हे खरे. पण या देशातला कुत्रासुद्धा जोवर भुकेलेला आहे तोवर मला मुक्ती नको असे म्हणणाऱ्या स्वामी विवेकानंदांचा वारसा आपण सांगतो. त्यामुळे व्यक्तिगत ध्यान साधनेत आपण तृप्त राहू शकणार नाही. 'आत्मनो मोक्षार्थ' हे ध्येय आपल्याला पुरेसे वाटणार नाही. 'जगद हिताय' झटणे हेच खरे तप होय. दैनंदिन उपासनेतून चित्तशुद्धी मिळवून ते शुद्ध चित्त मानवसेवेत कारणी लावणे हीच आपली ईश्वरपूजा असे स्वामीजींनी सांगितले आहे.

*तद् हि तपः । तद् हि तपः ।*

तेच खरे तपाचरण होय. तेच खरे तपाचरण होय.

*डॉ. स्वर्णलता भिशीकर*
*१५६ ड रेल्वे लाईन्स, सोलापूर ४१३ ००१.*

# उजाड महाराष्ट्र आणि वनीकरणाचा वेध

मोहन धारिया

### भारतातील फक्त दहा टक्के क्षेत्र वनाखाली

सृष्टीतील पर्यावरणाचा तोल सातत्याने ढासळत आहे. दूषित वातावरणाचे काळे ढग सर्व जगभर आणि भारतातसुद्धा झपाट्याने पसरत आहेत. गेल्या काही वर्षांत या प्रश्नाकडे जनतेचे लक्ष वेधण्याचे प्रयत्न सर्व पातळीवरून सुरू झाले आहेत. प्रचंड जंगलतोडीमुळे भारतातील पर्यावरणाचा तोल अमर्याद वेगाने घसरतो आहे. पूर-दुष्काळ, पाण्याची तीव्र टंचाई यांसारखे गंभीर प्रश्न देशाला सातत्याने भेडसावत आहेत. निसर्गप्रेमी संस्थांनी सुरू केलेल्या आंदोलनामुळे जंगलतोड थांबली पाहिजे, अशी जागृती काही प्रमाणात निर्माण झाली आहे. वनीकरणाच्या कार्याला गती आणण्यासाठी पंतप्रधानांच्या नेतृत्वाखाली राज्यांचे मुख्यमंत्री, संबंधित खात्याचे केंद्रीय मंत्री, आणि राज्यातील तज्ज्ञांचे एक मध्यवर्ती मंडळ (नॅशनल लॅंड युझ कौन्सिल) मे १९८५ च्या सुरुवातीस स्थापन झाले आणि नॅशनल वेस्ट लॅन्डस् डेव्हलपमेंट बोर्ड या संस्थेची स्थापनाही करण्यात आली. परंतु योग्य नियोजन झाले नाही. दरसाल पाच दशलक्ष हेक्टर पडीक जमीन वनाखाली आणण्याचे उद्दिष्ट १९८५ साली ठरविले होते, परंतु प्रत्येक वर्षी १५- १६ लाख हेक्टर पलीकडे ते साध्य झाले नाही. स्वातंत्र्यापूर्वी ७५ दशलक्ष हेक्टर जमिनीवर जंगले होती. नॅशनल रिमोट सेन्सिंग एजन्सीतर्फे इनसॅटमार्फत घेतलेल्या अद्ययावत माहितीनुसार सातत्याने झालेल्या जंगलतोडीमुळे सध्या सुमारे ३५ (पस्तीस) दशलक्ष हेक्टर्स जमिनीवरच – म्हणजे जेमतेम १० टक्के क्षेत्रावर चांगले जंगल शिल्लक राहिले आहे.

### क्रूर कत्तल

१९५२ साली, वनविषयक राष्ट्रीय धोरण ठरविताना, त्या वेळी असलेल्या ७५ (पंचाहत्तर) दशलक्ष हेक्टर्स जमिनीवरून जंगलक्षेत्राचे प्रमाण ११० दशलक्ष हेक्टर्सपर्यंत वाढवायचा निर्णय घेण्यात आला होता. दुर्दैवाने, हे उद्दिष्ट साध्य झाले नाहीच, उलट होते तेच जंगल मोठ्या प्रमाणात नाहीसे होत गेले. दरसाल जळण-लाकडाची गरज भागविण्यासाठी सुमारे दीड दशलक्ष हेक्टर म्हणजेच सदतीस लाख एकरावरील झाडांची क्रूर कत्तल प्रतिवर्षी सुरू आहे.

### महाराष्ट्रातील गंभीर समस्या

महाराष्ट्रात तर हा प्रश्न सर्वार्थाने खूप गंभीर बनला आहे. राज्याच्या एकूण क्षेत्रापैकी १४ दशलक्ष हेक्टरपेक्षा अधिक जमीन पडीक अथवा नापीक अवस्थेमध्ये आहे. एकूण महाराष्ट्राचा विचार केल्यास सध्या फक्त पंधरा लाख हेक्टर क्षेत्र वनाखाली असून, पर्यावरणाचा तोल सावरायचा असेल तर दोन हजार सालापर्यंत एकूण दहा दशलक्ष हेक्टर जमीन वनाखाली आणणे आवश्यक आहे. त्यासाठी पुढील बारा वर्षे सात लाख हेक्टर्स जमीन दर वर्षी जंगलाखाली आणावी लागेल. या महत्त्वाकांक्षी कार्यक्रमासाठी दर वर्षी जवळजवळ ११० कोटी (११०० दशलक्ष) रोपांची आवश्यकता लागणार आहे.



### प्रचंड आव्हान

महाराष्ट्रामध्ये सुमारे ४४००० खेडी आणि जवळजवळ तेवढ्याच वाड्या असून, त्यापैकी ५० टक्के खेड्यांमधून चांगल्या पिण्याच्या पाण्याची सोय उपलब्ध नाही. १९८६-८७ मध्ये एक पाहणी करण्यात आली. त्यामध्ये आपल्या राज्यात ४ कोटी जनावरे (पशुधन) असून, त्यातील फक्त सात टक्के जनावरांची चांगली काळजी घेण्यात येते. सन २००१ साली महाराष्ट्राची लोकसंख्या १० कोटीपर्यंत तर जनावरांची संख्या ५ कोटीपर्यंत जाईल असा अंदाज आहे. प्रचंड प्रमाणात वाढणारी लोकसंख्या आणि जनावरे यांची काळजी घेण्यासाठी तेवढ्याच प्रमाणात अन्नधान्य, चारापाणी, जळण यांची निर्मिती करणेही आवश्यक आहे. दिवसेंदिवस बेकारीची समस्या अधिकच बिकट होत आहे. एकीकडे लक्षावधी एकर जमीन पडीक अवस्थेत आहे आणि दुसरीकडे लक्षावधी तरुण बेकार म्हणजेच पडीक अवस्थेत आहेत.

त्यांची योग्य सांगड घालून दोघांनाही उत्पादनक्षम बनविण्याचे प्रचंड आव्हान महाराष्ट्रापुढे आहे. हे आव्हान समर्थपणे पेलण्यासाठी एकीकडे शासनाच्या पातळीवर वेगळ्या निर्धाराची, दृष्टीची आणि खंबीर धोरणात्मक निर्णय घेण्याची आवश्यकता आहे; तर दुसरीकडे शेतकरी, विद्यार्थी, कामगार, महिला, सामाजिक व सहकारी संस्था आदी सर्वांना या कार्यक्रमात सहभागी कसे करून घेता येईल याचाही गंभीरपणे विचार करून सुयोग्य नियोजन करणे आवश्यक आहे.

**प्रमुख निर्णायक बदल**

भारतातील सुमारे १५० दशलक्ष हेक्टर जमीन पडीक अथवा नापीक अवस्थेमध्ये असून त्यामध्ये महाराष्ट्र, राजस्थान, आणि मध्य प्रदेश ही तीन राज्ये आघाडीवर आहेत. पडीक जमीन उत्पादनाखाली आणण्यासाठी आणि एक तृतीयांश जमिनीवर वनराई करण्यासाठी एक मास्टर प्लॅन करून तो खंबीरपणे अमलात आणला पाहिजे. महाराष्ट्रातील या समस्येचा विचार करण्यासाठी वनराई, भारतीय ॲग्रो इंडस्ट्रीज फाऊंडेशन आणि सर्वांगीण वनसंगोपन संस्था यांनी महाराष्ट्रातील चार कृषी विद्यापीठामध्ये चर्चासत्रे आयोजित केली होती. त्यानंतर आलेल्या सर्व सूचनांचा साकल्याने विचार करण्यासाठी पुणे येथे एक मध्यवर्ती चर्चासत्र घेण्यात आले. त्यामध्ये नियोजन मंडळ, मध्यवर्ती आणि राज्य शासन, कृषी विद्यापीठे, प्रमुख सामाजिक संस्था आदींचे प्रतिनिधी सहभागी झाले होते. त्या वेळी करण्यात आलेल्या शिफारशींचे मध्यवर्ती शासन, राज्य शासन आणि नियोजन मंडळाने स्वागत केले असून, आठव्या पंचवार्षिक योजनेमध्ये प्रमुख सूचनांचा अंतर्भाव करण्याचे सर्वांनी मान्य केले आहे. प्रमुख धोरणात्मक बदलासाठी वनराई संस्थेने सातत्याने आग्रह धरला आणि मोठ्या प्रमाणात त्याला यशही प्राप्त झाले.

**महाराष्ट्र शासनाचे स्वागतार्ह निर्णय**

महाराष्ट्राचे मुख्यमंत्री श्री. शरदराव पवार यांनी वनराई संस्था आणि अन्य प्रतिनिधींबरोबर प्रदीर्घ चर्चा केली आणि महाराष्ट्राच्या भवितव्याच्या दृष्टीने महत्त्वपूर्ण असणाऱ्या या समस्येवर निर्णय घेण्यासाठी प्रमुख मंत्री, अधिकारी आणि या क्षेत्रातील अग्रेसर व्यक्तींची एक बैठक दिनांक २२ सप्टेंबर, १९८८ रोजी मुंबई येथे आयोजित केली. त्या बैठकीमधील चर्चेला अनुसरून महाराष्ट्र शासनाने खालील स्वरूपाचे महत्त्वाचे निर्णय घेतले असून, त्याची कार्यवाही सुरू झाली आहे.

१) महाराष्ट्रातील ५ लाख हेक्टर जमिनीवर सन १९८९-९० सालात वनीकरण करण्यात येईल. त्यासाठी ८० कोटी रोपांची आवश्यकता असून ही सर्व योजना घडक कार्यक्रम म्हणून राबविण्यात येईल.

२) सन १९९० पासून २००१ पर्यंत दर साल सात लाख हेक्टर जमीन वनाखाली आणण्यात येईल आणि २००१ पर्यंत महाराष्ट्रातील एक तृतीयांश क्षेत्र वनराईखाली यावे म्हणून अग्रक्रमाने प्रयत्न करण्यात येतील. हा भव्य कार्यक्रम [illegible] करण्यासाठी शिक्षण संस्था, सामाजिक संस्था, सहका[illegible] खाजगी कारखाने, ग्रामपंचायती, जिल्हा परिषदा [illegible] आदी सर्वांचा सहभाग घेण्यात येईल. एक रा[illegible] समजून सर्व पक्षांना बरोबर घेऊन हा कार्यक्रम रा[illegible] येईल.

३) महाराष्ट्रातील पडीक जमिनी प्रामुख्याने खाजगी [illegible] मालकीच्या आहेत. त्या उत्पादनक्षम करण्यासाठी [illegible] वनाखाली अथवा वनशेतीखाली आणण्यासाठी [illegible] शेतकऱ्यांना विविध प्रकारच्या सवलतींसह कर्जपुरवठा करण्यात येईल.

४) वनशेती करण्यासाठी शेतकऱ्यांना देण्यात येणाऱ्या कर्जावर टाकलेली बंधने तावडतोब उठविण्यात येतील आणि तसे आदेश सर्व बँकांना व नाबार्डला देण्यात येतील.

५) वनीकरणाचा आणि पडीक जमिनी उत्पादनाखाली आणण्याचा कार्यक्रम यशस्वी करण्यासाठी प्रचंड जनआंदोलनाची व जनतेच्या सहभागाची गरज आहे. त्यासाठी जी गावे कुऱ्हाडबंदी व चराईबंदीची प्रतिज्ञा घेऊन महिन्यातून एक दिवस श्रमदान करण्यास तयार आहेत आणि शेतीचा हंगाम सोडून इतर दिवशी किमान ५० माणसांचा रोजंदारीसाठी पुरवठा करण्यास तयार आहेत, अशा गावांची आदर्श गावे म्हणून निवड करण्यात येईल. या योजनेप्रमाणे प्रत्येक कुटुंबातील किमान दोन व्यक्तींनी महिन्यातून एक पूर्ण दिवस श्रमदान केले पाहिजे अथवा मजुरीची रक्कम ग्रामपंचायतीकडे भरणा केली पाहिजे. अशा गावांमध्ये मृद्संधारण, फलोद्यान, वनीकरण, गोबरगॅस, उजशितो आदी सर्व शासनाच्या योजना अग्रक्रमाने राबविण्यात येतील. तसेच जे गरी बशेतकरी स्वतःच्या उजाड जागेत वनशेती अथवा फळशेती करण्यास तयार असतील त्यांच्या शेतावरच रोजगार हमी योजना आणण्यात येईल व रीतसर वेतन दिले जाईल. अशा स्वरूपाची ठोस योजना महाराष्ट्र शासनाने नुकतीच जाहीर केली असून, 'श्रमशक्तीद्वारे ग्रामविकास' या नावाने ती सुरू झाली आहे.

६) शेतावर लावण्यात येणाऱ्या सर्व झाडांची नोंद ७/१२ च्या उताऱ्यात करण्यात येईल आणि अशी नोंद झाल्यावर जेव्हा सागवान, निलगिरी आदी झाडे तोडणीसाठी तयार होतील तेव्हा ती तोडण्यासाठी अन्य परवाने लागणार नाहीत. यासाठी प्रचलित कायदे व नियमामध्ये योग्य ते बदल करण्याचा निर्णय शासनाने जाहीर केला आहे.

७) वनखात्याच्या उजाड जमिनीही वनीकरणासाठी मध्यवर्ती शासनाच्या परवानगीशिवाय राज्य शासनाला देता येत नाहीत.

त्यासंबंधी मध्यवर्ती शासनाबरोबर चर्चा सुरू आहे. मात्र वनखात्याच्या जमिनीखेरीज राज्य शासनाच्या अन्य उजाड जमिनी वनराईसाठी दीर्घ मुदतीने, नाममात्र भाड्याने ग्रामपंचायती, शिक्षण व सामाजिक संस्था तसेच खाजगी व्यक्तींना देण्याचा निर्णय महाराष्ट्र शासनाने घेतला आहे. त्याचप्रमाणे रस्ते, कालवे यांच्या दुतर्फा असणाऱ्या जागा शेजारच्या शेतकऱ्याला याच तत्त्वावर झाडे लावण्यासाठी देण्याचे ठरले आहे.

८) पडीक जमिनींचा विकास आणि वनीकरणाचे कार्यक्रम यशस्वी करण्यासाठी बारा वर्षांचा एक मास्टर प्लॅन करण्यात येईल. त्यासाठी वनमंत्र्यांच्या अध्यक्षतेखाली श्री. वि. स. पागे, मोहन धारिया, नानाभाऊ एंबडवार, अण्णासाहेब हजारे, विनायकराव पाटील, डॉ. राम ताकवले, आदी प्रमुखांची एक समिती नेमण्यात आली आहे.

**जवाहर रोजगार योजना**

वनराई आणि अन्य संस्थांच्या आग्रहानुसार श्रमशक्ती आणि ग्रामविकास ही योजना महाराष्ट्र शासनाने स्वीकारल्यामुळे सर्वसामान्य जनतेला विश्वासात घेऊन त्यांच्याच सहकार्याने सर्वंकष ग्रामीण विकासाला तसेच वनीकरणाच्या कार्याला खूपच वेग येणार आहे. तसेच एकूण विकास कार्याला नवीन दिशा मिळणार आहे. मध्यवर्ती शासनाने १ एप्रिल, ८९ पासून जवाहर रोजगार योजना लागू केली असून त्या योजनेनुसार सर्व खेडेगावांना, लोकसंख्या व मागासलेपणा, या कसोट्या लावून विशिष्ट रक्कम देण्यास सुरुवात झाली आहे. त्या योजनेनुसार सदर रकमेपैकी किमान २५ टक्के रक्कम सामाजिक वनीकरणावर खर्च केली पाहिजे असे बंधन टाकण्यात आले असल्यामुळे जवाहर रोजगार योजनासुद्धा वनीकरणाच्या कार्याला पोषकच ठरणार आहे.

**ग्रामीण भागाकडे दुर्लक्ष आणि नगरांची अनिर्बंध वाढ**

स्वातंत्र्यानंतर नियोजित अर्थव्यवस्था देशाने मान्य केली. औद्योगीकरणाला गतिमानता येण्यासाठी मूलभूत धंद्यावर योजनाकारांनी दिलेला भर योग्यच होता. मात्र त्याच प्रकारचा भर कृषी औद्योगिक अर्थव्यवस्थेवर देणे तितकेच महत्त्वाचे होते, तिकडे दुर्लक्ष झाले आणि एकीकडे हजारो खेडी आर्थिकदृष्ट्या उद्ध्वस्त झाली तर दुसरीकडे नगरांची अथवा नव्या उपनगरांची अनिर्बंध नियोजनशून्य वाढ सुरू झाली. ही प्रक्रिया अद्यापही सुरू आहे. ग्रामीण भागातील नागरिकांना योग्य सामाजिक न्याय द्यावयाचा असेल तर शेतीवर उपजीविका करणाऱ्यांचा प्रचलित भार कमी करून कृषीवर आधारित तसेच अन्य उद्योगधंद्यांमध्ये त्यांना सामावून घेणे तितकेच महत्त्वाचे आहे. नोकरीच्या शोधासाठी खेडेगावाकडून शहराकडे जाणारा ओघ थांबविण्यासाठी उद्योगधंद्यांचे योजनाबद्ध विकेंद्रीकरण अपरिहार्य झाले आहे. त्या शिवाय शहरातील झोपडपट्ट्यांची समस्या आणि त्या ठिकाणी नरकवासाचे जीवन जगणाऱ्या नागरिकांची समस्या केव्हाही सुटू शकणार नाही. भारताच्या ८५ कोटी लोकसंख्येपैकी ७० टक्के नागरिक म्हणजेच जवळजवळ ६० कोटी नागरिक ग्रामीण भागात राहत असून त्यापैकी बहुसंख्य नागरिक दारिद्र्याने ग्रासलेले आहेत. त्यांना अधिक क्रयशक्ती देण्याचा जाणीवपूर्वक प्रयत्न झाल्यास भारतातील आर्थिक विकासाला फार मोठा वेग निश्चित येऊ शकेल.

**व्यवहार्य धोरण आणि तज्ज्ञांसमोरील आव्हान**

प्रभावी वनीकरणासाठी जंगल खात्याची जमीन, शासकीय व निमशासकीय जमीन, ग्रामपंचायतीकडील गायराने, देवराया आणि खाजगी क्षेत्र, या सर्वांचाच विचार होणे अगत्याचे आहे. त्यासाठी चर खणणे, बंडिंग आणि अन्य उपाय करून झाडे लावणे व जमिनीची धूप थांबविणे, हे सूत्र महत्त्वाचे ठरते. ज्या पडीक क्षेत्रावर वनखाते अथवा शासन कोणत्याही कारणास्तव झाडे लावू शकत नसेल तेथे स्थानिक आदिवासी, ग्रामपंचायती, शिक्षण अथवा सहकारी संस्था किंवा खास अटी घालून खाजगी व्यक्तींनाही वनीकरणाची परवानगी शासनाने दिली पाहिजे. मध्यवर्ती शासनाचे सध्याचे धोरण त्या दृष्टीने अत्यंत घातक स्वरूपाचे आहे. चीनसारख्या साम्यवादी राष्ट्रानेही वनखात्याच्या पडीक जमिनी वनीकरणासाठी खाजगी कुटुंबांना दिल्या आणि केवळ पाच वर्षांत दोन कोटी हेक्टर उजाड क्षेत्र वनराईखाली आणले आहे. वनराईसारख्या संस्थांनी अशा स्वरूपाचे व्यवहार्य धोरण शासनाने स्वीकारावे म्हणून सातत्याने आग्रह चालवला असून त्याला मोठ्या प्रमाणात यश येण्याची चिन्हेही दिसू लागली आहेत.

**राष्ट्रीय कार्यक्रम**

प्रचलित निसर्ग आणि वनश्रीला संपूर्ण संरक्षण देणे आणि २००० सालापर्यंत पडतील ते श्रम घेऊन आपला महान देश सुजलाम सुफलाम् बनविणे हेच आपले राष्ट्रीय कर्तव्य आहे. भारतमातेच्या ३७॥ लाख एकर अंगावरील हिरवे वस्त्र दरसाल हिसकून घेतले जात असताना, कोणताही सच्चा निसर्गप्रेमी स्वस्थ बसू शकत नाही. वनीकरणासह सर्वंकष विकासाचा कार्यक्रम, एक महत्त्वपूर्ण राष्ट्रीय कार्यक्रम मानून त्यामध्ये सर्व भारतीयांनी सहभागी होणे आणि प्रचंड जनआंदोलन निर्माण करणे आजची ऐतिहासिक गरज आहे. परदेशामध्ये स्थायिक झालेले अथवा व्यवसाय करणारे भारतीय नागरिक वनीकरण आणि वनशेतीच्या क्षेत्रात महत्त्वाचा वाटा उचलू शकतील. महाराष्ट्र शासनाने स्वीकारलेल्या नवीन धोरणामुळे पर्यावरणातून परिवर्तन साधण्याच्या कार्यात सहभागी होणे सुलभ झाले आहे.

*मोहन धारिया*
*अध्यक्ष : वनराई*
*२०६४, विजयनगर,*
*पुणे ४११ ०३०.*

# साधक जीवनात मौनाचे महत्त्व

वि. के. फडके

साधकाच्या जीवनात मौनाला फार महत्त्व आहे. साधना जशी वाढत जाते तसे वायफळ बोलणे आपोआप कमी होत जाते व साधक हळूहळू अंतर्मुख होऊ लागतो. फलटणचे पूज्य श्री. गोविंदकाका उपळेकर नेहमी म्हणायचे, की 'बाबांनो, तोंड बंद करून बोला!' याचा अर्थ कृतीने बोला, तोंडाने बोलू नका; किंवा आवश्यक तेवढेच बोला! येशू ख्रिस्तानेदेखील 'You shall have to account for every idle word' अशा उक्तीने आपल्या शिष्यांना व्यर्थ बडबड न करण्याबद्दल बजावले आहे. कारण व्यर्थ बोलण्यापेक्षा मौनानेच जास्त कार्य होते! 'Greater things are done by silence than by tall talk' हे इंग्रजी वाक्य प्रसिद्धच आहे.

अति बडबड करणे हे साधकाच्या दृष्टीने तर फारच हानिकारक आहे. स्वामी विवेकानंद यांनी याबाबतचा स्वतःचा अनुभव सांगताना एकदा म्हटले होते, की ज्या दिवशी व्याख्यानासाठी मला खूप बोलावे लागते त्या दिवशी रात्री ध्यान लागायला खूप वेळ लागतो!

मौनाचे हे महत्त्व जाणूनच जगातील सर्व धर्मांमध्ये 'मौन' हे एक पारमार्थिक साधन मानले आहे. मोठमोठ्या सत्पुरुषांची जीवन चरित्रे वाचल्यावर असे दिसून येते, की त्यांनी आपल्या जीवनातील काही काळ तरी एकांतवासात व मौनात घालविलेला आहे.

परंतु मौन म्हणजे केवळ एकांतात जाणे किंवा वाचा बंद ठेवणे नव्हे! वाचा बंद करणेही एकवेळ शक्य होईल; परंतु वाचा बंद केल्यानंतर तो मनुष्य कसले चिंतन करतो याला फार महत्त्व आहे. वाचा बंद ठेवून एखाद्याने सतत एखाद्या रूपसुंदरीचे चिंतन केले तर त्या मौनाला काय किंमत आहे? वृत्ती अंतर्मुख करून हृदयाच्या गाभाऱ्यात फक्त परमेश्वरालाच पाहणे, त्याचे चिंतन करणे म्हणजेच खरे मौन!

अशा प्रकारे वाचेचा संयम साधण्यासाठी प्रथम मनाचा संयम साधता आला पाहिजे. पूज्यपाद श्री. शंकराचार्यांनी गीतेवरील भाष्यात एके ठिकाणी म्हटले आहे, की 'मौनं वाक्संयमोऽपि मनः संयमपूर्वको भवति इति कार्येषु मुख्यते मनःसंयमो मौनम् इति।'

सद्गुरूंपुढे मान खाली घालून बसायचे ते यासाठीच. कारण मान खाली घातली की वाचा मुकी बनते. शिव्या देणारा माणूस नेहमी तोंड वर करून शिव्या देत असतो. त्याला जर सांगितले, की तोंड खाली करून शिव्या दे, तर त्याला ते जमणार नाही!

वाच्कळ बडबड सर्वांनाच कंटाळवाणी वाटते. म्हणूनच श्री समर्थ म्हणतात - 'वाच्कळ बोलिजे वाचाळपणे । ते अवघेचि कंटाळवाणे ।'

कोणतीही चांगली गोष्ट जन्माला येण्यापूर्वी तिला निवांतपणे वाट पाहावी लागते. झाडाच्या बीला वृक्षरूपात येण्यासाठी भूमीमध्ये कितीतरी दिवस निवांतपणे गाडून घ्यावे लागते. साधकाची साधना फळाला येण्यापूर्वी त्यालाही एकांतपणाची, मौनाची व संयमाची तितकीच नितांत आवश्यकता असते!

*वि. के. फडके*
*१८०६, सदाशिव पेठ,*
*पुणे ४११ ०३०.*

# हिंदू जीवन विचार हेच आता जगाचे आशास्थान

चं. प. भिशीकर

आपली भारतभूमी ही संतांची भूमी म्हणून प्रसिद्ध आहे. प्रत्येक संत काहीतरी जीवनकार्य घेऊन अवनीतलावर अवतरतो. सगळ्यांच्या कार्याचे सूत्र सृष्टीमध्ये भगवद्भजन वाढविणे आणि लोकांना सन्मार्गाला लावणे हे असले तरी काही संत कालसापेक्ष जागृती समाजांत निर्माण करण्यासाठीही शक्ती वेचतात. श्री समर्थ रामदास स्वामी आणि संत तुकाराम हे समकालीन. पण श्री समर्थांनी राजकीय परिस्थितीत धर्मानुकूल परिवर्तन घडवून आणण्यासाठी जिवाचा केवढा आटापिटा केला.

*देव मस्तकी धरावा । अवघा हलकल्लोळ करावा ।*
*मुलुख बडवावा की बुडवावा । धर्मसंस्थापनेसाठी ॥*

अशी तेजस्वी, उत्तेजक शिकवण त्यांनी दिली. तुकाराम महाराजांची प्रकृती भिन्न. त्यांनी छत्रपतींना शुभेच्छा दिल्या आणि रामदास स्वामींचे मार्गदर्शन स्वीकारण्यास सांगितले. स्वतः राजकारणाच्या धकाधकीत ते पडले नाहीत. यामुळे त्यांच्या संतपदवीला उणेपणा येतो असेही नाही.

*पिटू भक्तीचा डांगोरा । कळिकाळासी दरारा ।*
*तुका म्हणे करा । जयजयकार आनंदे ॥*
*हेच त्यांचे जीवनकार्य.*

**अखंड परंपरा**

अशीच संतपरंपरा आजतागायत चालू आहे. तिच्यात कधीही खंड पडलेला नाही. कारण आपल्या या प्राचीन राष्ट्राचेही एक ईश्वरदत्त जीवनकार्य आहे. जर जीवनाचे काही प्रयोजनच नसेल तर जीवन निरर्थक बनते. ज्या गोष्टींचा उपयोगच नाही ती आपोआप गळून पडते, अस्तंगत होते, हा निसर्गाचा अबाधित नियम आहे. जगात अनेक राष्ट्रे उदयास आली आणि काळाच्या उदरात गडप झाली. अनेक संस्कृतींचे उदयास्त झाले. पण इतिहासाने डोळे उघडले तेव्हापासून अस्तित्वात असलेले आपले राष्ट्र अद्यापही जीवमात्र आहे. त्याच्यावर जय-पराजयाचे अनेक प्रसंग आले, क्रूर धर्मांध आक्रमकांनी येथील परंपरागत धर्मजीवन उद्ध्वस्त करून टाकण्याचा आणि आपला असहिष्णू पंथ या देशावर लादण्याचा निकराचा प्रयत्न केला. जगात अन्यत्र कित्येक देश पाहता पाहता 'हिरवे' होऊन गेले. तसेच येथेही घडविता येईल, असे त्यांना वाटले असावे. पण सर्व भीषण आघात पचवून हिंदू संस्कृती टिकून राहिली. एवढेच नव्हे, तर गेल्या शंभर वर्षांत जगभर या संस्कृतीने थोर थोर मानवतावादी विचारवंतांची मने आकृष्ट करून घेतली आहेत.

**विविध विचारवाद**

मानवाला सुखसमृद्ध बनविण्याचा दावा करणाऱ्या अनेक विचारधारा गेल्या शंभर वर्षांत पुढे आल्या. काही काळ त्यांचा बोलबाला झाला, पण हळूहळू त्यांच्या मर्यादाही निदर्शनाला आल्या. इस्लाम व इसाई या दोन्ही धर्म पंथांची सांगड मानवाच्या सुखापेक्षा राजकीय सत्ताकांक्षेशी अधिक बसली. त्यातून भयानक रक्तपात झाला, हा गेल्या काही शतकांचा अनुभव. विसाव्या शतकात विज्ञानाच्या प्रगतीबरोबर समाजवाद, साम्यवाद, व्यक्तिस्वातंत्र्यवाद, लोकशाही समाजवाद इत्यादी अनेक विचार पुढे आले. त्यांपैकी साम्यवादी विचाराने काही काळ जगाला भलतीच भुरळ घातली होती. जगातील अनेक देशांत कम्युनिस्ट क्रांती झाली होती. साम्यवादी रशिया ही जगातील अमेरिकेची प्रतिस्पर्धी अशी महासत्ता बनली होती. पण सुमारे ७५ वर्षांतच हा नवीन बुडबुडा फुटला आणि प्रत्यक्ष रशियादेखील कम्युनिस्ट राहू शकला नाही. त्याची शकले उडाली आणि पाश्चात्यांच्या दारी भिकेची झोळी त्याला पसरावी लागली. विज्ञानयुगामुळे समृद्ध झालेल्या पाश्चात्त्य देशांत देहसुखवाद व्यक्तिस्वातंत्र्याच्या गोंडस नावाखालीअनिर्बंध झाला. राष्ट्रे खिस्ती असली तरी प्रेम, करुणा, माणुसकी वगैरे सारे विसरून साम्राज्यांचा आणि अमानुष आर्थिक शोषणाचा हव्यास त्यांनी धरला. भारतातील कराल दारिद्र्य ब्रिटिशनिर्मित व नंतर आपणच परप्रत्ययनेय बुद्धीमुळे पोसलेले आहे.

**शहाणे होण्याची गरज**

सारांश असा, की अनेक प्रयोग करून जग असा गोंधळल्यागत झाले आहे. केवळ वैज्ञानिक प्रगती, भौतिक समृद्धी आणि विविध सुखसाधने माणसाला सुखी करू शकत नाहीत, हे सिद्ध झालेले आहे. समृद्धी, बेलगाम व्यक्तिस्वातंत्र्य आणि देहोपभोग यांच्या हव्यासातूनच नव्या समस्या मानवापुढे उभ्या झाल्या आहेत. उदाहरणच द्यावयाचे झाले तर पर्यावरणाच्या गंभीर समस्येचे देता येईल. ही समस्या मानवाच्याच अविवेकी आधाशीपणातून आणि शोषण प्रवृत्तीतून निर्माण झालेली नाही काय? निसर्गक्रमात मानवाने हस्तक्षेप केला, निसर्गावर विजय मिळविण्याची भलतीच आकांक्षा धरली व त्यापायी नैसर्गिक संपत्तीचा विध्वंस केला, तर निसर्ग कशी क्षमा करणार? तो तर अत्यंत कठोर असतो. पाणी काय, भूगर्भातील खनिज संपत्ती काय, झाडे आणि वनस्पती काय किंवा काळी आई काय, या साऱ्यांच्या वात्सल्यालाच जणू उन्मत्त व अंध माणसाने ठोकरले. त्यांना ओरबाडून घेतले. आता

त्याच्यावरच रडण्याची पाळी आली आहे. स्वैरतेपायी 'एड्स' सारखे रोग त्याने ओढवून घेतले आहेत व आता त्यांची धावाधाव चालू आहे. पण निसर्ग नियमांच्या अवहेलनेला क्षमा नसते. शहाणे होणे किंवा मरणे यापेक्षा तिसरा पर्याय नसतो.

**विवेकानंदांचा संदेश**

हिंदुस्थानच्या जीवनकार्याची विसाव्या शतकाच्या अंती निर्माण झालेली ही पार्श्वभूमी आहे. या जीवनकार्याच्या परमेश्वरी प्रेरणेनुसारच स्वामी विवेकानंद शंभर वर्षांपूर्वी प्रथम अमेरिकेत गेले होते. आधुनिक काळात भारतवर्षाचा संदेश जागतिक व्यासपीठावर ऐकविण्याचा हा पहिलाच ठळक प्रयत्न. जवळ जवळ एक हजार वर्षे केवळ जगण्यासाठी, टिकून राहण्यासाठी धडपडण्यात गेली. या काळात कितीतरी विकृती आणि कुप्रथा समाजात शिरल्या. सद्गुणांना ओहोटी लागली. आत्मविस्मृतीने आपल्याला ग्रासले. इंग्रजी शिक्षणाने न्यूनगंड निर्माण केला. स्वामी विवेकानंद म्हणायचे, 'भारतवर्षात चैतन्य खेळवायचे असेल, तर त्याने आक्रमक व प्रसरणशील बनले पाहिजे.' या त्यांच्या म्हणण्याचा संबंध अर्थातच लष्करी आक्रमण किंवा साम्राज्यवाद असा नव्हता. 'विस्तार पावणे हे जीवन आणि संकुचित बनणे हा मृत्यू' हे स्वामीजींचे वाक्य प्रसिद्ध आहे. स्वामीजींना म्हणायचे होते की हिंदूंनी स्वतःला कोंडून घेऊ नये. जे मोलाचे ज्ञानभांडार त्यांच्याजवळ आहे, मानवी जीवन आनंदमय करणारा जो शाश्वत विचार त्यांच्याजवळ आहे, तो त्यांनी जगाच्या कानाकोपऱ्यांत नेऊन पोचवावा. त्याच विचाराच्या आधाराने आध्यात्मिक जागृतीचे लोण हिंदुस्थानात सर्वत्र पोचवावे. आध्यात्मविचारांचे सिंचन करून मग भौतिक समृद्धीची परिश्रमपूर्वक कास धरावी. आपली जीवनदृष्टी न सोडता म्हणजे जडवादी आणि देहसुखवादी न बनता पाश्चात्त्यांचे विज्ञान आणि तंत्रज्ञान यांचा शक्य तेवढा उपयोग भौतिक समृद्धीसाठी करून घ्यावा. अभ्युदय आणि निःश्रेयस या दोहोंनीही संपन्न असे मानवी जीवनच खऱ्या अर्थाने सुखी ठरेल. जगाकडे पाठ फिरवून आणि धर्माची खरी शिकवण विसरून कालबाह्य कर्मकांड, शिवाशिव इत्यादींतच आपण गुंतून पडलो, तर आपला जगात निभाव लागावयाचा नाही. गोरगरीब, दलित, पीडित बहुजनसमाजाला सज्ञान, सुशिक्षित आणि प्रगतीशील बनविण्याचे कार्य त्यांना महत्त्वाचे वाटे. शिक्षणातून माणसाच्या अंगच्या सुप्त शक्तींचा संपूर्ण आविष्कार व्हावा आणि धर्मविचाराने त्यांच्यातील देवत्व प्रकट व्हावे, ही त्यांची राष्ट्र उभारणीची कल्पना होती. असा चैतन्ययुक्त समाज जगाला आध्यात्मविद्येची संजीवनी पुरवून आपले नियत जीवनकार्य पार पाडू शकेल. यासाठीच भारतवर्षाचे अस्तित्व आहे, अशी विवेकानंदांची ठाम धारणा होती.

**संन्याशांकडून अपेक्षा**

राष्ट्र संजीवन करण्यासाठी विवेकानंदांनी फार चांगल्या कल्पना प्रसृत केल्या. एकच उदाहरण पुरेसे होईल. आपल्या देशात पूर्वापार देशभर संचार करणारे अगणित संन्यासी आहेत. त्यांनी काळाची गरज ओळखून लोकसेवा, लोकशिक्षण आणि लोकजागृती करण्याचे कार्य अंगीकारले पाहिजे, असे विवेकानंदांना वाटे. रामकृष्ण मिशनचे संन्यासी याच कार्यासाठी बाहेर पडले. आपत्ती पीडितांची सेवा, तळागाळातील लोकांचे अज्ञाननिरसन, विज्ञाननिष्ठ भौतिक ज्ञानाचा प्रसार, अध्यात्मविद्येचे संस्कार वगैरे सर्व गोष्टी करण्याचे दायित्व त्यांनी विरक्त, त्यागी आणि ईश्वरसमर्पित संन्याशांवर सोपविले. रूढ संन्यासाश्रमाला एक नवा अभ्यास दिला. या कार्यासाठी संन्यासी मिळावे म्हणून शिक्षणाची योजना केली. सर्वत्र विखुरलेल्या रामकृष्ण मठांचे प्रमुख प्रशिक्षित संन्याशीच असतात. आपल्या समाजात संन्याशांसंबंधी श्रद्धा आहे, आदर आहे.' पण समाज व संन्यासी यांत दूरत्वाचा भावही प्रत्ययास येत गेला आहे. स्वामी विवेकानंदांनी दलित, पीडित समाजाचे साहाय्यकर्ते आणि ज्ञानदाते या नात्याने समाज आणि संन्यासी यांना जवळ आणले.

**धर्म हेच प्राणतत्त्व**

धर्म आणि अध्यात्म हे हिंदुस्थानचे प्राणतत्त्व आहे. हजारो वर्षे एक विशिष्ट जीवनदृष्टी आणि जीवनपद्धती अंगीकारून हिंदू समाज व त्या समाजाचे स्थान असलेला आपला देश जीवमान आहेत, याचे कारण हे प्राणतत्त्व आहे हेच होय. केवळ विवेकानंदांचे नव्हे, तर सर्व प्रामाणिक अभ्यासकांचे असे मत आहे, की हिंदूंनी या तत्त्वाचा आश्रय घेतला आणि याच तत्त्वाचे ज्ञान जगाला देण्यासाठी ते जगभर गेले, तर राष्ट्राला अपूर्व तेज चढेल आणि जगाचेही कल्याण होईल. सर्व प्रकारच्या बदलत्या परिस्थितीला तोंड देण्याची क्षमता वैदिक विचारधारेत आहे. यासाठी जगातील लोकांनी आपआपली उपासना पद्धती किंवा पंथ-संप्रदाय सोडून लौकिकरीत्या हिंदू धर्माचा अंगीकार करण्याची आवश्यकता नाही. धर्म मतांची विविधता असू शकते. परमेश्वराकडे पोचण्याचे अनेक मार्ग असू शकतात. रामकृष्ण परमहंसांचा हा अनुभव विवेकानंदांनी आधुनिक जगाला संपूर्ण हिंदू परंपरेच्या प्रत्यक्ष ज्ञानातून सांगितला. अखेर माणूस म्हणजे जड, देह, मन, बुद्धी नसून आत्मरूप चैतन्य, हे त्याचे खरे स्वरूप आहे. हे आत्मतत्त्व आनंदरूप आहे. अज आहे, अमर आहे. जे जे दृश्य आहे ते विनाशी आहे. तेव्हा माणसाने स्वरूपज्ञान करून घेऊन संपूर्ण आनंदप्राप्ती व दुःखनिवृत्ती — म्हणजेच परमेश्वर प्राप्ती, याच मानवदेहात असताना प्राप्त करून घ्यावी, हा वेदान्त विचाराचा गाभा आहे. या जीवनध्येयाला पोषक अशी संस्कृती आणि जीवनपद्धती कालौघात विकसित झाली आहे.

**दुर्दशा**

या श्रेष्ठ जीवनध्येयाची, ते साध्य करून घेण्यासाठी आपल्या पूर्वसूरींनी आचरलेल्या तपाची, त्यांनी आपल्यासाठी ठेवलेल्या ज्ञानभांडाराची व घालून दिलेल्या जीवनमूल्यांची विस्मृती म्हणजेच धर्मग्लानी होय. ही धर्मग्लानी वाढते तेव्हा अधर्मही शिरजोर होतो. जीवन स्वार्थलंपट, भोगलंपट आणि मूल्यहीन बनू लागते. त्याग, यज्ञ, तप, स्वाभाविक मानवी ऋणे, कृतज्ञता, नैतिक शुद्धता इत्यादींची

हेटाळणी होऊ लागते. समाज पतन पावतो. अर्थाचा व भोगांचा दास बनतो. स्वत्व हरपून बसतो. याच रोगाने भारतवर्षाला आणि जगालाही आज ग्रासले आहे. म्हणून संघर्ष, मत्सर, विषारी स्पर्धा, स्वार्थ व क्षुद्र देहोपभोग यांच्या पायी मानवता त्रस्त आहे, अशांत आहे, दारिद्र्य आहे. तेथे तर सुख नाहीच, पण समृद्धी आणि सुखसाधने आहेत, तियेही सुख नाही, शांती नाही, तृप्ती नाही, समाधान नाही.

**अनुकूल काळ**

अशा परिस्थितीत हिंदुस्थानने आपले जीवनकार्य जाणण्याची आणि पार पाडण्याची फार आवश्यकता आहे. त्यासाठी त्याने सक्षम व्हावयास हवे. दुबळ्या आणि परमुखापेक्षी भारताचे उत्थान समर्थ आणि आत्मश्रद्धेने मुसमुसणाऱ्या भारताच्या रूपाने होणे ही विश्वकल्याणाची किमान आवश्यकता आहे. इथें समर्थांची एक ओवी आठवते -

*आपण ज्ञाने तृप्त व्हावे । तेच ज्ञान जनांस सांगावे ।*
*तरतेन बुडो नेदावे । बुडतेयासी ॥*

संतांनी व्यक्तिगत पातळीवर हे केले. करीत आहेत. 'कृण्वन्तो विश्वम् आर्यम्' ही आपली राष्ट्रीय कर्तव्यता एके काळी आपण पार पाडली होती. आता ती पुन्हा अंगीकारण्याची आणि पूर्ण करण्याची जबाबदारी आपल्यावर आहे. त्यासाठी अनुकूल काळ आपल्यापुढे साक्षात उभा आहे. आपण झडझडून एकदलाने उभे होण्याची गरज आहे.

*चं. प. भिशीकर*
*११७/११ गणेशवाडी, पुणे ४११ ००४.*

# वैज्ञानिक दृष्टिकोनातून अध्यात्म

वि. वि. सरवटे

परमेश्वराने आपणास पाच इंद्रियें दिली आहेत, ज्यांच्या उपयोगाने आपण आपल्या भोवतालच्या जगाची जाणीव करून घेतो. ती अशी – डोळे (दृष्टी), नाक (वास), कान (श्रवण), जीभ (स्वाद) व त्वचा (उष्मा). साधारणपणे बहुतेकांची खात्री असते की ही पंचेंद्रिये आपणास संपूर्ण माहिती देतात; पण ते खरे नाही हे दोन उदाहरणांवरून सहज समजू शकते.

काही कुत्री पाळणारे लोक एक विशेष प्रकारची शिटी वापरतात जिचा आवाज माणसांना ऐकू येत नाही, पण कुत्र्याला ऐकू येतो! याचे कारण असे आहे की आपले कान फक्त २० किलोहर्ट्झ (२०००० आवृत्ती प्रति सेकंद) पर्यंतची आवृत्ती असलेला ध्वनी ऐकू शकतात. पण कुत्र्याचे कान शिटीची २२ ते ३० किलोहर्ट्झ आवृत्ती ग्रहण करू शकतात. त्याप्रमाणेच वटवाघूळ अंधारात उडताना असेच उच्च आवृत्तीचे चीत्कार करतात व त्यांचा प्रतिध्वनी ऐकू आला म्हणजे वाटेतील अडथळा किती अंतरावर आहे हे त्यांना समजते. वटवाघळाच्या या युक्तीच्या आधारावर माणसाने रडारची निर्मिती केली.

त्याप्रमाणेच जगभरातील रेडिओ स्टेशनांनी निर्माण केलेले विद्युत चुंबकीय तरंग व तसेच स्टार टी. व्ही. स्टेशनने निर्माण केलेले तरंग आपल्या भोवताली रात्रंदिवस असतात, पण रेडिओसेट किंवा टिव्ही सेट वापरल्याशिवाय आपणास त्यांच्या अस्तित्वाची जाणीव होत नाही!

आपल्या इंद्रियांच्या नकळत जर असे तरंग आपणाभोवती संचरित होऊ शकतात तर त्याचप्रमाणे आत्म्यांचा संचार होत असावा, असे मानण्यास हरकत नसावी. पण आत्म्यांचा संचार वर्तमान काळातच होत नसून तो, एच. जी. वेल्स लिखित कादंबरी 'द टाइम मशीन' प्रमाणे, भूतकाळात व भविष्यकाळातदेखील होतो असे दोन अनुभव मला आले!

जून १९६८ मध्ये नागपूरला माझ्या मोठ्या मुलाचा विवाह झाला. त्यानंतर एके दिवशी पहाटे मला स्वप्न पडले की माझ्या हातातून शंभर रुपयांच्या दोन नोटा नाहीशा झाल्या. सकाळी ९ वाजता मी मुलाबरोबर रेल्वे स्टेशनवर नागपूर-रायपूरच्या तिकिटांचे आरक्षण करायला गेलो. मुलाला रांगेत उभे करून मी हिंडत असताना मनात विचार आला की कदाचित मुलाजवळ असलेले पैसे कमी पडतील. म्हणून मी पर्समधून शंभर रुपयांच्या दोन नोटा घेऊन त्याला द्यायला गेलो तेव्हा तो म्हणाला, "नको, तुमच्याजवळच असू द्या. लागल्यास मी मागेन." १५ मिनिटांनी तो तिकिटे घेऊन आल्यावर 'चला' म्हणाला तेव्हा माझ्या लक्षात आले की त्याने पैसे मागितले नव्हते. आणि माझ्या हातात त्या नोटा नव्हत्या!

रायपूरला पोहोचल्यावर एके रात्री "चोर चोर" ओरडत मी १२ वाजता जागा झालो व हे स्वप्न होते असे लक्षात आल्यावर परत झोपलो. रात्री तीनच्या सुमारास घराबाहेर मोठ्याने भांडणाचा आवाज ऐकल्यावर दार उघडून पाहिले, तर दोन चौकीदारांनी एका चोराला पकडले होते, जो घरात शिरायचा प्रयत्न करीत होता!!

आपण पत्राद्वारे मजकूर कळवितो म्हणजे नक्की काय करतो? तर कागदावर संकेत चिन्हे (लिपी) काढतो जी पत्र वाचणाऱ्याला समजतात, म्हणून त्याला लिहिलेला मजकूर कळतो. म्हणजे असे वाटते की कागद हा नुसता मजकूर वहन करण्याचे काम करतो, व मजकूर त्या संकेत चिन्हांत असतो. पण हे खरं नाही! कारण जर काळ्या कागदावर काळ्या शाईने मजकूर लिहून पाठविला तर कागद व संकेत चिन्हें पूर्वीसारखीच आपापल्या जागी असूनदेखील वाचणाऱ्याला काहीच बोध होत नाही!

यावरून असे दिसते की मजकुराचे 'रेकॉर्डिंग' होण्यासाठी कागदाचा पांढरेपणा संकेत चिन्हांमुळे काळा होणे आवश्यक आहे. व तसे न झाल्यास 'रेकॉर्डिंग' होत नाही. आंधळ्या लोकांसाठी वापरण्यात येणाऱ्या ब्रेल-लिपीमध्ये कागदाचे सपाटपण टेंगुळासारख्या ठिपक्यांनी बदलले जाते व स्पर्शाने आंधळा ते संकेत वाचू शकतो. टेप रेकॉर्डर व व्हिडिओ कॅसेट रेकॉर्डर मध्ये टेपवर लागलेल्या लोखंडी पदार्थाचे चुम्बकीकरण केले जाते म्हणून ध्वनी व चित्र यांचे रेकॉर्डिंग संभवते, व हे सर्व त्यांना 'आठवते', म्हणजे प्लेबॅक. बटन दाबल्यावर आपणास ते सर्व संकेत प्राप्त होतात.

आत्म्याच्या गुणांचे वर्णन करताना भगवंताने गीतेत म्हटले आहे, की "नैनं छिन्दन्ति शस्त्राणि नैनं दहति पावकः" इत्यादी. म्हणजे कोणत्याही भौतिक किंवा रासायनिक प्रक्रियेचा आत्म्यावर परिणाम होत नाही. तेव्हा या प्रक्रियाद्वारे आत्म्याच्या कोणत्याच गुणात बदल न घडल्यामुळे रेकॉर्डिंग होत नाही व म्हणून आत्म्याला पूर्वजन्मीचे काहीही स्मरण होणे शक्य नसते!

१९०५ साली आइनस्टाइनने दिलेल्या सापेक्षता सिद्धांतातून एक सूत्र निघाले. $E = Mc^2$ म्हणजे M किलोग्रॅम पदार्थापासून E जूल ऊर्जा प्राप्त होते. येथे c हा एक स्थिरांक आहे. जो प्रकाशाचा संचरणवेग (३० कोटी मीटर प्रति सेकंद, $3 \times 10^8$ m/s) दर्शवितो. अणुबॉंब मध्ये युरेनियम नष्ट होऊन जी प्रचंड ऊर्जा प्राप्त होते ती याच सूत्राच्या

आधारे! पृथ्वीवर सगळीकडे अंतरिक्षातून प्रचंड शक्तीचे किरण (कॉस्मिक रेज) रात्रंदिवस पडत असतात. विद्युत-चुंबकीय रेडिओ तरंगाप्रमाणे त्यांना घरांचा अवरोध होत नाही, फक्त शिस्याचा अवरोध होतो. १९३४ साली कॅलिफोर्नियात एण्डरसेनने काढलेल्या एका फोटोत दिसले, की शिस्यातून पार गेलेल्या अंतरिक्ष किरणांची जी ऊर्जा कमी झाली ती पॉझीट्रॉन व इलेक्ट्रॉन या जोडीच्या रूपाने तिथे निर्माण झाली. या दोन्ही कणांचे द्रव्यमान सारखेच असते पण विद्युत आवेश पॉझीट्रॉन मध्ये धन तर इलेक्ट्रॉनमध्ये ऋण असतो. अशा प्रकारे आइनस्टाइनच्या सूत्रानुसार शक्ती नाहीशी होऊन ती पदार्थ रूपाने प्रकट झाली! आपल्या पौराणिक कथांमध्ये असे म्हटले आहे, की परमेश्वराच्या आदिशक्तीने भौतिक रूप धारण केल्यामुळे ही सर्व सृष्टी निर्माण झाली!!

वरील उदाहरणात ऊर्जा नाहीशी झाल्यावर परस्पर विरोधी धन व ऋण विद्युत-आवेश असलेले पॉझीट्रॉन व इलेक्ट्रॉन निर्माण झाले. आजकल कित्येक वैज्ञानिकांचे असे मत आहे, की सृष्टी पदार्थ व प्रतिपदार्थ (मैटर व एण्टिमैटर) यांच्या साहाय्याने बनली आहे. संस्कृतमध्ये "विश" या धातूचा अर्थ होतो शिरणे, प्रवेश करणे. त्यामुळे विष्णू हे नाव पडले; कारण त्या देवाने जगातील एकूण एक सर्व भाग व्यापला आहे! आता विश् = व् + इ + श्. अक्षरांचा क्रम उलटा केला तर श् + इ + व् = शिव. नाण्याच्या दुसऱ्या बाजूप्रमाणे त्याच कल्पनेचे निराळे रूप जगाचा असा कोणताही कोनाकोपरा नाही जो शंकाराने व्यापलेला नाही. अशा प्रकारे परस्परांना पोषक हे दोन देव सर्वांचे कल्याण करणारे - सत्यं, शिवं, सुन्दरम् - आहेत!!

(ही कल्पना १९७२ साली माझ्या पत्नीचे मामा व नृत्यकलाप्रवीण रोहिणी भाटे यांचे चुलते, आर. एस. (उपाख्य नामदेव) भाटे यांनी मला सांगितली.)

कै. वि. वि. सरवटे



# सर्वस्व अर्पणाची ती धुंद लाट होती (भगिनी निवेदिता)

कु. विभा जोशी

भगिनी निवेदिता म्हणजे स्वामी विवेकानंदांच्या तपस्येचा प्रसाद. त्यांच्या साधनेवर प्रसन्न होऊन दिलेला जणू पुरोडाशच ते स्वतःही म्हणत परदेशातील माझ्या कार्यरूपी झाडाला आलेलं सर्वोत्कृष्ट फूल म्हणजे भगिनी निवेदिता! निवेदिता सुंदर अर्थगर्भ नाव. अन् त्यानुरूपच त्यागी समर्पित जीवन होतं त्यांचं! निवेदन भक्ती जिनं केली ती निवेदिता! नवविधा भक्तीची अंतिम पायरी म्हणजे निवेदन भक्ती!

ऐका निवेदनाचे लक्षण । देवासी वहावे आपण ।
करावे तत्वविवरण । म्हणिजे कळे ॥

देवासी वहावे आपण - देवाला समर्पित करण्याचा भाव गर्भातच तिच्यात बिंबला होता. मार्गारिटच्या जन्माचे वेळी आईला फार त्रास झाला. तेव्हा तिनं नवस केला - 'माझी प्रसूती नीट झाली तर येणारं मूल मी परमेश्वराला-म्हणजे तुझ्या सेवेला अर्पण करीन.' एरवी नवस बोलताना सत्यनारायण, यज्ञ, रूद्र इथवरच धाव असते. परंतु निवेदितेच्या आईनं मात्र वेगळा अलौकिक असा विचार केला. येणारं बाळ देवाला समर्पित केलं. भारतात जाऊन ही सेवाकार्य करेल असं भविष्य धर्माचार्यांनी वर्तवले. निवेदिता ही जन्मानं आयरिश आणि मूलतः स्कॉटिश कन्यका. मार्गारिट एलिझाबेथ नोबल हे तिचं पूर्ण नाव. सॅम्युएल व मेरी हॅमिल्टन हे तिचे माता-पिता.

तिचे दोन्ही आजोबा आयर्लंड स्वातंत्र्ययुद्धातील सैनिक होते. सॅम्युएल हे धर्मोपदेशक रेवरंड होते. गरिबांचे मित्र होते. सेवा हा त्यांचा स्वभाव होता. मार्गारिटच्या जीवनात सैनिकांचे शौर्य, वीरता व धर्मोपदेशकाचा सेवाभाव यांचं नितांत सुंदर मधुर असं मिश्रण होतं. त्यामुळेच भारताच्या पारतंत्र्याच्या त्या भीषण काळात लॉर्ड कर्झनला 'खोटारडा कोण' हे ठणकावताना ती घाबरली नाही आणि प्लेगच्या काळातील तिची शुश्रूषा बघून सेवेची देवताच प्रकटल्याचे प्रत्यंतर आले.

**जीवन म्हणजे काय असे हो?**

मार्गारिटचं जीवन म्हणजे सत्याचा शोध होता. बालपणी तिला 'मृत्यूनंतर जीवन संपतं का?' की मृत्यूनंतरही जीवन आहे? हे प्रश्न सतावत. 'धर्म' बाबत तर ती नेहमी विचार करी. धर्म हा रसायन व भौतिक शास्त्रांपेक्षा व्यापक विज्ञान आहे. त्याचा मागोवा स्वतःलाच घ्यायचा आहे. काही गोष्टी अनुभवाचा विषय आहे हे तिला उमगलं होतं. विशिष्ट सिद्धांतावर श्रद्धा म्हणजे धर्म का? या प्रश्नांशी ती झगडत असे. धर्म म्हणजे तर प्रकाश. धर्म म्हणजे शाश्वत सत्याचा शोध नि बोध. त्या बोधाकरिता ती तळमळत होती. आकुळव्याकूळ होती. त्या बोधाच्या शोधात तिनं ईसा तत्त्वज्ञान पाठ्य घातलं. बौद्ध तत्त्वज्ञानाचा अभ्यास केला. परंतु ज्ञानतृष्णा शांत होईना. अचानक आशेचा कवडसा तिला दिसला. अर्जुनाला श्रीकृष्ण, नचिकेताला यमराज हा भेटलोच, पण त्या करिता अर्जुनाचा संभ्रम – शरण जाण्याचा भाव, नचिकेताची दृढता, जिज्ञासा हवी ती पराकोटीला पोहोचली की सद्गुरू प्रगटतातच. मार्गारिटला त्याचं प्रत्यंतर आलं. विवेकानंदांच्या रूपाने तिच्या अंतःकरणात ज्ञानाची ज्योत जागली. शिकागो धर्मपरिषदेच्या निमित्ताने स्वामीजी 'ब्रह्मसत्य माय मिथ्या, मुखी हेच गीत, दिग्विजया आज निघालो धर्मध्वज करात' घेऊन समुद्र ओलांडला, आणि मॅकिल ऑड, ख्रिस्तोफर, मार्गारिट आदी अनेक जिज्ञासु 'डोळियाचा डोळा उघडिला जेणे, ठेवविले ठेणे आनंदाचे' अशी अवस्था झाली. मार्गारिट स्वामींच्या प्रत्येक सभेला, चर्चासत्र, प्रश्नोत्तराला उपस्थित राहू लागली. त्यांच्या निःसंदिग्ध, स्पष्ट उत्तरांनी, दृष्टांतानी ती चकित होत होती. स्वामीजींची अवस्था 'करमलामलकंवत्' असल्यामुळे कोणत्याही संदेहाचे निराकरण ते चुटकीसरसे करीत आणि त्या ज्ञानराजापुढे मार्गारिट आदराने, श्रद्धेने नतमस्तक होत असे.



**बीज कोण पेरणार?**

अशाच एका सभेत स्वामीजी म्हणाले, 'आज विश्वाला

आवश्यकता आहे रस्त्यावर येऊन 'आमच्याजवळ ईश्वराशिवाय काही नाही असं म्हणणाऱ्याची, बोला. किती लोक तयार आहेत?' स्वामीजी मायदेशी परतले. पण मार्गारेटच्या कानात शब्द घुमत होते. 'बोला किती लोक तयार आहेत?' मी त्यापैकी एक का होऊ नये?' तिचं मन आक्रन्दू लागलं. अन् एका क्षणी निर्णय झाला. हे सारं सोडून हिंदुस्थानात जायचं. आपली जन्मभूमी, आपला पंथ, ममत्वाचे पाश, तिने सुरू केलेली लाडकी शाळा हे सारे सोडून ती भारतात आली.

**प्रकाशाची यात्रा**

विवेकानंदांनी येथील अत्युष्ण वातावरण, रूढीप्रियता, दारिद्र्य, अज्ञान इ. तोंड द्याव्या लागणाऱ्या आपत्तींचा डोंगर तिच्या समोर उभा केला. पण ती डगमगली नाही. तिला माहीत होतं भारताची यात्रा ही प्रकाशाची यात्रा आहे. अमरत्वाची वाटचाल आहे.

२८ जानेवारी १८९८ ला ती भारतात पोहोचली. केवढा आनंद झाला असेल त्यांना! भारतभूमीच्या प्रथम दर्शनानंच सद्‌गदित होऊन उद्‌गार निघाले, 'विजय असो! आज मी भारतात आहे!' तिच्या या भावविभोर अवस्थेतच तिच्या गळ्यात पुष्पमाला पडली. चमकून तिनं पाहिलं. एका शिष्याद्वारा स्वामीजींनी तिचं स्वागत केलं होतं.

दुसऱ्याच दिवसापासून तिच्या शिक्षणाला प्रारंभ झाला. स्वामी स्वरूपानंद बंगाली शिकवत. त्यांनी लगेच सांगितलं गुरूदेवांच्या वचनामृतांचा इंग्रजी अनुवाद तुम्हाला लिहायचा आहे. लख्ख आणि झक्क!

**आणि मार्गारेट निवेदिता बनली**

२५ मार्च १८९८ ला तिचं उपनयन झालं. पंचपंच उषःकाली सर्व जण आश्रमात जमले. मार्गारेटनं स्वामीजींना साष्टांग प्रणिपात केला. स्वामींनी आशीर्वाद दिला. मस्तकाला विभूती लावली. सभामंडपात स्वर घुमू लागले. 'ॐ असतो मा सद्‌गमय' आज तिचं नामकरण झालं. मार्गारेट निवेदिता बनली. प्रसाद वितरण झालं. स्वामीजी तानपुरा घेऊन शिवपार्वती स्तवन गाऊ लागले. शुचिता, निष्ठा त्या स्वरांमधून जशी स्रवत स्रवत तिच्या हृदयात भिडली. सारेच मंत्रमुग्ध झाले. लवकरच ती स्वामीजींबरोबर भारत भ्रमणाला गेली. रामकृष्ण आश्रमाच्या कठोर नियमांचं ती निर्धारपूर्वक पालन करी. परंतु दोन मनांचा संघर्ष – स्वामीजी सांगत ते भारताचं आध्यात्मिक – अन्य क्षेत्रातील वर्चस्व – तिला पचवायला जड जाईल. स्वाभिमानाला ठेच लागे. वाटे जावे जन्मदेशी! पण क्षणकाळचे संघर्षातून तिला सोडवलं गीतेनं. मन स्थिर करायला मदत केली ध्यानधारणेनं! आपले संदेह चुकीचे आहेत. आपला शत्रु जर कुणी असेल तर तो आपला अहंकार हे तिला मनोमन जाणवलं. त्याकरिता ती मानसिक पातळीवर लढू लागली. स्वामीजींचं लक्ष होतंच. एक दिवस ते बाहेर जायला निघाले. निवेदिताच्या चेहऱ्यावरचं प्रश्नचिन्ह बघून म्हणाले, 'एकांतात जाऊन शांती घेऊन येतो. स्वामीजींची मुद्रा अभय मुद्रा होती. कुणास ठाऊक निवेदितेला एकदम भरून आलं. ती स्वामीजींच्या चरणावर झुकली. स्वामीने तिच्या मस्तकावर हात ठेवला. त्या स्पर्शानं मात्र मनातले विकार, विचार अंतर्धान पावले. अननुभूत शांतीच प्रत्ययाला येऊ लागली. त्यात मार्गारेटचं मी माझेपण कुठल्याकुठे वाहून गेले. हृदयामध्ये जणू आनंद कल्लोळ झाला. हीच अवस्था चिरकाल राहावी, याकरिता निर्मल जीवन जगण्याची आवश्यकता होती. ईश्वराचं सर्वव्यापकत्व अंतःकरणात बिंबून जनसेवेची साधना शिवभावानं जीव सेवा करणं हाच आत्मबोधात स्थिर होण्याचा साधना पथ. स्वामीजी तिला सांगत, 'बेटा, तुझा इथं येण्याचा उद्देश सेवा आणि दुसऱ्याची उन्नती करणं आहे. त्यांना उपदेश करणं नाही. ज्ञान आणि बुद्धीने 'मी श्रेष्ठ आहे हा आभास निर्माण करणं, पाश्चिमात्य विचार लादणं नव्हे! त्याने केवळ तुझा अहंकार वाढेल.'

सहज बोलणे हितोपदेश म्हणतात ते असं. तीही अधीरतेने स्वामींचे शब्द कर्णसंपुटात साठवी. ते अंतःकरणात बिंबून हळूहळू कृतिरूप होत. तवा तापला की पोळी पटकन होते. तसंच अध्यात्मात आहे. तप्त जीव लवकर शांत होतो. त्रिविध तापे पोळला । तोच अधिकारी जाहला । स्वामींनी तिची तयारी बघून वर्षभरातच तिला ब्रह्मचारिणीची अंतिम दीक्षा दिली. त्यांनी तिला बुद्धचरित्र सांगितले. बोध केला. मोक्ष नव्हे तर वैराग्य, आत्मसाक्षात्कार नाहीतर आत्मसमर्पण हेच तुझं जीवित ध्येय,' त्यानंतर शिवपूजन झालं. स्वामीजी आपल्या स्वर्गीय आवाजात शिवमहिमा गाऊ लागले. भावभीन्या त्या वातावरणात निवेदितेनं प्रतिज्ञा केली. 'मी माझेपणाची आहुती दिली, मी माझेपणविरहित, व्यक्तिवाद सोडून.' जीवन कसे जगावं हे ती शारदामातांच्या जीवनातून शिकली. प्रेमाला – कर्तव्याला मर्यादा नाही. देणेपणाला अंत नाही. वात्सल्याची कक्षा रुंदावू तेवढी रुंदावते याचा साक्षात्कार तिला त्या शारदाश्रमात दर क्षणात येत होता.

करू तितकं करता येतं. मी सर्वव्यापी आहे. मला अस्पर्श असं काही नाही. मला कुणाचं क्षेत्र अडवू शकत नाही, हे तिला जाणवलं होतं. कवीनं म्हटल्याप्रमाणे 'सर्वस्वाचे दान आधि करी । सर्वस्वचि ये तुझ्या घरी ॥' याचं साक्षात उदाहरण म्हणजे निवेदिता! सर्वभावाने ती आदिशक्ती भारतमातेला शरण गेली नि तिचं वैभव झळाळून उठलं.

**चरित्राचे पैलू अनेकविध**

निवेदिता १८९८ मध्ये भारतात आल्या. निवेदिता म्हणून त्यांचं उणंपुरं आयुष्य १३ वर्षांचं आणि अवघ्या १३ वर्षांच्या काळात त्यांनी काय केलं नाही? बालिका विद्यालय सुरू केलं. बालविधवांमध्ये, स्त्रियांमध्ये आत्मविश्वास जागवला. त्यांच्या मनमस्तिष्कचा विकास केला. प्लेग आणि पुराच्या वेळी सेवा शुश्रूषा केली. अवनिंद्रनाथ ठाकुर, नंदलाल बसू इत्यादी कलाकारांना अजिंठा वेरूळच्या कला- अध्ययनाला प्रेरित केलं. जगदीशचंद्र बसूंना 'Response of Inorganic & living matters' सारख्या शोधप्रबंधाच्या लेखनात मदत केली. दिव्यात तेल ओतणाऱ्या महिलेचा पुतळा करून व निवेदिता सभागृह उभारून जगदीशचंद्रांनी त्यांच्या विषयीची कृतज्ञता प्रगट केली. दिनेशचंद्र सेनांना

'History of Bengali language & literature' या पुस्तकाकरिता मदत केली. संपूर्ण वर्षभर दिवसातील १०/१५ तास हे काम चालत असे, डॉन, न्यू इंडिया, इंडियन रिव्यू, प्रबुद्ध भारत, ट्रिब्यून, मराठा, अमृत बझार पत्रिका अशा विविध वृत्तपत्रात लेख – ज्वालाग्राही लेख लिहीत असे. योगी अरविंद अज्ञातवासात गेल्यानंतर त्यांचे 'कर्मयोगिन्' त्यांनी काही काळ चालवले. देश परदेशात त्या व्याख्याने देत. स्वतः Master as I saw him, Web of Indian life, Cradle tales of Hinduism. सारखी पुस्तकं लिहिली.

**क्रांतिकारक सहभाग**

विविध आघाड्या सांभाळीत असताना एक भान त्यांना अवश्य होतं, की कोणत्याही राष्ट्राचा विकास ह्या स्वातंत्र्याशिवाय होऊ शकत नाही. क्रांतीचं रक्त त्यांच्या नसानसातून खेळत होतं. क्रांतीची मशाल हाती घेऊन त्यांनी भारत भ्रमण केलं. योगी अरविंदाना निर्भीडपणे विचारले, 'नोकरी करण्याकरिता का आपला जन्म आहे?' बंगाल तुमची वाट पाहतो आहे."ही कळकळ, त्यातील ताकद अरविंदांना स्पर्शून गेली. 'ये हृदयीचे ते हृदयी घातले' ही किमयाच जणू निवेदितेला साधली होती. अरविंद म्हणाले, 'मला सहयोगी हवा आहे', 'मी आहे आपली सहयोगी' लगेच त्या सरसावल्या. 'जिथे कमी तिथे मी' हे त्यांचं जीवनसूत्र होतं. भूपेन करिता २०,००० (वीस हजार) चा जामीन थोड्या तासात उभा करायला त्या कचरल्या नाहीत. बॉंबविद्या शिकण्याची प्रेरणा त्यांनी जागवली. क्रांतिकारकांच्या त्या जोन ऑफ आर्क होत्या. स्वदेशी आंदोलनात त्यांना कमीपणा वाटत नाही. त्या काळात 'वंदेमातरम्' म्हणायला बंदी होती. तर निवेदितेच्या शाळेची प्रार्थनाच 'वंदेमातरम्' होती. त्या मुलींना शाळेत सूत कातायला शिकवीत. स्वतः खादी वापरीत. जे परकीय असेल ते उखडून फेकणे, स्वदेशीची तेथे स्थापना करणे, हे जीवनव्रत होतं. बोलण्यात आलेले इंग्रजी शब्द त्यांना आवडत नसत. एकदा एक सज्जन दर वाक्यागणिक 'मॅडम' संबोधून बोलू लागला. त्या म्हणाल्या, 'भगिनी म्हणा, किती सुंदर शब्द आहे आपल्या भाषेत!' अशा पद्धतीने इंग्रजी शब्द वापरणाऱ्यांना त्यांनी 'तुमची आई गोरकाय आहे की वडील इंग्रज आहे', असे विचारायला कमी केले नाही. भारताचा राष्ट्रध्वज कसा असावा, त्याचे चिंतन करून त्यांनी तो तयार केला. रंग भगवा त्यावर अस्थिसमर्पणातून निर्मित वज्र वंदेमातरम्, 'यतो धर्मस्ततो जयः' हे रेखाटलेले स्वतंत्र विचार, चिंतन भारताच्या प्राचीन विचारधारेला धरून मूलस्रोत पुढे न्यायचा. आपण फक्त एक चॅनल असं साधं सोपं गृहीतकृत्य होतं त्यांचं.

कवि सुब्रम्हण्यम त्यांना गुरू मानीत. त्यांच्या भेटीनंतरच ते कार्याकरिता अधिक उद्युक्त झाले. त्यांनी निवेदितांचं वर्णन केलंय.

निवेदिता! साक्षात् करूणावर दायिनी
निवेदिता! पवित्र स्नेहस्रोत प्रदायिनी
सूर्यरूपिणी, अज्ञानांधकार विनाशिनी
मेघरूपिणी, अमोघ जलधारा वर्षिणी
शक्ती तू, जन जन जीवन दायिनी
लक्ष्मी, तू ऐहिक दैविक दारिद्य हारिणी
अग्निस्वरूपिणी, किल्मिष भस्मधारिणी
लोकमाता, शतनमन सर्वस्व निवेदिनी

कविवर्य रविंद्रनाथ टागोर 'लोकमाता' म्हणूनच तिला संबोधित. ते म्हणत, आपण सारे तन देतो, धन देतो, पण निवेदितेनं अंतःकरण उधळून दिलं. ती नेहमीच म्हणत असे, 'मुलांनो, महाकाव्याचे शब्द बना, गीतेचे अक्षर व्हा, फुलाची पाकळी व्हा, समुद्राची लाट, अन् लाटेचा बिंदू बना. कोणत्याही महान गोष्टीत विलीन होऊन तिच्याबरोबरच मोठे व्हा. तिचा एक घटक म्हणून म्हणजे मग सन्मान, कर्मफळाची अपेक्षा राहणार नाही. निष्काम कर्म हीच सेवा. हीच पूजा. हा एवढाच बोध जरी आपण स्वीकारला तरीही आपलं अन् भारताचं चित्र बदलेल हे निश्चित!'

*कु. चित्रा जोशी*
*अहिल्यादेवी मंदिर,*
*धंतोली, नागपूर.*

# व्यवस्थापन : रसिकतेने समृद्ध जीवन जगण्याचा मार्ग

डॉ. श्री. ग. बापट

'व्यवस्थापन' म्हणजे 'कामगार' किंवा 'ग्राहक' किंवा दोघांचीही पिळवणूक करून अमाप पैसा मिळविण्याचा हव्यास असणारा एक कारखाना असतो' असा सर्वसामान्य समज प्रस्थापित होत चालला आहे. कोणत्याही घटकाने दुसऱ्या कोणत्याही घटकाची पिळवणूक न करता आर्थिक व मानसिक समृद्धी शक्य आहे का? पॉंडिचेरी येथील अरविंद इन्स्टिट्यूट ऑफ रिसर्च इन सोशल सायन्सेस तर्फे प्रकाशित 'मॅनेजमेंट बाय कॉन्शसनेस' या पुस्तिकेच्या आधारे आधुनिक व्यवस्थापन विचारसरणीवर एक दृष्टिक्षेप..

'ॲडव्हेंट' या नियतकालिकात प्रथम प्रकाशित झालेल्या डॉ. जी. पी. गुप्ता यांच्या लेखाची पुस्तिका श्री. अरविंद इन्स्टिट्यूट ऑफ रिसर्च इन सोशल सायन्सेसने प्रसिद्ध केली. या पुस्तिकेतील विचार व श्री. मात्सुशिटा यांनी 'फिलॉसॉफी ऑफ मॅनेजमेंट' या पुस्तिकेत मांडलेले विचार यात व्यवस्थापन शास्त्राचा अभ्यासक म्हणून बरेच साधर्म्य जाणवले. त्यातूनच या लेखाची मांडणी केली आहे.

व्यक्तिगत जीवनात नीतिमूल्यांचे जतन करून जागरुकतेने उच्च दर्जाचे जीवनमान मिळविणे शक्य आहे का? 'सुबत्ता' व 'विकास' दोन्हीही मिळवण्यासाठी व्यक्ती व उद्योगसंस्था यांना सुयोग्य व्यवस्थापनाची आवश्यकता आहे. उत्पादन वाढविणे म्हणजे लौकिक अर्थाने सुबत्ता व समृद्धी वाढविणे होय. परंतु येथे एक महत्त्वाचा विचार समजावून घेतला पाहिजे व तो म्हणजे, जागरुकतेवर (Consciousness) आधारलेले सुयोग्य व्यवस्थापन. हे उत्पादन वाढविण्यास मदत करते, परंतु पिळवणूक समर्थनीय मानत नाही.

आधुनिक औद्योगिक समाज जसजसा प्रस्थापित होत चालला आहे त्यानुसार व्यवस्थापनाचे महत्त्व वाढत चालले आहे. संघटना स्वतः मोठ्या आकाराच्या होत चालल्या आहेतच पण त्याचबरोबर इतर संकीर्ण घटकही गुंतागुंतीचे होत चालले आहेत. उदा. वस्तु वितरणासाठी पैसा, उत्तम जनसंपर्क, श्रमशक्तीचे आयोजन, प्रशिक्षण तज्ज्ञांची मदत, नवउत्पादनासाठी संशोधन आणि विकास अशी स्वतंत्र घटकांची योजना करावीच लागते. ग्राहकप्रधान समाजाला रुचेल — मानवेल अशी रचना करणे क्रमप्राप्त ठरते.



या सर्व आधुनिक गुंतागुंतीचा विचार करताना जर आपण 'योग' व 'क्षेम' या कल्पना तपासून पाहिल्या तर उपयुक्त ठरेल. 'योग' कर्मसु कौशलम् यात अमान्य होण्यासारखे काहीच नाही. (भारतातील राष्ट्रीय उत्पादकता मंडळाचे तर ते बोधवाक्य आहे). कोणतेही 'कार्य' (work) म्हणजे जर पूजा (worship) असेल तर हेतुपुरस्पर केलेले कोणतेही काम 'साक्षात्कार' घडविते.

'व्यक्तींनी व व्यक्तिसमूहांनी एकत्र येऊन समान उद्दिष्टासाठी काम करणे' याला पर्याय नाही. हे असे काम न केल्यास नियोजन, व्यवस्थापन, उत्पादकता, लोक-क्षेम, सर्वोदय, हे सर्व अशक्य होय. पूर्णपणे वाहून घेण्याची तयारी व उच्च दर्जाच्या जागरुकतेकडे वाटचाल ही व्यवस्थापनात कार्य करणाऱ्या व्यक्तींची मूलगामी प्रवृत्ती हवी.

जर मनुष्य स्वतःच्या विकारांवर विचाराने विजय मिळवू शकला नाही तर बाकीचे सर्व विजय व्यर्थ आहेत. स्वतःच्या 'मी' पणावर विजय मिळविण्यास अग्रक्रम दिला पाहिजे. कोणत्याही तंत्राचा वापर करून आपण काय मिळवितो? अर्नोल्ड बॅनेटनेसुद्धा 'स्व-विकास' (Self Development) व 'स्व- व्यवस्थापन' (Self Management) याचा पुरस्कार केला आहे. जो धन्वंतरी स्वतःच्या मानसिक जखमा भरू शकतो, तोच आपल्या करियरची योग्य प्रकारे सुरुवात करू शकतो. 'व्यक्तीगत विकासाशिवाय व्यवस्थापकीय विकास शक्य नाही, यालाच मात्सुशिटा यांनी 'सोनियो माइंड' असे म्हटले आहे.

**आधुनिक व्यवस्थापन :**

**भोगवादी - व्यावसायिक - आत्मा - विरहित**

आजचे 'व्यवस्थापन' हे अर्थात विदेशातून आयात केलेले आहे. या व्यवस्थापनाची मुळे भारतीय मातीत रुजलेली नाहीत. आपण संगणक यंत्रे व रोबोटस्च्या युगात प्रवेश केला आहे. हळूहळू माणसाचे हात, माणसाचे मन वगैरे बाजूला पडत आहे. भारतीय परंपरेवर हे आधारलेले नाही. प्रचंड प्रमाणातील तांत्रिक प्रगतीमुळे असे काही वातावरण निर्माण झाले आहे, की माणसाचे शारीरिक व मानसिक आरोग्य बिघडत चालले आहे. 'उत्पादना'वर लक्ष केंद्रित होत आहे. कपंनीचा नफा-तोटा पत्रक व ताळेबंद महत्त्वाचा ठरतो आहे. परंतु व्यक्तीचा गुणात्मक ताळेबंद कमी महत्त्वाचा ठरतो आहे.

पूर्वी व्यवस्थापन हे 'व्यक्तिगत' व प्रत्यक्ष कृतीवर अवलंबून होते. आता ते अप्रत्यक्ष होऊ लागले आहे. या व्यवस्थापन पद्धतीत भोगवाद वाढला व उत्पादन विक्रीच्या चढाओढी सुरू झाल्या व त्यातूनच नफ्याची चटक वाढली. नफा मिळविणे व वाढविणे महत्त्वाचे. 'साध्य' महत्त्वाचे 'साधनं' कमी महत्त्वाची! परंतु व्यवस्थापन म्हणजे नफेबाजीचे साधन होऊ लागले. नफ्याची उत्तरोत्तर वाढ हे अंतिम साध्य समजले जाऊ लागले. इतर सर्व गोष्टी शून्य महत्त्वाच्या मानल्या जाऊ लागल्या.

**व्यवस्थापनविषयक आध्यात्मिक व तांत्रिक दृष्टिकोन :**

व्यवस्थापकीय प्रक्रियेत माणसे, मटेरियल (वस्तू), पद्धती आणि पैसा या सर्व घटकांची काही किमान काळजी घ्यावी लागते. सत्य हे आहे, की प्रत्येक घटकात देवत्व आहे. प्रत्येक वस्तूत देवत्व आहे.

१) प्रत्येक सेवकाचा शांतपणे अभ्यास करावा. त्याची हुशारी व सुप्त शक्तीचा शोध घ्यावा. प्रत्येक सेवकाला त्याच्या कमाल कार्यक्षमतेपर्यंत नेण्याचा प्रयत्न करावा.

प्रत्येक सेवकाने स्वतः जागरुकतेने आपण काय योगदान देतो व आपणास काय मोबदला मिळतो याचा सतत विचार करावा. त्याच्या मनात काही चुकीच्या कल्पना असल्या 'आपण खूप काही करतो परंतु आपल्याला इतरांच्या मानाने कमी मान-सन्मान मिळतो.' वगैरे तर त्या काढून टाकाव्यात.

माणसांकडे लक्ष देणे याचा अर्थ ते जे काय करतात त्यात रस घेणे व त्यांना योग्य मान देणे.

२) सेवकांमध्ये एकमेकात होणारे संघर्ष कमी कसे होतील ते पाहावे. धारदार टीका किंवा अविचारी पद्धतीची मांडणी म्हणजे माणसाचा कपाळमोक्ष करणे होय. प्रेमाची भावना नेहमी प्रभावी ठरते. सहृदयतेने केलेल्या सूचना व एकूणच समजुतदारपणा यामुळे खूप काही साध्य होते. केवळ दोष दिग्दर्शनांचा काहीच उपयोग होत नाही. स्वतःचे पूर्ण आकलन झाल्यावर इतरांबद्दल मते मांडावीत. ते जोपर्यंत पूर्ण होत नाही तोपर्यंत स्वतःबद्दलच विचार करणे योग्य ठरेल.

३) यंत्रसामग्री व इतर व्यवस्था उत्तम ठेवावी. या यंत्रसामग्रीलाही जीव असतो. त्यांचीही काळजी घ्यावी. त्यामुळे अधिक काळ त्यांच्याकडून सेवा मिळेल.

४) प्रत्येक पद्धतीचा अभ्यास करा व ती पद्धत कमाल कार्यक्षमता देते किंवा नाही ते तपासा. प्रत्येक पद्धतीचा जास्तीत जास्त फायदा घेणे आवश्यक आहे.

५) स्वच्छता, नियमितपणा व शांतता प्रस्थापित करण्यासाठी काम करावयाचे असते. अनुकूल वातावरण निर्माण करण्यासाठी वृक्षसंवर्धन, ताजी फुले, तालबद्ध संगीत, म्यूरल्स, कमीत कमी आवाज यांचा उपयोग होतो.

६) अविश्वासाच्या सर्व छटा काढून टाकाव्यात. गुप्तता, लपवाछपवी, यांना फाटा द्यावा. कोणत्याही प्रकारच्या खोटेपणाला थारा देऊ नये.

७) बाहेरून येणारे टपाल, भेटावयास येणाऱ्या व्यक्ती, टेलिफोन कॉल्स इ. ना सत्वर व शक्यतो अनुकूल प्रतिसाद (Response) द्यावा. या दृष्टिकोनामुळे कार्यक्षमता निश्चित वाढते.

८) कोणत्याही 'बाह्य' जटील प्रश्नांचे उत्तर अंतर-मनात शोधा. जागरुकतेने व आपल्या प्रत्येकामध्ये असलेल्या दैवी शक्तीमध्ये त्यांचे उत्तर शोधा. निर्णयप्रक्रियेत अंतर्मनाच्या शक्तीवर (intuition) पुरेसा भर दिला पाहिजे.

थोडक्यात असे म्हणता येईल की, जागरुक व्यवस्थापन याचा

अर्थ बाह्य जगातील घटना व माणसाच्या अंतर्मनातील दैवी शक्ती यांच्यात अनुबंध (linkage) निर्माण करण्याचा प्रयत्न होय. अंतर्मनात आवश्यक ते बदल घडवून आणून बाह्य घटकात बदल घडवून आणणे शक्य आहे.

प्रत्येक व्यक्तीच्या दृश्य व्यक्तिमत्वामागे एक 'आतली' अशी खरी व्यक्ती दडलेली असते. कोणत्याही व्यक्तीला आपल्या दैवी शक्तीचा साक्षात्कार घडवायचा असेल तर त्याने आपल्यातील केंद्रित शक्तीशी संवाद साधून मुक्त व्हावयास हवे. या प्रक्रियेत त्यांच्या अंतर्मनातील सर्व द्वंद्वे व विसंवाद नाहीसे होतील. तो स्वतःप्रमाणेच इतरांच्याही अंतर्मनाचा ठाव घेऊ लागतो. प्रत्येक व्यक्तीत व प्रत्येक वस्तूत जीव व दैवी शक्ती आहे याचा त्याला शोध लागतो.

'जागरुकतेचा दृष्टिकोन' असे मानतो की, बाह्य जगातील सर्व प्रश्नांची उत्तरे अंतर्मनाच्या खोलीत सापडतात. जगात आपल्या सभोवताली घडत असलेल्या घटनांचे मूळ आपल्या अंतर्मनात आहे. अंतर्मनावर नियंत्रण ठेऊन बाह्य घटकांवर नियंत्रण ठेवता येते.

या विचारसरणीत, कोणत्याही नव्या 'पद्धती' सुचविण्यात आलेल्या नाहीत. कारण पद्धती या मानसिकच असतात. या लेखाचा प्रमुख उद्देश व्यवस्थापकांच्या मनावर असा ठसा उमटविण्याचा आहे, की व्यक्तीच्या अंतर्मनात एक दैवी शक्ती असते हे ओळखून ज्ञान, संवेदना, प्रेम, सौंदर्य व शक्ती यांच्या आधारे 'अंतर्मनाकडून बाह्य घटनांकडे' (from within to without) प्रवास हवा. अर्थात् एका रात्रीत हे तत्त्वज्ञान प्रत्यक्षात येईल अशी अपेक्षा नाही. 'Even if the struggling world is left outside one man's perfection still can save the world'. जग नजीकच्या भविष्यकाळात असे बदलणार आहे आपण काय ठरवलय? मानसिक बदल व तांत्रिक विकास यांचा विचार करावयाचा तर असे म्हटले जाते की, Man has reached the Moon - but Man has not reached the Man.' ही गोष्ट अर्थातच सर्व व्यवस्थापकांना लक्षात घ्यावीच लागेल.

या विविध बदलत्या घटकांचा एकत्रित विचार म्हणजेच कोणीही कोणाचीही पिळवणूक न करता रसिकतेने समृद्ध जीवन जगण्याचा प्रयोग होय.

*डॉ. श्री. ग. बापट*
*१७, प्रशांत नगर, नवी पेठ,*
*पुणे ४११ ०३०.*
*दूरध्वनी : ४४७१३८*

# मनुष्य विश्रांती घेतो का?

श्री. के. एन. रिसबुड

आपण नेहमीच विश्रांती हा शब्द वापरतो. विश्रांती घ्या किंवा विश्रांती घेतो आहे असे नेहमीच म्हणत असतो. पण विश्रांती घेण्याची क्रिया कशी असते व ती कशी असावी किंवा खरोखर आपल्याला विश्रांती मिळते का, ह्याचा बारीकसा विचारही आपण कधीच करत नाही. विश्रांती घेणे म्हणजे जमिनीवर अथवा गादीवर हातपाय लांब अवस्थेत ठेऊन शांत पडून राहणे हाच ढोबळ अर्थ आपण विश्रांती अवस्थेचा करीत असतो. पण बारकाईने त्याचा शोध घेतला असता असे दिसून येते, की ज्याला आपण विश्रांती समजतो ती खऱ्या अर्थाने विश्रांती नसतेच.

आपल्या देहात अनेक स्थूल व सूक्ष्म इंद्रिये आहेत. त्यांचे कार्य सतत चालू आहे. त्यापैकी काही इंद्रियांची कार्ये जाणिवेशी संलग्न व काही जाणीवरहित चालू असतात. उदा. श्वासोच्छ्श्वास ही क्रिया जी फुफ्फुसाद्वारे होत असते, ती जाणीवरहित आहे. त्या क्रियेत मन, बुद्धी अलिप्त असते, आता जाणीवपूर्वक होणारी क्रिया वास येणे अथवा घेणे. प्रथम नाकाला वास जाणवतो. नाकाच्या आतील ज्ञानतंतू मनाकडे वासाचा संदेश देतात, मन बुद्धीकडे व बुद्धी त्या संदेशाचे पृथःकरण करून हा वास कशाचा? चांगला किंवा वाईट? कुठून येत आहे? हे ठरवून त्याची जाण आपल्याला देते. ह्या सर्व इंद्रियांच्या क्रिया इतक्या जलद घडतात, की त्या क्रियेची जाणीव न होता सहजपणे होते आहे असेच वाटते.

आता येथे एक प्रश्न उभा राहतो तो असा, की ही जाणीव कोणाला होते? त्या जाणिवेला जाणून घेणारा किंवा त्याची दखल घेणारा कोण? कोणी तरी निश्चितच असायला हवा. तोच आत्मा किंवा जीवांश! ह्याची उपस्थिती जर ह्या देहात नसती तर वरील सर्व क्रिया घडूनही त्या न झाल्यातच जमा झाल्या असत्या. पण ह्या गोष्टीवर इथे जास्त चर्चा अनावश्यक आहे. प्रमुख विषय विश्रांती आहे. तेव्हा त्या विषयाकडे परत येणे क्रमप्राप्त आहे.

आता आपल्याला असे दिसून आले, की आपल्या देहाची यावद्यावंत इंद्रिये सतत अविश्रांत कार्यरत आहेत. काही जाणीवपूर्वक व काही जाणीवरहित हाच काय तो फरक. अन ही सर्व इंद्रिये देहाशी संलग्न आहेत. ज्या देहाला आपण विश्रांती अवस्थेत आणू इच्छितो किंवा ज्या देहाद्वारे आपण विश्रांती घेतो, मग ती विश्रांती खऱ्या अर्थाने विश्रांती असू शकते का? अर्थातच 'नाही' हे उत्तर आपल्याला मिळते.

मग खरी विश्रांती कशाला म्हणावी व ती कशी असावी किंवा ती मिळवता येईल का? हा बिकट प्रश्न आपल्याला सोडवायचा आहे व आता त्याचा आपण विचार करू.

आपण झोपेमुळे आपल्याला विश्रांती मिळते असे समजतो व काही अर्थाने ते सत्य आहे. पण पूर्ण सत्य नाही. कारण झोपेत ही आपले मन सुप्तावस्थेत कार्य करीतच असते. ते जर पूर्ण क्रियारहित असते तर आपल्याला जी स्वप्नावस्थेची जाणीव झोपेतही होते ती झालीच नसती. क्षणभर असे धरून चालू या, की आपल्याला स्वप्नरहित गाढ झोप लागली तरी पण उठल्यावर मला शांत अथवा गाढ झोप लागली होती. ही जाणीव असतेच, म्हणजे त्या गाढ झोपेची स्मृती शिल्लक असते. म्हणजे मेंदूचे अथवा बुद्धीचे स्मृती साठवण्याचे कार्य चालूच असते. इतकेच नव्हे, तर देहाचे बाह्य चलनवलनही चालू असते. उदा. कूस बदलणे, हातापायाच्या नकळत होणाऱ्या हालचाली. समजा आपल्या डोक्याखालची उशी सरकून बाजूला गेली आहे त्या वेळी झोपेत असूनदेखील नकळत आपण आपला हात दुमडून उशी डोक्याखाली आणतो. म्हणजे बाह्येंद्रियाच्या सर्व क्रिया होत असतात. ह्यावरून हे कळून येते, की झोप हीदेखील खऱ्या अर्थाने विश्रांती होऊ शकत नाही.

विश्रांती घेण्याची एक दुसरीही अवस्था आहे. ज्या वेळी आपण एकच काम सतत करीत असतो. त्या वेळी त्या कामाचा अथवा विषयांचा शीण आपल्याला जाणवतो. तो शीण किंवा थकवा घालवण्यासाठी एखादा दुसरा विषय अथवा काम हाती घेतो. त्यामुळे काही काळ आपले मन ताजेतवाने झाल्यासारखे वाटते. पण ह्या विश्रांती प्रकारात ही मनाचे व बुद्धीचे कार्य पूर्णपणे थांबते का? तर उत्तर 'नाही' असेच आपल्याला मिळेल. कारण ह्यांत आपण बुद्धीला व इतर देहेंद्रियांना पुरविलेल्या कार्यात फक्त बदल केलेला असतो.

आपल्या देहाच्या इंद्रियांकडून होणाऱ्या सर्व क्रिया मनावर अवलंबून आहेत. मनाद्वारेच त्या होत असतात असे आपल्याला दिसून येते. मग जर आपले मन आपल्याला विश्रांती अवस्थेत नेता आले तर मात्र सर्व इंद्रियांच्या हालचाली होऊनही त्याची जाणीव आपल्याला होणार नाही. त्या सर्व हालचाली एखाद्या सर्पाचे विष काढल्यावर ज्या प्रमाणे होत राहतील तद्वत जाणीवरहित अवस्थेत आपण असू. थोडक्यात आपण अलिप्त अवस्थेत राहू. ही मनाची अलिप्त अवस्था कशी निर्माण करता येईल?

आपले मन हे इंद्रिय अतिसूक्ष्म व चंचल आहे. मग ह्या सूक्ष्म मनाला त्या पेक्षाही सूक्ष्म करता येईल का? काट्यानीच काटा काढणे अथवा विषानेच विष उतरवणे हा प्रयोग जर आपल्याला करता आला तर निश्चितच खऱ्या विश्रांतीप्रत आपण जाऊ शकू. हा प्रयोग अवघड

आहे खरा. पण निर्धारशक्ती जी आपल्या देहांत सुप्त आहे तिला वेठीस धरून किंवा तिला जागृत करून हा प्रयोग यशस्वी करता येईल.

प्रथम निर्धारशक्तीद्वारे मनावर ताबा मिळवणे म्हणजे मनांची चंचल वृत्ती जो तिचा सहज स्वभाव आहे -- त्या वृत्तीला कुठेतरी स्थिर करणे. ही स्थिरावस्था आपल्या कुठल्याही एखाद्या वस्तूवर किंवा प्रतिमेवर साध्य करता येइल. अन् हे साध्य झाले तर मनाचा विचारप्रवाह जो सारखा चालू असतो तो आपोआप थांबेल. जसा एखादा शेतकरी आपल्या शेतात किंवा वाफ्यात येणाऱ्या पाण्याचा ओघ अडसर निर्माण करून थांबवतो त्याप्रमाणे मनाच्या विचारप्रवाहाला एखादा अडसर कुठल्याही प्रतिमेद्वारे उभा केला असता विचारप्रवाह केंद्रित होण्यास मदत होते. ह्या ही प्रयोगांत आपल्यापुढे अडचण आहेच. ती कोणती?

ती अडचण कालमर्यादेची वरील मनाची अवस्था ही काही कालच राहू शकेल. ती अवस्था दीर्घकाल टिकवणे सामान्य माणसांच्या शक्ती बाहेरचे आहे. दुसरी बाब महत्त्वाची अशी की जरी बाह्य गोष्टीं कडून एकाच वस्तूवर मन काही काल स्थिर झाले तरी त्या कालात ही बुद्धीचे म्हणजेच विचारांचे अल्प का होईना कार्य चालू असते व त्यातून सुटका करून घेणे कसे शक्य आहे. म्हणजे हाही प्रयोग विश्रांती देऊ शकत नाही. अन त्यात एखादी व्यक्ती यशस्वी झाली तर काही क्षणापुरतीच.

स्मृती व आकलन ही दोन कार्ये बुद्धिद्वारा सतत होत असतात. आकलनाद्वारे बहिर्जगताचे यथायावत ज्ञान बुद्धी स्मृतिरूपात साठवण करीत असते आणि योग्य वेळ येताच ती आठवण स्मृतिस्वरूपात आपल्याला होत असते. हे आकलन व स्मृतीचे कार्य सतत एखाद्या प्रवाहाप्रमाणे चालू असते. आपल्या दैनंदिन व्यवहारांत क्षणोक्षणी हा अनुभव आपण सतत घेत असतो. समजा आपण बाजारात काही वस्तू खरेदी करण्यास गेलो. तत्पूर्वी काय काय खरेदी करावयाचे त्याची साठवण म्हणजेच आकलन बुद्धीद्वारा करतो व ते स्मृतिरूपात साठवले जाते. प्रत्यक्ष व्यवहार करताना स्मृतीकडून वस्तूची यादी आपल्याला मिळते. नंतर आपण सर्व खरेदी करतो त्याच वेळी एखादी वस्तू त्या दुकानात आपल्याला दिसते पण त्या वेळी त्या वस्तूची निकड नसल्यामुळे आपण ती घेत नाही. असे जरी असले तरी लगेच त्या वस्तूच आकलन होऊन तत्क्षणाला स्मृतिरूपात साठवण केली जाते व योग्य वेळी स्मृती त्या वस्तुसंबंधात आठवण करून देते. ही सर्व क्रिया इतक्या जलद होत असते, की आपल्याला किंचितदेखील त्या क्रियेबद्दलची जाण होत नाही. ही आकलन व स्मृतीची कार्ये दैनंदिन प्रत्येक व्यवहारात सतत घडत असतात. जोपर्यंत माणूस जिवंत आहे तोपर्यंत स्मृती व आकलन या दोन कार्यातून सुटका होणे अशक्य आहे. कारण स्मृती व आकलन ह्या दोन गोष्टीच माणसांच्या जिवंतपणाचे लक्षण आहे. ह्या दोन शक्तींचे कार्य थांबताच माणूस मृतावस्थेत जातो किंवा ह्या दोन कार्यांच्या शक्ती प्रवाहात किंचित जरी अडसर निर्माण झाला तर माणूस वेडा ठरविला जातो.

माणसांच्या शरीररचनेसंबंधात सर्व बाजूने विचार केल्यावर आपण ह्या निर्णयाप्रत येतो, की हे शरीर यंत्र किंवा या शरीर यंत्राचा कुठलाही भाग थांबवणे शक्य नाही, अन् ते जर शक्य नाही. तर देहाला विश्रांती मिळेल का? व ती आपण घेत असतो असे म्हणणे एक भ्रामक कल्पना नाही का?

शेवटी ह्या जगताचा सर्व प्रपंच जो सतत कार्यान्वित आहे ह्यात भाग घेणारे सर्व सचेतन, अचेतन वस्तु मात्र व त्यातलाच एक अंश मानवी देह आहे. तेव्हा ह्या देह यंत्राची गती सतत चालू राहणार व ती राहाणे इष्टही आहे. अन्यथा एखाद्या मोठ्या यंत्रात किंचितसा बारीक स्क्रू जरी ढिला झाला तर त्या सर्व यंत्राचे कार्य जसे क्षणात थांबते तद्वतच ह्या जगाची गतीशिलता थांबणार नाही का? देवाने प्रकृतीची रचनाच अशी केली आहे, की हे महायंत्र कधीच थांबू शकणार नाही व ते थांबवणे किंवा त्या यंत्राला विश्रांती देणे देवाच्याही हातात नाही, मग माणसाच्या कोठून असणार?

जन्मापासून देह पडे पावेतो अविश्रांत श्रम, सतत कर्म हाच देहाचा जन्मसिद्ध स्वभाव जर आहे तर "विश्रांती" ही कवीकल्पनाच नाही का?

म्हणूनच गीताकार श्रीकृष्ण भगवान सांगतात,
"न ही कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्य कर्मकृत्"
"कार्यते ह्यवशः कर्म सर्वः प्रकृति जैर्गुणैः"

*श्री. के. एन. रिसबुड*
*जी १७, राजश्री शाहू सोसायटी, पुणे - सातारा रोड, पुणे ३७*

# पू. स्वामीजींच्या दिव्य जीवनातील काही बोलके व उद्बोधक प्रसंग

श्री. वसंतराव गोखले

स्वामी विवेकानंदांचे सर्वच जीवन जरी अल्पवयी असले, तरी असंख्य बहुमोल प्रसंगांनी कसे भरलेले दिसून येते. त्यांतलेच काही निवडक प्रसंग येथे आठवून त्यापासून काही बोध घेता आला तर पाहू या; प्रयत्न करू या.

१) नरेंद्र (स्वामीजींचे पूर्वाश्रमीचे नाव लहान असताना एकदा जिन्यावरून पडला व त्याला खोक पडली. हा प्रसंग अगदी साधा आहे. लहान मुले नेहमीच धावतात, पळतात, पडतात – जरा रडतात व पुन्हा सर्व विसरून तेच पुन्हा पुन्हा करीत असतात. मग नरेंद्राच्या या पडण्याचे वैशिष्ट्य काय? ती जखम बरीही झाली. सर्व जण तो प्रसंग विसरूनही गेलं. कारण अशा खुणा बहुतेक मुलांच्या हाता पायांवर, डोक्यावर असतातच. पुढे जेव्हा पू. रामकृष्णांच्या सान्निध्यात नरेंद्र आला तेव्हा एकदा सद्गुरू सहज म्हणाले 'हा मुलगा जो आहे त्याच्या डोक्यावरची जखमेची खूण पाहा. हा जेव्हा जन्मला तेव्हा याच्यामध्ये इतकी शक्ती, दैवीशक्ती केंद्रीभूत झालेली होती की कदाचित् असावधानतेने ती वापरली जाऊन तिने जगाचा विनाश ओढवला असता. परंतु लहानपणी पडून ही जी खोक पडली त्यावेळी आतल्या एका सूक्ष्म चक्राला (सूर्यचक्र) धक्का पोहोचला, पण त्याचा फायदा म्हणून त्या शक्तीचा योग्य असाच उपयोग होईल व जगाचा विनाश न आणता हा मुलगा जगाचा उद्धार करील. खोक पडल्याचे त्याची शक्ती वाटेल तशी न भरकटता योग्य रीतीने व माफक प्रमाणात वापरली जाईल. ही नियतीची योजना आहे.' अंजनीपुत्र हनुमानाच्या बाबतीतही नेमके असेच घडले होते. हे येथे लक्षात घेण्यास हरकत नाही.

२) रामकृष्ण परमहंसांच्या सान्निध्यात आल्यावर नरेंद्र व इतर तरुण शिष्य त्यांच्या सद्गुरुंच्या अगाध अनुभवी ज्ञानाचा लाभ उठवण्यात तत्पर असत. एकदा काही शिष्य व नरेंद्र जवळच झोपलेले होते. नरेंद्राचा श्वास झोपेत मोठ्याने व वेगात चालू होता. सहज बोलता बोलता रामकृष्ण म्हणाले 'या मुलाचा श्वास कसा जोरात चालला आहे पाहा. योगी लोक सांगतात, की अशी माणसे अल्पायुषी असतात' स्वामीजींनी अवघ्या ३९ व्या वर्षी देह ठेवला. तेव्हा सद्गुरूंच्या म्हणण्याची प्रचिती सर्वांना आली.

३) त्या काळात त्रिखंडात कीर्ती प्राप्त झालेले केशवचंद्र सेन हे पू. रामकृष्णांच्याकडे दर्शनाला येत असत. एकदा सहज बोलताना रामकृष्ण म्हणाले, 'ज्या एका शक्तीच्या योगाने केशवचंद्र यांनी जगात कीर्ती संपादन केली त्याच्या अठरा पट शक्ती या नरेंद्रच्या ठिकाणी जागृत आहे. असे मला आई (जगन्माता) दाखवते आहे. हे ऐकताच नरेंद्रला ओशाळल्यासारखे झाले. कुठे केशवचंद्र सेन व कुठे आपल्यासारखा सामान्य तरुण हा विचार त्यांच्या मनात आला. त्यांनी तो विशेष माणसे नसताना रामकृष्णांकडे बोलूनही दाखवला. त्यावर पुन्हा रामकृष्ण म्हणाले, "आई मला तसे दाखवते आहे तर मी खोटे कसे सांगू. आई मला खोटे कधी दाखवत नाही.' विवेकानंदांच्या एकंदर कामगिरीचा विचार करता पू. रामकृष्णांच्या विधानातील सत्यता सहज पटते.

४) नरेंद्रला झोपताना नेहमी एका ज्योतीचे दर्शन होई व त्याकडे ध्यान सहज लागून तो झोपत असे. सर्वच मुलांच्या बाबतीत असे घडत असते असे वाटल्यामुळे नरेंद्राने हे कधी कोणापुढे बोलून दाखविले नाही व त्याला त्याचे विशेष काही वाटलेही नाही. परंतु पुढे जेव्हा रामकृष्णांची भेट झाली तेव्हा त्यांनी विचारले, "बाळ, तुला झोपताना प्रकाश दिसतो की नाही?' त्यावर नरेंद्रानी हो म्हणून सांगितले व म्हटले, 'यात विशेष काय? सर्वांनाच तो दिसतो.' त्यावर रामकृष्णांनी समजावून सांगितले. की ही गोष्ट सामान्य नव्हे. विचार कुणालाही. विचारल्यावर नरेंद्रला कळले की कुणालाही असा प्रकाश दिसत नाही. तेव्हा कुठे त्या प्रकाशाचे महत्त्व लक्षात आले.



५) सद्गुरूंच्या सान्निध्यात नरेंद्र व इतर भक्तांची झपाट्याने प्रगती नकळत होत होती. सद्गुरूंच्या आजारात भक्त आपल्यापरीने भरपूर सेवा करीत होते. परंतु काही कामे इतरांवर टाकण्याची प्रवृत्ती थोडीफार दिसत असे. विशेषतः रामकृष्णांच्या जखमा धुतल्यानंतर काढलेले रक्त, पू इ. टाकणे, कापसांचे बोळे फडकी इ.ची नीट विल्हेवाट लावणे ही कामे सहज टाळली जात. नरेंद्रच्या हे लक्षात आले व त्याने एक दिवस सर्वांसमक्ष तो पू, रक्ताने भरलेला पेला पिऊन टाकला. त्याचा परिणाम सर्वांवर विलक्षणच झाला व मग कोणीही त्यानंतर कसलीही हयगय दाखविली नाही. सद्गुरूही तृप्त झाले व आईची निवड योग्य आहे हे त्यांनी ओळखले. तुम्हाला हे पिताना किळस नाही का वाटली असे एकाने विचारले तेव्हा नरेंद्र म्हणाला, 'मला तर ते अमृतासारखे लागले.' समर्थ शिष्य कल्याण यांने गळू चोखल्यावर अशाच प्रकारचे उद्गार काढले होते, हे सर्वांस माहिती आहेच.

६) सद्गुरूंनी आपले सर्वस्व नरेंद्रला अर्पण केले व ॐ च्या उच्चारात देह ठेवला. त्यापूर्वी सुमारे ३-४ दिवसांची ही हकिकत आहे. श्री रामकृष्ण हे दुःखाने विव्हळत भिंतीकडे तोंड करून पडले होते असे दिसत होते, त्या वेळी नरेंद्राने त्या खोलीत हळूच प्रवेश केला. ती सद्गुरूंची अवस्था पाहून येऊ नये तो विचार नरेंद्रच्या मनात आला, 'याही अवस्थेत – जो राम झाला, जो कृष्ण झाला तोच या देहात रामकृष्ण झाला असे हे म्हणतील का?'' हा विचार मनात येण्याचा अवकाश, तत्क्षणीच रामकृष्णांनी त्यांच्याकडे तोंड फिरवले व म्हटले, ''अजूनही शंका!! पुन्हा सांगतो जो राम झाला, जो कृष्ण झाला, तोच या देहात रामकृष्ण झाला.'' असे म्हणून रामकृष्णांनी पुन्हा डोळे मिटून घेतले. त्याचा जो बोध घ्यायचा तो नरेंद्राने घेतला हे सांगावयास नकोच.

७) तरीही थोडीफार गडबड, चुळबूळ ही श्रेष्ठ साधकांमधेही कशी असते याचे आणखी एक उदाहरण पाहू या. पू. रामकृष्णांनी देह ठेवल्यानंतर सर्वच शिष्यांची, विशेषतः संन्यासी शिष्यांची गडबड उडाली. प्रत्येक जण आपल्या मनाला साक्ष ठेवून उपासना करीतच होता. त्या वेळी नरेंद्र यांची पाठ विशेषतः पाठीचा कणा बराच दुखत असे व उपासनेत व्यत्यय आणत असे. त्या वेळी पव्हारीबाबांची (पवन आहारी) व नरेंद्रांची रोज गाठभेट होई. स्नानाच्या वाटेवर त्यांचे घर होते. ते नेहमी उंबरठ्यात बसलेले असत. हठयोगी असल्याने त्यांना शारीरिक त्रास सहसा होत नसे. नरेंद्रला असे वाटू लागले, की यांच्याकडून आपण हठयोगाची दीक्षा घेतल्यास आपली पाठीची व्याधीही कमी होईल व उपासना दृढ करता येईल. पव्हारी बाबांनीही घसट वाढविली. एक दिवस नरेंद्राने ठरविले, की आपण उद्या बाबांकडून दीक्षा घ्यावी. त्या दिवशी सायंकाळी बागेमध्ये एका बाजूला नरेंद्र बसला होता. अंधार पडू लागल्याने गर्दी जवळजवळ नव्हतीच. इतक्यात समोर सद्गुरू रामकृष्ण उभे राहिलेले नरेंद्राने पाहिले. त्यांचा चेहरा खिन्न दिसत होता व नेत्रातून अश्रू वाहत होते. ते जणू बोलत होते की, 'सर्वांत हुषार व श्रेष्ठ शिष्य म्हणून तुला मी सर्वस्व दिले, तरी अजून तुला ते कमी वाटते की काय?'' या दृश्याचा नरेंद्रच्या मनावर फारच जबरदस्त परिणाम झाला. एका पत्रात त्यांनी याबद्दल पुढे खुलासा केला तो असा – ज्यांचे शिष्यत्व पत्करावे म्हणून मी त्यांच्याकडे गेलो तेच माझे शिष्यत्व पत्करायला निघाले होते. मग आपल्यापाशी काय कमी आहे? यापुढे मी कुणाही गुरूकडे शिष्यत्व मागण्यास जाणार नाही, आपले सद्गुरूच सर्व करून, पार नेणार आहेत असा मला बोध मिळाला.

८) पुढे नरेंद्राने देशात भ्रमण करण्याचे ठरवून परिव्राजक वेषात तो निघाला त्या वेळचा एक अनुभव मोठा मजेदार आहे. गंगेच्या काठावरून एक दिवस तो सहज फिरत होता व हातात खाण्यासाठी फुटाणे घेतले होते. थोडे पुढे जातात तो माकडे मागे लागली. फुटाणे काढून घेण्यासाठी त्यांची गडबड चालू होती. फुटाणे हातात घेऊन नरेंद्र पळू लागले. ते पाहून गंगेत स्नान करणाऱ्या एका साधूने ओरडून सांगितले की, 'बेटा, पळू नकोस. घाबरू नकोस. नुसता तोंड फिरवून उभा राहा व पाहा काय होते ते.'' नरेंद्राने धीर करून त्याप्रमाणे केले. त्याबरोबर काय चमत्कार, एकेक पाऊल मागे घेत घेत माकडे हळूहळू दूर गेली व मग तोंड फिरवून निघून गेली. नरेंद्रला मोठी गंमत वाटली. त्यावर तो साधू पाण्यातून बाहेर येता येता म्हणाला, 'माया ही अशीच असते. तुम्ही तिला ओळखून तटस्थपणे पाहिलेत, की ती माघार घेत घेत पूर्णपणे अदृश्य होते. हे लक्षात ठेव बेटा.' या प्रसंगाचा नरेंद्रला पुढील आयुष्यात खूपच उपयोग झाला.

पुढे एकदा लंडनमध्ये असताना एका इंग्लिश तरुणाबरोबर ते बाहेर फिरण्यास गेले. वाटेत एका निर्मनुष्य रस्त्यात एक प्रचंड बैल त्या दोघांच्या दिशेने शिंगे रोखून धावत आला. तेव्हा तो इंग्रजी तरुण घाबरून पळाला व एका झाडावर चढला. पण नरेंद्र तसाच हातांची घडी घालून उभा राहिला. त्या बैलाची धाव चार फूट अंतरावर थांबली. एकदा रोखून पाहून तो बैल शांतपणे निघून गेला.

९) लाहोरजवळील एका पडक्या, भग्न देवीच्या देवालयात एकदा नरेंद्राने मुक्काम केला. त्या देवळाची ती भग्न स्थिती पाहून त्याला फार वाईट वाटले. संध्याकाळी त्याने दर्शनाला आलेल्या स्थानिक लोकांशी चर्चा केली तेव्हा कळले, की मुसलमानांच्या हल्ल्यात हे देऊळ कसे भग्न झाले वगैरे. त्या वेळी तरुण नरेंद्रच्या मनात विचार आला की, 'मी जर त्या प्रसंगी हजर असतो तर प्राण पणाला लावून या देवीचे व देवळाचे रक्षण केले असते. या प्रकारच्या विचारात तो झोपी गेला. पहाटेच्या सुमारास त्या देवीने प्रत्यक्ष येऊन नरेंद्रला स्वप्नात दर्शन दिले व म्हटले, 'बाळ, तू काय माझे रक्षण करणार! माझे रक्षण मला करता येत नाही असे वाटले की काय तुला? तसे मुळीच नाही. परंतु स्वेच्छेने मी या अवस्थेत राहत आहे. एरवी असे करण्याची कुणाची हिंमत होणारच नाही! या प्रमाणे सांगून आशीर्वाद देऊन देवी अदृश्य झाली. नरेंद्रला यातून पुष्कळच शिकण्यास मिळाले.

१०) पुढे जेव्हा कन्याकुमारीच्या तिकडे ध्यान करीत असताना परदेशांत जाण्याचा संदेश नरेंद्रला मिळाला त्या वेळीसुद्धा त्याला असे वाटले की हे कसे शक्य आहे. एक सामान्य संन्यासी हे एवढे समुद्र उल्लंघून परक्यांच्या देशांत कसा काय जाऊ शकणार! तो विचार त्याने सद्‌गुरूंपुढे मांडला. त्यावर सद्‌गुरू म्हणाले, 'अरे! तुला कसली काळजी वाटते? नियतीने तुझी योजना केलेली आहे. व हे कार्य तुला करावेच लागेल. तू नाही म्हणशील तर लक्षात ठेव की तुझी हाडे कार्य करतील पण कार्य हे घडणारच.' तेव्हा कुठे नरेंद्रचा आत्मविश्वास जागा झाला. त्याप्रमाणे प्रचितीही मिळत गेली.

तरीही खुद्द शिकागो परिषदेच्या वेळी बोलण्याचा प्रसंग येऊ लागला तेव्हा टाळ्याला जीभ चिकटून बसली होती, घशाला कोरड पडली, तोंडातून शब्द उमटेना, सर्वांगास दरदरून घाम फुटला. अशी स्थिती झाली होती. असहाय म्हणून त्याने आजूबाजूला नजर टाकली तो पाठीमागे सद्‌गुरू उभे असलेले दिसले. तत्काळ त्याने त्याला सावरले गेले व जे शब्द बोलले गेले त्यामुळे सर्व श्रोतृवृंद भारावून गेला व टाळ्यांचा कडकडाट झाला.

११) याप्रमाणे एकेक प्रसंगामुळे नरेंद्राची सद्‌गुरूनिष्ठा आणखीनच दृढ होत गेली व प्रत्येक प्रसंग तावून, सुलाखून, अभ्यासून ठेवला गेला. नंतरच्या आयुष्यात घडलेला एक प्रसंग असाच आहे. तो असा – स्वामीजींच्या सत्काराचा कार्यक्रम हिंदुस्थानात एका ठिकाणी ठेवला होता. आग्रहाच्या निमंत्रणामुळे स्वामी हजर राहिले. त्या कार्यक्रमानंतर एका नायकीणीचे गाणे ठेवले होते. स्वामीजींना ते जरा खटकले. मी तर संन्यासी मग सत्कारानंतर हे गाणे कशाला ठेवले? या विचारात गाणे सुरू होण्यापूर्वीच ते उठले व मागच्या खोलीत जाऊन विश्राम करू लागले. त्या वेळी त्यांच्या कानावर नायकीणीच्या गाण्याचे आर्त स्वर पडले. त्या गाण्याचा आशय असा, 'प्रभू मेरे अवगुण चित् ना धरो. माझा जर तू त्याग केलास तर आम्ही कुणाचा आश्रय घ्यावा. माझा भाव व त्याची आर्तता तुझ्याखेरीज कोण जाणू शकेल इत्यादी.'' स्वामींच्या अंतःकरणात हे आर्त स्वर घुसले व त्यांच्या ठिकाणी एकदम कणव, दया निर्माण झाली. आपल्या सद्‌गुरूंनीच ह्या स्त्रीकडून आपणास हा बोध करविला अशी त्यांची खात्री झाली. ते तत्काळ उठले व गाणे संपताच त्यांनी त्या नायकीणीला 'माते' म्हणून नमस्कार केला व म्हटले, 'मी संन्यासी हा माझा अहंकार आज आपण पूर्णपणे जिरवलात. माझ्याच सद्‌गुरूंनी तुमच्याकरवी मला बोध केला हे मी ओळखले. तुम्ही धन्य आहात. हाच भाव ठेवा. परमेश्वर तुम्हाला कधीही दूर करणार नाही.''

१२) एकेक अनुभवातून पुढे प्रगल्भता व परिपक्वता येत गेली असे सहज दृष्टीस येते. तीर्थराम गोस्वामी (उर्फ स्वामी रामतीर्थ) हे लाहोर कॉलेजात अध्यापक म्हणून होते. स्वामीजींच्या दिगंत कीर्तीमुळे सर्वच जण भारावून गेले होते. तीर्थरामांनी व त्यांच्या विद्यार्थ्यांनी स्वामीजींना मुद्दाम आपल्या विद्यालयात बोलावून त्यांचा सत्कार केला. त्या वेळी सर्वांनी मिळून एक सुरेख मनगटी घड्याळ स्वामीजींना भेट म्हणून दिले. स्वामीजीही ह्या प्रसंगाने भारावून गेले. त्यांनी घड्याळाचा स्वीकार केला व तीर्थरामांच्या कोटाच्या खिशात ठेवीत म्हटले, 'माझ्या या खिशात मी हे घड्याळ ठेवतो.' स्वामीजींच्या या व्यापक रूपाचा साक्षात्कार सर्वांनाच घडला आणि तीर्थरामांच्या मनांत तर तो पूर्ण बिंबला. पुढे रामरूपाशी एकरूप झाल्यावर जेव्हा एका भक्ताने त्यांना विचारले की 'इंग्रजांनी भारताची संपत्ती लुटून नेली त्याबद्दल तुम्हाला काय वाटते.'' त्यावर व्यापक तत्त्वाशी एकरूप झालेले स्वामी रामतीर्थ म्हणाले, ''रामाला त्याचे काय! रामाच्या डाव्या खिशातील संपत्ती उजव्या खिशात आली एवढेच.''

१३) कोणीही व्यक्ती कितीही श्रेष्ठ असली तरी त्यातही दोष काढणारे लोक जगात असतात. प्रभू श्रीराम, भगवान गोपाळकृष्ण यांच्यावरही टीका करणारे त्या काळातही होते व आजही आहेत. मग स्वामी विवेकानंद त्याला अपवाद कसे असणार! अगदी शेवटच्या एकदोन वर्षांतली ही हकीकत आहे. बंगाल आणि इतर भागात दुष्काळाने फारच भीषण परिस्थिती निर्माण झाली होती. त्या वेळी एकदा गायींना संरक्षण द्यावे, त्यांचे पालनपोषण व्हावे म्हणून गोरक्षण संस्थेचे कुणी कार्यकर्ते स्वामीजींकडे मदत मागण्यास आले. सर्व हकीकत सांगितल्यावर स्वामीजींनी विचारले, 'गाईंची दुरवस्था दूर व्हावी हे ठीक आहे. पण आज माणसांची स्थितीही तशीच झाली आहे. त्यासाठी आपण काय काय करीत आहात?' त्यावर ते कार्यकर्ते सांगू लागले की 'माणसांनी आपल्या कर्मांनी ही स्थिती ओढवून घेतली आहे. त्यांचे कर्मफळ ते भोगत आहेत. आम्ही त्यांच्यासाठी काही करीत नाही.' त्यावर स्वामीजी म्हणाले, 'ही तुमची चुकीची समजूत आहे. माणसे जगली तर ती जनावरांना निश्चितच जगवतील. तेव्हा त्यांना जगवणे हेही तितकेच महत्त्वाचे आहे. माणसे जर पूर्वकर्माने या अवस्थेत आहेत म्हटले तर गाईपण, त्याच न्यायाने पूर्वकर्माने हे भोगत आहेत असे नाही का म्हणता येणार? तेव्हा प्रथम माणसे वाचवण्याची योजना करा मग जरूर ते सर्व साहाय्य आम्ही करू.'' या भाषणाने ते कार्यकर्ते नाराज झाले व मुकाट्याने निघाले. खाली बाहेर पडल्यावर ते आपसात टीका करीत होते. ''संन्यासी कहते है। साथ मडम भी है। आणि तोंडे वेडीवाकडे करीत होते.

स्वामीजी अमेरिकेत असतानाही त्यांनी संन्यासी असूनही मांसाहार केला यावर भारतात पुष्कळ ठिकाणी टीका झाली होती. त्यावर एका पत्रात स्वामीजींनी म्हटले आहे, 'मला येथे येण्यास मदत करण्यासही कुणी पुढे येत नव्हते. मग एखादा आचारी पाठवणे दूरच राहिले. तसा आचारी पाठवून खाण्याची व्यवस्था जर केली तर मला हे पदार्थ खावेच लागणार नाहीत व मी ते खाणारही नाही, याची खात्री बाळगा. तोपर्यंत येथल्या लोकांनी प्रेमानी केलेल्या आदरातिथ्याचा

आपस्वीकार केला तर त्यात एवढे टीका करण्यासारखे काय आहे? हिंमत असेल तर माझी खाण्यापिण्याची व्यवस्था करा व तरीही मी मांस खाल्ले तर मग खुशाल टीका करा!''

१३) पू. रामकृष्ण परमहंस वेदातील होमा पक्ष्याची गोष्ट बरेच वेळा सांगत असत. ते म्हणत हा पक्षी आकाशात अति उंचावर उडतो. उडता उडताच तो अंडे घालतो. ते अंडे मोठ्या वेगाने खाली येऊ लागते. येता येताच ते फुटते व पिलू बाहेर येते. तेही वेगाने खाली येऊ लागते. तेवढ्यात त्याला पंख फुटतात व ते उडू लागते व पुन्हा वरती जाऊ लागते. असे काही जीव पृथ्वीवर येण्यापूर्वीच सावध होतात व पृथ्वीच्या स्पर्शाशिवाय, पृथ्वीत न गुंतून पडता, परत मोक्षमार्ग गाठतात. नरेंद्र हा त्यापैकीच एक होय, असे त्यांना सुचवायचे असावे. तो अल्पायु आहे हे त्यांनी पूर्वीच सांगितले होते. त्याला सच्चिदानंदाचे दर्शन करवून त्यांनी पुन्हा ते दर्शन पाहून घेतले व म्हटले 'आता चावी माझ्याकडे आहे. तुझे कार्य पूर्ण झाल्यावर पुन्हा तुला हा अनुभव प्राप्त होईल.' त्यांनी इतरांनाही सांगितले होते की, 'ज्या दिवशी आपण कोण हे नरेंद्रला कळेल, उमगेल तेव्हा लगेचच तो देहत्याग करून निघून जाईल.' त्याप्रमाणेच घडले. स्वामीजी एका संसारी भक्ताबरोबर दर शनिवार, रविवारी फिरावयास जात. त्यांचे मोकळे संवाद होत असत. एकदा स्वामींनी त्याला दाखवले, 'अमुक ठिकाणी माझे दहन करा.' तेव्हा त्याने थोड्या वेळाने स्वामीजींना विचारले, 'स्वामीजी, आपण कोण हे आपणास समजले आहे काय?'' स्वामी गंभीरपणे उत्तरले, 'होय! शिवोऽहं, शिवोऽहं'' हे ऐकताच तो शिष्यही गंभीर झाला कारण पू. रामकृष्णांचे वचन त्याला माहिती होते आणि घडलेही तसेच. पुढील शनिवारी नेहमीप्रमाणे तो स्वामीजींना भेटण्यास आला, पण स्वामीजींनी त्यापूर्वीच देह ठेवला होता.

१४) देह ठेवण्यापूर्वीची त्यांची काही वचने कायम लक्षात ठेवण्यासारखी आहेत. ती अशी, 'जोपर्यंत एकही जीव अज्ञानात असेल तोपर्यंत मी जन्म घेत राहीन व तोपर्यंत मला स्वस्थता मिळणार नाही.''

''दुसरा एखादा विवेकानंद असता तर त्याला या विवेकानंदाने काय काय केले हे कळले असते.''

पहिल्या वचनावरून त्यांची लोकोद्धाराची खरी तळमळ स्पष्ट होते व त्यासाठी त्यांनी काय केले हे समजण्यास दुसरा विवेकानंदच पाहिजे हे त्यांच्या दुसऱ्या वचनावरून समजते. याची प्रचिती पुढे एका प्रसंगावरून लक्षात येण्यासारखी आहे. तेवढा प्रसंग देऊन ही लेखनसेवा थांबवतो. अभ्यासूला हवे तेवढे प्रसंग अशा चरित्रात मिळू शकतात. द्यावे तेवढे थोडेच आहेत. त्यांच्याच कृपेने जे आठवले तेवढे वाचकांपुढे प्रसंगाने मांडले आहेत.

१५) योगी अरविंद घोषांनी 'सुपरमाईंड' बद्दल जे अपूर्व लिखाण केले त्यावर अनेकांशी त्यांचा पत्रव्यवहारही झाला. त्यात एका साधकभक्ताने प्रश्न विचारला की, 'आपण जे हे सुपरमाईंडबद्दलचे विचार स्पष्ट केलेत ते आतापर्यंत कुणा संतांना किंवा अधिकारी पुरुषांना माहिती नव्हते का? एकदम हे नवीनच तर आपण मांडले नाही ना?'' यावर योगी अरविंदाचे उत्तर असे होते की, 'प्रत्येक संत किंवा सत्पुरुष हे आपल्याजवळचे सर्वच ज्ञान जगाला सांगत नाही तर त्या त्या काळाला जे उपयुक्त असेल तेवढेच ज्ञान तो जगाला सांगत असतो. तेव्हा त्याने अमुक सांगितले नाही म्हणजे ते त्याला माहीतच नव्हते असा त्याचा अर्थ होत नाही. आता 'सुपरमाईंड' बद्दल तुम्ही विचारता तर एवढेच सांगता येईल की, स्वामी विवेकानंदांच्या देहरहित आत्म्याकडून मला हे ज्ञान प्राप्त झाले व ईश्वरी इच्छेने माझ्याकरवी ते जगापुढे मांडले गेले.''

मला वाटते यापेक्षा जास्त स्पष्टीकरणाची काही आवश्यकता नाही.

*वसंतराव गोखले,*
*४०९-ब, नारायण पेठ,*
*पुणे - ४११ ०३०.*

# प्रार्थना - एक मुक्तचिंतन

डॉ. व. र. घोले

प्रार्थनेला अनन्यसाधारण महत्त्व आहे. प्रार्थनेद्वारा आपण भगवंतापाशी काहीतरी मागत असतो. पण काय मागावे हेच मुळी समजत नाही. प्रापंचिक कटकटी दूर व्हाव्यात, मनाजोगती संतती व्हावी, शारीरिक स्वास्थ्य व ऐषआराम यांचा लाभ व्हावा, पैसा अडका भरपूर मिळावा म्हणून कित्येक लोक प्रार्थना करताना आढळतात. लॉटरीचे तिकीट काढल्यास ते देवासमोर ठेवून 'मला पहिले बक्षीस मिळावे' म्हणून प्रार्थना करताना मी अनेकांना पाहिले आहे. फार काय, 'अमुक एका माणसाने मला फार त्रास दिला आहे त्याचा समाचार घे आणि माझ्या डोळ्यांदेखत त्याला चांगली अद्दल घडू दे' अशीही प्रार्थना करणारे लोक आहेत. द्वेष किंवा सूडाच्या भावनेने केलेली प्रार्थना अदिव्य आणि घातक शक्तींना उद्देशून केलेली असते. प्रार्थनेच्या कल्पनेचा हा अगदी विपर्यास झाला. पण तरीही असे हास्यास्पद नमुने कधीकधी पाहावयास मिळतात. प्रार्थनेच्या परिणामाची शास्त्रीय चिकित्सा करावयाची झाल्यास असे म्हणता येईल, की मनातील अतिप्रबळ व निश्चयी विचारांमुळे, मग ते अनुचित भावनांच्या उद्वेगामुळे निर्माण झालेले असोत अथवा उदात्त भावनांमधून जन्म घेतलेले असोत, कनिष्ठ किंवा श्रेष्ठ मनोदेहामध्ये खळबळ घडून येऊन तेथील द्रव्य आंदोलित होते व त्या त्या लोकांमधून या आंदोलित द्रव्यास प्रतिसाद मिळतो आणि परिणाम घडून येतात. वैचारिक स्तरावर क्रिया-प्रतिक्रिया याच न्यायाने हे होत असते. तेव्हा प्रार्थनेद्वारा मागणे हे नेहमी सात्त्विक भूमिकेवरूनच हवे. "देवा तुझे काम करण्यासाठी मला शक्ती, बुद्धी, युक्ती दे' असे मागणे सयुक्तिक ठरेल; पण असेही मागणे मागावयाची काही गरज नाही. कारण तुम्ही ज्या वेळी सत्कार्य करता, त्या सत्कार्यातूनच हे सर्व तुम्हास मिळत असते. शुद्ध मनाने, निस्पृहपणे सेवा करणारा माणूस मनाने मोठा तब्येतीत असतो यात शंका नाही. उदाहरणार्थ, स्वातंत्र्यप्राप्तीसाठी अनेक थोर लोकांनी 'स्वातंत्र्यसेनानी' म्हणून निरपेक्ष बुद्धीने व राष्ट्रीय भावनेने पेटून जिवापाड, अति अवघड व धोक्याची कामे केली. स्वतःला स्वातंत्र्य लढ्यात झोकून दिले, हालअपेष्टा, उपासमार, व अत्याचार सहन केले आणि हे सर्व अगदी आनंदी वृत्तीने. हे सर्व मी स्वतः पाहिले आहे. राष्ट्रकार्य काय, समाजकार्य काय, किंवा धर्मकार्य काय, या सर्व कार्यांमध्ये 'बल' हे inbuilt म्हणजे अन्तर्रचित असते. प्रसंगी जेवण मिळाले नाही तरी भागते. असुरक्षित, अशुद्ध वातावरणात काम करावे लागले तरी दिक्कत वाटत नाही. किंवा लाठीचा एखादा वार लागला तरी त्याचीही क्षिति वाटत नाही. कोणत्याही कार्याला जर आंतरिक करुणेची राष्ट्रप्रेमाची किंवा ईश्वरासंबंधीच्या भक्तीची पार्श्वभूमी असेल तर ते कार्य करणाऱ्या व्यक्तीला देशबांधवांसाठी अगर आपल्या दुर्बल, अनाथ व दुःखपीडित बंधूंसाठी कष्ट सोसण्यात आनंदच होत असतो. त्यागाच्या भूमिकेतून केलेल्या प्रार्थनेची बैठकच मुळी वेगळी असते. असो. प्रार्थनेसाठी सुयोग्य म्हणजे शांत, धीरगंभीर वातावरणाची आवश्यकता असते. मी सोलापुरातील मुस्लिमांच्या एका मोठ्या मशिदीमध्ये १९६४ साली प्रार्थनेस गेलो होतो. मौलवीसाहेबांना अर्थातच आनंद झाला. ते म्हणाले, 'वजू करो और सरको रुमाल बांधो'' बस एवढेच. कारण अल्लाच्या दरबारात बोडक्याने जावयाचे नसते. मी तन-मन-धन अर्पण करून सामुदायिक प्रार्थनेमध्ये सहभागी झालो आणि आपणास काय सांगू? मला खूप बरे वाटले. त्या शांत, गंभीर, पवित्र व शिस्तबद्ध वातावरणात मला माझ्या हृदयात अल्लाची कणव जाणवली. ईश्वर जर एकच आहे तर मग तो मुसलमानांसाठी वेगळा, हिंदूंसाठी वेगळा, ख्रिश्चनांसाठी वेगळा अगर पारशांसाठी वेगळा असे कधी होईल काय? एकाच चैतन्याकडे नेणाऱ्या 'अनेक धर्म' या पायवाटा नव्हेत काय? असाच एकदोनदा मी चर्चमध्ये पण केवळ प्रार्थनेसाठी गेलो होतो. मेणबत्त्यांच्या मंद आणि मांगल्यपूर्ण प्रकाशात येशूची ती मूर्ती, आत्मसमर्पणाचे एक अनोखे, व भव्य दिव्य प्रतीक माझ्या हृदयाला स्पर्शून गेले. मानवजातीच्या कल्याणासाठी देवावरील आत्यंतिक प्रेमामुळे आत्मबलिदान करणारा हा देवाचा महान सुपुत्र आपण त्याच्या पासंगालातरी पुरतो का? गोव्याच्या सेंट झेवियर चर्चमध्ये गेल्यावरही माझे मन भरून आले होते. मला सांगावेसे वाटते, की प्रार्थना करणाऱ्या सर्व माणसांच्या भावना जर विशुद्ध व विचार उदात्त असतील, तसेच त्यांचा संकल्प एक, उद्दिष्ट एक, आकांक्षा एक आणि कार्यपद्धती एक असेल तर त्याच्या जीवननिष्ठेला एक मूर्त स्वरूप प्राप्त होत असते व अशा सामुदायिक प्रार्थनांचा, ध्यानाचा परिणाम त्यांत सहभागी होणाऱ्यांच्या वैयक्तिक, आंतरिक विकासावर आणि सामुहिक प्रगतीवर अगदी ठळकपणे झालेला दिसून येतो. एवढेच नव्हे, तर हा परिणाम जागतिक घटनांवरही होऊ शकतो.

सर्व थिऑसॉफिकल लॉजेसमध्ये 'भारत समाजपूजा' सामुदायिक रीतीने केली जाते. त्याचाही असाच दूरगामी बहुव्यापी परिणाम होत असतो. या पूजेच्या अंती, "ओम् ऋध्यास्म हव्यैर्नमसोपसद्य । मित्रं देवं मित्र धेयं नो अस्तु । अनूराधान् हविषां वर्धयन्तः । शतं जीवेम शरदः सवीराः ॥

अशी अध्वर्यू प्रार्थना करतात व आशीर्वाद मागतात. हे पोकळ शब्द नव्हेत. त्या शब्दांमागे एक आर्तता असते, आत्मीयता असते, सगळ्यांचे हित व्हावे असा मनापासून केलेला संकल्प असतो. "आम्ही आमच्यामधील अमंगल द्रव्यांची आहुती देतो व नमस्कार करतो व सरतेशेवटी प्राणांची आहुती देत नमस्कार करीत करीत ईश्वरासमान होत आहोत" असे निर्धारपूर्वक मंत्राचे उच्चारण अध्वर्यू करतात. त्यानंतर या पूजेमध्ये सहभागी होणारे सर्वजण त्यांना साथ देतात. सर्वांचे कल्याण व्हावे, कोणाच्याही वाट्याला दुःख येऊ नये, द्विपाद, चतुष्पाद यांना सुख व्हावे व हा दैवी प्रसाद सर्वांना मिळो आणि सर्वांचे मंगल होवो अशी अत्यंत उदात्त, कल्याणकारी प्रार्थना त्यानंतर केली जाते. या सर्वांचा संकलित परिणाम झाल्याशिवाय राहत नाही.

आपण आता काही आदर्श प्रार्थना पाहू.

ॐ पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात् पूर्ण मुदच्यते ।<br>
पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवाव शिष्यते ।।

ही प्रार्थना म्हणजे वेदान्ताच्या सर्व साराचे सार आहे. सगळे वेद, सगळी उपनिषदे, पुराणे, आकर ग्रंथ वगैरे सगळे नष्ट झाले तरी चालेल; परंतु ही प्रार्थना नष्ट होता कामा नये, असे स्वामी दयानंद सरस्वती म्हणतात. आमच्या सर्व तत्त्वज्ञानांचा हा गाभा आहे. सगुण ब्रह्म आणि निर्गुण ब्रह्म यांचा अन्योन्य संबंध यात दाखविला आहे. कालातीतता व स्थलातीतता म्हणजे Eternity and infinity यांची अविभाज्यता म्हणजे ही प्रार्थना. या प्रार्थनेच्या अर्थावर लक्ष ठेवून चिंतन केल्यास कुठेतरी आणि केव्हातरी आंतरिक खळबळ माजून अंधकारात लपलेल्या प्रकाशाचे दिव्य दर्शन होणे शक्य असते. पण त्यासाठी रोजचे चिंतन, मनन व निजिध्यास हवा. 'हे ब्रह्मतत्त्व पूर्ण आहे. हे विश्व पूर्ण आहे. पूर्णातून पूर्ण उत्पन्न झालेले आहे. पूर्णातून पूर्ण काढल्यावर पूर्णच राहते" असा शब्दशः अर्थ असला तरी एखादा ग्रंथ होऊ शकेल एवढी या प्रार्थनेची व्याप्ती आहे. खोलार्थ लक्षात येण्यास तपश्चर्याच हवी.

आता ही प्रार्थना पाहा -

असतो मा सद्गमय ।<br>
तमसो मा ज्योतिर्गमय ।<br>
मृत्योर्मा अमृतं गमय ।

वेदामधील ही एक जुनी प्रार्थना आहे पण अतिशय प्रभावी आहे.

असत्याकडून मला सत्याकडे ने ।<br>
अंधकारापासून प्रकाशाकडे ने व<br>
मृत्यूपासून अमरत्वाकडे ने ।

असा या प्रार्थनेचा शब्दशः अर्थ आहे. पण थोडे विवरण करण्याची आवश्यकता मला जाणवते. प्रथम सत्य म्हणजे काय आणि असत्य म्हणजे काय हे समजले पाहिजे. सत्याला अनेक पैलू असले तरी अंतिम सत्य एकच एक आहे. सत्य कशाला म्हणावयाचे हा एक खूप मोठा विचार झाला. तरी परंतु आपल्या दैनंदिन व्यवहारामध्ये आमच्याकडून प्रामाणिकपणाचे वर्तन घडो, खोटेनाटे बोलून, फसवा फसवी, लांडी लबाडी करून आमच्या वर्तनाला काळिमा न येवो असा अर्थ व्यावहारिकांनी घ्यावयास हरकत नाही. अंधकार व प्रकाश हे अनुक्रमे अज्ञान आणि ज्ञानाला उद्देशून आहेत. म्हणजे मला अंधकाररूपी अज्ञानातून प्रकाशरूपी ज्ञानाकडे ने असा दुसऱ्या चरणाचा अर्थ लावता येईल व त्यानंतर मृत्यूकडून अमरत्वाकडे ने म्हणजे अखंड जीवन, समग्र, संपूर्ण जीवन हे मला नीट कळू दे, असा तिसऱ्या चरणाचा अर्थ लावता येईल. थोडक्यात म्हणजे सत्य, ज्ञान व मुक्ती यासाठी परमेश्वरापाशी केलेला हा हट्ट आहे. अगदी सोप्या शब्दांत सांगावयाचे झाल्यास, 'देवा, तुझ्या चरणापाशी मला आश्रय दे' अशी ही सर्व संत नेहमी करीत असलेली प्रार्थना आहे.

थोर हिंदी कवयित्री कैलासवासी महादेवी वर्मा यांनी ईश्वराला उद्देशून एक लोकविलक्षण प्रार्थना केली आहे. त्यात त्या म्हणतात,

तू मुझको पीडा दो ।<br>
मै तुझको पीडामे ढुंढुंगी ।।

देवा मला पीडा दे. पीडेमुळे मला तुझे कधीही विस्मरण होणार नाही. शिवाय पीडा म्हणजे काय याचा अनुभव घेतल्यानंतर जिथे जिथे पीडा आहे तेथे तेथे ती निस्तरण्यासाठी जाण्याची मला बुद्धी होईल आणि माझ्याकडून तुझी सेवा होईल. किती उच्च विचारसरणी आहे ही.

खिस्ती संत सेंट फ्रान्सिस ऑफ ॲसिसी यांची एक प्रार्थना मला फार आवडली. ते म्हणतात,

Oh Lord, Grant that,

I may not so much seek to be consoled as to console, to be understood as to understand, to be loved as to love;

Because, it is in giving that I receive at, is in pardoning that I am pardoned and it is in dying that I am born to light eternal. मी ख्रिश्चन धर्माच्या अनेक प्रार्थना ऐकल्या पण मला मनापासून आवडलेली ही एकच प्रार्थना आहे. सेंट फ्रॅन्सिस ॲसिसि म्हणतात,

"देवा, माझे कोणी सांत्वन करावे असे नको तर माझ्याकडून इतरांचे सांत्वन व्हावे, मला कोणी समजावून घ्यावे असे नको तर मी इतरांना समजावून घ्यावे आणि माझ्यावर इतरांनी प्रेम करावे या ऐवजी माझे प्रेम इतरजनांना अखंडत्वाने मिळत राहावे अशी शक्ती, असे वरदान तू मला दे. हे मी असे का म्हणतो? मी मूर्ख नव्हे. तुझ्या घरचे सगळे नियम मला पाठ आहेत. मला माहीत आहे की मी इतरांना देत राहिलो तर मलाही मिळत राहते. म्हणजेच मला मिळावे या भावनेने मी देत नाही, देण्याचे वेळी हे मनातही कधी येत नाही; पण दिले तर मिळते असा तुझ्या घरचा न्याय मला माहीत झाला आहे. त्याचप्रमाणे मी जर इतरांना त्यांच्या अपराधाबद्दल क्षमा केली तर मीदेखील क्षमेला पात्र ठरतो. मी मानव आहे स्खलनशील आहे आणि कधीतरी मलाही क्षमेची गरज भासणार आणि इतरांना वाचविण्यासाठी प्रसंगी माझ्या देहाची आहुती

द्यावी लागली तरी त्यामधूनच माझे पुनरुत्थान होते हेही मला चांगलेच कळले आहे."

रामरक्षेमध्ये

माता रामो मत्पिता रामचंद्रः ।
स्वामी रामो मत्सखा रामचंद्रः ।।
सर्वस्वं मे रामचंद्रोर्दयालुः ।
नान्यं जाने नैव जाने न जाने ।।

अर्थ सरळ आहे. राम माझी आई आहे. राम माझे वडील आहेत. राम माझा स्वामी आहे आणि रामच माझा सखा आहे. दयाळु राम माझे सर्वस्व आहे. त्याच्याशिवाय अन्य कोणालाही मी जाणत नाही.

ही प्रार्थना चालता, उठता, बसता, गाता म्हणावयाची व स्वतःच राममय होऊन जायचे. या प्रार्थनेमुळे अनेकांना शांति प्राप्त झालेली आहे. मात्र प्रार्थना म्हणताना तशी भावना पाहिजे.

महात्मा गांधींचे आवडते "वैष्णव जन तो तेणे कहिये, पीड पराई जाणे रे" हे नरसी मेहतांचे भजन सुप्रसिद्धच आहे. संत तुकाराम यांनीही "जे का रंजले गांजले, त्यासी म्हणे जो आपुले, तोचि साधू ओळखावा, देव तेथेचि जाणावा" हा अभंग रचला तो त्याच धर्तीवर आहे.

अनेकांनी देवाला आळविले आहे. प्रत्येक प्रार्थनेचे एक एक वैशिष्ट्य असते, पण देवाला सतत मनात बाळगणे, त्याचे अनुसंधान ठेवणे व त्याला स्मरून आपले सर्व उद्योग सांभाळणे हा प्रार्थनेचा उद्देश होय. मुसलमान लोकांत पाच वेळा नमाज पडतात. त्यामुळे दिवसातून किमान पाच वेळा अल्लाचे स्मरण होते. आपल्या धर्मनिदेखील प्रातःप्रार्थना, पहाटेच्या भूपाळ्या, भोजनपूर्व प्रार्थना, सायं प्रार्थना, सायं संध्या व रात्री झोपी जाण्यापूर्वी नामस्मरण वगैरे प्रकार सांगितले आहेत.

देवाच्या सत्तेने जग चालते. आपल्या हातात काही नाही आणि आपली कशावर सत्ता नाही म्हणून प्रार्थनेद्वारा त्या भगवंताची आठवण ठेवणे व त्यांचे कार्य परोपकाराचे कार्य, मानवजातीच्या उद्धाराचे कार्य, कल्याणाचे कार्य करणे एवढेच आपल्या हाती आहे. ज्याची प्रार्थना करावयाची, ज्याची करुणा भाकायची तो भगवंत दुसरीकडे कोठे नसून आपल्याच हृदयमंदिरात स्थित आहे याची आठवण ठेवायची कारण शेवटी तोच तुम्ही आहात.

*डॉ. व. र. घोले*
*हर्मिताज*
*श्रीहरी सोसायटी, श्रीधरनगर,*
*धनकवडी, पुणे ४११ ०४३.*

# अविस्मरणीय संत; ह.भ.प. सोनोपंत

द्वा. वा. केळकर



वै. ह.भ.प. सोनोपंत दांडेकर यांच्या देहनिर्वाणाला पंचवीस वर्षे झाली, पण त्यांची पुण्यस्मृती लोकांच्या अंतःकरणात अगदी टवटवीत आहे. त्यांचे चरित्र वै. स. के. नेऊरगावकर यांनी लिहिले आहे. "प्रा. सोनोपंत दांडेकर" या त्यांच्या ग्रंथाला 'सकाळ'चे संपादक व संस्थापक डॉ. ना. भि. परुळेकर यांनी बारा पृष्ठांची सुरेख प्रस्तावना लिहिली आहे. अनंत मार्गाने लोकांवर उपकारांची सावली करणारा 'विभूती योग' सोनोपंतांच्या जीवनात कोठून आला याची अत्यंत मार्मिक चर्चा सदर प्रस्तावनेमध्ये डॉ. परुळेकर यांनी केली आहे. ते लिहितात,

"प्रा. सोनोपंत दांडेकर यांचा व माझा संबंध शिक्षक व विद्यार्थी या नात्याने आला. कॉलेजात माझाही विषय 'फिलॉसॉफी' म्हणजे तत्त्वज्ञान. त्यांचा ऑनर्स विषयाचा मी एकच विद्यार्थी व मला शिकवणारे प्राध्यापक ते पण एकच – म्हणजे प्रा. दांडेकर. त्या वेळी मला कल्पनाही आली नाही, की माझ्यासमोरचे शिक्षक अशा एका मोठ्या धार्मिक व शैक्षणिक कार्याला वाहून घेऊन विभूतिमत्त्वाला पावतील की त्यांचे चरित्र प्रकाशन करण्याचे आणि त्याला प्रस्तावना लिहिण्याचे काम मजकडे येईल. एका विद्यार्थ्याला एक शिक्षक हे कॉलेजमधील जीवनातील भाग्य लाभले, तरी मला थोडे महागातच गेले. मोठ्या वर्गातल्या विद्यार्थ्याला वर्गात डुलक्या घेण्याची संधी असते ती या ठिकाणी मला मिळाली नाही" अशी विनोदी भाषेत प्रस्तावना लिहिताना डॉ. परुळेकर यांनी शेवटी असे लिहिले आहे की, "मामांच्या मधील विभूतिमत्त्वाचे गुण माझ्या विद्यार्थीदशेपासून अखेरच्या घटकेपर्यंत पाहण्याची संधी मिळणे हे भाग्य लहान नाही, असे मी समजतो."

**विभूतिमत्त्वाचे तेजस्वी पैलू**

सदर चरित्रग्रंथात वै. नेऊरगावकर यांनी सोनोपंतांच्या चरित्रातील जे तेजस्वी पैलू प्रकाशित केले आहेत त्यांचे विलोभनीय दर्शन घेतल्यावर अशी खात्री होते, की प्रा. सोनोपंत दांडेकर हे आधुनिक काळातील अलौकिक संतच होते.

अमानित्व, अदांभिकत्व, गुरूभक्ती, दया, क्षमा, त्याग, वैराग्य, विवेक इत्यादी दैवी संपत्तीच्या गुणांचे वलय मामांच्या मुखाभोवती

विलसत होते. ऐषआरामाचे जीवन त्यांनी पत्करले नाही. उच्च जीवनाचा विचार त्यांनी लोकांना दाखविला तो केवळ व्याख्यानांनी किंवा कीर्तनांनी नाही. अगदी सहजतेने त्यांनी ब्रह्मचारी व्रत घेतले पण त्यांचा फूंज अथवा अभिमान त्यांच्यापाशी नव्हता. लोक आपणहून मामाना वंदन करीत. कारण अध्यात्मासारखे श्रेष्ठ ज्ञान त्यांच्याकडून त्याना मिळत असे.

**अपरिग्रही वृत्ती**

लोकांकडून हरप्रकारे मानसन्मान मिळत असतानासुद्धा त्यांच्याकडून सेवा करून घेणारी गुरुबाजी किंवा बुवाबाजी करण्याचा विचार वै. मामांच्या मनातसुद्धा कधी डोकावला नाही. त्यांच्या निःस्पृह वृत्तीमुळे मामा व्यवहारामध्ये स्वच्छ राहिले हे सांगताना त्यांचे चरित्रकार नेऊरगावकर लिहितात –

"लौकिक व्यवहारात जसा मामांना घराचा किंवा पोराबाळांचा परिग्रह केला नाही, त्याप्रमाणे परमार्थात फडाचाही परिग्रह केला नाही. शिष्य-शिष्यिणी केल्या नाहीत. ते त्यात गुंतले नाहीत, अडकले नाहीत. मोकळे राहिले. पंढरपुरात दिंडीत जाताना लोक त्या दिंडीला मामांची दिंडी म्हणत; परंतु ते म्हणत, 'मी शेडगे यांच्या दिंडीत जातो.' महाराज, मठपती, पीठाधीश ही पदे सन्मानपूर्वक त्यांच्याकडे आली तरी ती त्यांनी नम्रतापूर्वक नाकारली."

**अध्यात्म प्रसाराचे अखंड कार्य**

आपल्या विवेचनामध्ये मामांनी संतांच्या चमत्कारांबद्दल अत्यंत समर्पक विवेचन केले. ते म्हणत "ज्ञानेश्वरीसारख्या जगाच्या इतिहासात अद्वितीय ग्रंथाची निर्मिती ज्ञानेश्वरांनी केली, हाच सर्वांत महत्त्वाचा चमत्कार आहे. रेड्यामुखी वेद वदविला, भिंत चालविली या गोष्टींचा आजच्या साधकाला काय उपयोग आहे? ज्ञानेश्वरांच्या अलौकिकतेची ती एक साक्ष आहे इतकेच."

लौकिकातील मोठी माणसे आपल्या नादी लावून आपले गुरूपण लोकात मिरविणारी बडी धेंडे आपणास पाहावयास मिळतात, पण मामा त्याला अपवाद होते. मामांनी स्वतःची साधक दशा कधीच सोडली नाही. बंकट स्वामींना ते भेटून परत येताना स्वामींच्या एका शिष्याने मामांचा जोडा त्यांच्यापुढे आणून ठेवला. मामा म्हणाले "अरे, आमचे पाय अजून धड आहेत. तुम्ही अशी सेवा करू नका. मी कीर्तनात जे सांगतो त्याप्रमाणे वागा म्हणजे झाले!"

देव आपलासा करण्याचे सोपे साधन म्हणजे आपल्या वाट्याला आलेले कर्तव्य. ही एक ईश्वरसेवा आहे. ती निष्काम बुद्धीने करणे, हेच खऱ्या अर्थाने धर्मपालन. हा विचार मामांनी समाजात सर्वदूर पसरविण्याचे कार्य केले. ते करीत असताना प्रसिद्धी, पैसा व अन्य वासना यांच्यापासून मामा अलिप्त राहिले. वयाला साठ वर्षे पूर्ण झाली तेव्हा कोणालाही कळू न देता ते अनामिक गावी जाऊन राहिले. त्यामुळे त्यांची 'साठी' साजरी झाली नाही आणि धार्मिक विधीही त्यांनी करून घेतले नाहीत.

**सात्त्विक वृत्तीचा आदर्श**

ज्यांनी वै. मामांचे जीवन जवळून पाहिले आहे त्यांना मामांच्या रूपात एक अलौकिक संताचे दर्शन झाले आहेच. पण ज्याना ते झालेले नाही त्यांनी 'प्रा. सोनोपंत दांडेकर यांचे चरित्र' हा ग्रंथ वाचावा, अशी विनंती येथे करावीशी वाटते. 'सोनोपंत' या पेक्षा 'संत' हीच अक्षरे प्रा. दांडेकर यांच्या नावाआधी शोभून दिसतात हे वाचकांच्या ध्यानी येईल.

*द्वा. वा. केळकर*
*"रघुनंदन" पटवर्धन बाग,*
*एरंडवणे, पुणे ४११ ००४.*

# पुरातत्त्व आणि आत्मशोध

प्रा. म. श्री. माटे

"कोऽहं" मी कोण? या प्रश्नाने सर्व ज्ञानसाधनेला, उपासनेला सुरुवात होते. आजतागायत हा प्रश्न माणसाने असंख्य वेळा विचारला आहे आणि तत्त्ववेत्त्यांनी या प्रश्नाला अनेकविध उत्तरे दिली आहेत. उत्तर शोधण्याचे अनेक मार्ग सांगितले आहेत. यज्ञयाग, योगसाधना, भक्ती असे आणखीही कितीतरी. इतक्या उच्च, तरल पातळीवर नसले तरी पुरातत्त्व हाच प्रश्न विचारते – मी कोण, माझ्या भोवतालचा समाज कसा झाला, माझी हत्यारेपात्यारे, कपडेलत्ते, घरेदारे ही कशी झाली? या सगळ्याचा उलगडा करून घेण्यासाठी पुरातत्त्व जी गोष्ट करते ती म्हणजे मागे वळून पाहते! आपल्याच सारख्या मानवाचे आणि समाजाचे जीवन कसकसे घडत गेले हे जाणून घ्यावयाचा यत्न करते. इतिहासविद्या हाच यत्न करीत असते, पण यासाठी जी साधने वापरते त्यामुळे तिच्यावर मर्यादा पडते. सुनिश्चित आणि लिखित साधने हा इतिहासाचा मुख्य आधार आणि लेखनविद्या मानवाला साध्य होऊन फारफार तर पाच सात हजार वर्षे झाली आहेत. त्याच्या आधीच्या काळात पृथ्वीतलावर माणूस होता की नाही, असला तर कोठे आणि कसा राहत होता याचा शोध घ्यावयाचा झाला तर त्याचे, त्याच्या हत्यारापात्यारांचे, घरदारांचे अवशेष कोठे मिळतात का, मिळाले तर किती प्राचीन असावेत असा तलास घ्यावा लागतो. पुरातत्त्वाचे मुख्य काम हे, आणि म्हणूनच सुरुवातीला या विद्येला 'पुराणवस्तू संशोधन विद्या' असे नाव होते.

आपल्याकडे दीडशे वर्षांपूर्वी अशा जाणीवपूर्वक संशोधनाला प्रारंभ झाला. इंग्रजी राज्यकर्त्यांनी, ज्यांच्यावर राज्य करावयाचे ते लोक, त्यांच्या समजुती, त्यांच्या परंपरा, त्यांची संस्कृती यांच्यासंबंधी माहिती गोळा करावयास सुरुवात केली. त्यामागे राज्यकारभार व्यवस्थित करता यावा हा व्यावहारिक उद्देश होता. परंतु त्यातूनच केवळ जिज्ञासू वृत्तीने, ज्ञानोपासनेसाठी अनेक संशोधक पुढे आले. त्यांनी घालून दिलेले धडे आपणही गिरवले आणि मध्यवर्ती आणि प्रांतीय पुरातत्त्व विभाग, विद्यापीठे, संशोधन संस्था यांनी सांघिकरीत्या संशोधन सुरू केले. त्यामुळे भारतामध्ये माणसाची वस्ती एक लाख वर्षांपासूनची असावी असे दिसून आले. आरंभीच्या काळात भोवतालच्या वन्य प्राण्यांप्रमाणे त्याचे जीवन होते. कंदमुळे, शिकार मिळवावी आणि निवाऱ्यासाठी एखाद्या डोंगर कपारीला पडावे. इतर प्राण्यांना साध्य न झालेली एक गोष्ट माणसाने केली – ती म्हणजे भोवतालच्या निसर्गाची मदत घेण्याची युक्ती. ज्याची शिकार करायची तो प्राणी मोठा शक्तिमान असला आणि केवळ आपल्या हाताच्या शक्तीचा उपयोग नसला तर भोवती पडलेल्या दगडांचा उपयोग करावा, ही बुद्धी ज्या कोणाला सुचली असेल तो मानवी प्रगतीचा प्रणेता म्हणावयास हवा. त्यानंतर झाडाच्या फांद्यांचा, पाल्याचा वापर करून निवारा करता येणे, मारलेल्या प्राण्याचे कातडे पांघरून थंडीचे निवारण करणे, असे करीत करीत मोठ्या नगरात वसाहत करणे, कापडे विणणे,



धातूची हत्यारे करणे अशा पायऱ्या माणूस ओलांडत गेला.

काहीशी आश्चर्याची गोष्ट अशी, की अगदी रानटी अवस्थेत असलेल्या माणसालासुद्धा आपल्यापेक्षा श्रेष्ठ अशी एखादी शक्ती असावी याची जाणीव झालेली होती. या शक्तीला प्रसन्न करून घ्यावे याचाही उमज पडला होता. इतकेच नव्हे, तर मृत्यू म्हणजे काय याचा त्याने विचार केला होता आणि मृत्यू म्हणजे पूर्णविराम नव्हे, त्यानंतरही प्रवास चालूच राहतो अशी त्याची धारणा झालेली होती. माणसाच्या 'श्रद्धां'विषयी पुरातत्त्वाने काय काय माहिती मिळविली आहे हे आता पाहावयाचे आहे.

दहा-पंधरा हजार वर्षांपूर्वी ज्यामध्ये माणूस वस्ती करीत होता अशा 'शिला-निवासां'च्या भिंतींवर आणि छतावर त्याने काढलेली चित्रे मध्य प्रदेश, उत्तर प्रदेश, कर्नाटक इ. भागात मिळालेली आहेत. यामध्ये सामुदायिक नृत्याचे रेखावे आहेत, प्राण्यांची चित्रे आहेत, मधमाशांच्या पोळ्यातून मध गोळा करणारी माणसेही दिसतात. त्यातल्या एका चित्रप्रकाराने पुरातत्त्वज्ञांना खाद्य मिळाले. गवा, सांबर अशा प्राण्यांचे चित्र व त्यात बाण रुतलेला. हे केवळ शिकारीचे दृश्य म्हणता येईल. पण पुरातत्त्व याचा अर्थ असा लावतात, की हा काही जादूटोण्यांचा भाग असावा. म्हणजे असे, की शिकारीला निघण्यापूर्वी असे चित्र काढावयाचे म्हणजे तो प्राणी सापडेल आणि कह्यात येईल. चित्र काढताना काही मंत्रबिंत्र म्हणत असले तरी आपल्याला कळायला मार्ग नाही. पण काहीतरी अतींद्रिय शक्ती आपल्या साहाय्यार्थ बोलावण्याचा हा मार्ग असावा. आजही काही वन्य जमातीत ही प्रथा रूढ आहे. त्यावरून हा अंदाज बांधलेला आहे.

साधारण पाच एक हजार वर्षांपासून सापडणाऱ्या वस्तीच्या घरादारांच्या अवशेषांमध्ये मातीच्या स्त्रीमूर्ती आढळल्या आहेत. यांपैकी काही खेळणी म्हणून केलेल्या, त्यांच्या अंगाखांद्यावर मातीच्या पट्ट्यांनी किंवा कोरून दागदागिने दाखविले आहेत तर बऱ्याच पूर्ण विवस्त्र आहेत आणि त्यावर मातृत्व दाखविणारे अवयव म्हणजे स्तन आणि जननप्रदेश विशेष उठावाने व स्पष्टपणे दर्शविले आहेत. या मातृदेवता आहेत. पुढे या मूर्तींना डोके नाही. शिरविहीन आहेत, कारण ही व्यक्तीची नव्हे, तर मातृत्त्वाची पूजा व उपासना आहे. थेट तेराव्या शतकापर्यंत अशा मूर्तींची उपासना चालू होती. फरक एवढाच, की पुढच्या काळातल्या मूर्ती दगडात कोरलेल्या होत्या.

हडाप्पाच्या अवशेषात शिवाच्या पिंडीसारखे दगड मिळाले आणि एका मुद्रेवर पशुपतीची आकृती आहे. त्यावरून मातृदेवतेच्या रूपाने स्त्रीतत्त्वाची पूजा होत असे, तशी शिवरूपाने पुरुषतत्त्वाची होत असे.

महाराष्ट्रातील इनामगावच्या उत्खननात एका मातीच्या पेटीत मातृदेवता आणि वृषभ (नंदी) यांच्या मातीच्या मूर्ती सापडल्या. प्राचीन काळापासून वृषभ हा त्याच्या जननक्षमतेसाठी प्रसिद्ध होता.

थोडक्यात जननाचा, निर्मितीचा जो प्रत्यक्ष आविष्कार, जड स्वरूपातला आविष्कार त्याची पूजा-अर्चा माणसाने केली आहे तीसुद्धा केवळ आदराच्या, कृतज्ञतेच्या भावनेने केलेली होती की सकाम होती – अपत्यप्राप्तीच्या इच्छेने केलेली होती हा प्रश्न यातून उद्‌भवतो आणि आजच्या सामाजिक रूढी पाहता ती सकाम असावी असे मानणे योग्य दिसते. इतर अनेक देशांत मातृदेवतेच्या उपासना व मूर्ती प्रचलित होत्या.

अनेक उत्खननांतून चारसाडेचार हजार वर्षांपूर्वीची दफने सापडली आहेत. बऱ्याच वेळा ही लहान बालकांची आहेत. दोन मडकी एकमेकांसमोर (तोंडे एकमेकाला जोडून) ठेवून दफन केली आहेत. या मडक्यांमध्ये छोटी भांडी ठेवलेली आहेत. त्यामध्ये बहुधा धान्य, खाद्य पदार्थ, पाणी ठेवलेले असावे. बरोबर शिदोरी बांधून दिलेली! कारण मृत व्यक्ती ही पुढच्या प्रवासाला जाणार आहे हीच कल्पना होती. ईजिप्त, मेसोपोटामिया इकडे राजाचे दफन करीत तेव्हा त्याच्याबरोबर राण्या, सेवक, दासदासी यांना गाडीत आणि दफन नावेमध्ये किंवा रथात होई. परलोक प्रवासात हा सरंजाम हवाच! चीनमध्ये यात थोडी सुधारणा करण्यात आली. दासदासी किंवा शिपाईप्यादे प्रत्यक्ष गाडण्याऐवजी त्यांचे मातीचे पुतळे करून दफनात गाडण्यात येत. आपल्याकडे ज्यांची दफने सापडली आहेत ती मंडळी सत्ताधीश किंवा संपन्न नसल्याने त्यांच्याबरोबर लवाजमा नाही, पण शिदोरी आहे. प्रवास अखंड आहे ही कल्पना किंवा विश्वास आहे. पुढच्या काळात शरीर हे जुन्या वस्त्राप्रमाणे गळून पडते. आत्मा कायम राहतो इत्यादी तत्त्वे प्रचलित झाली. ज्या काळातली दफने आहेत त्या वेळी इतका स्पष्ट फरक माणसे करीत होती की नाही हे समजत नाही; परंतु मृत्यू म्हणजे पूर्णविराम नव्हे, प्रवासातला एक टप्पा आहे, ही समजूत दृढ झालेली होती.

सगळ्याचा सारांश सांगावयाचा झाला तर पुरातत्त्वाने उजेडात आणलेल्या अवशेषांवरून, अतिप्राचीन काळापासून माणसाच्या मनात आपण कोण, कोठून आलो, कोठे जाणार अशासारखे प्रश्न उत्पन्न झालेले होते आणि त्यांची उत्तरेही त्याने आपल्या परीने शोधलेली होती. तत्त्वचिंतनाला सुरुवात झालेली होती. आजही हा शोध घेतच आहोत. 'तत्त्वमसि' हे उत्तर, कोऽहं चा सोऽहं हा प्रतिसाद ही फार पुढची गोष्ट, पण त्याची पाळेमुळे कित्येक सहस्र वर्षे मागे जातात हे पुरातत्त्वाने दाखवून दिले आहे.

*प्रा. म. श्री. माटे*
*१८१६ नातूबाग, सदाशिव पेठ,*
*पुणे - ४११ ०३०.*

# पंडिता रमाबाई - एक वेगळं व्यक्तिमत्त्व

सौ. माधुरी चौकीदार

एका वेदशास्त्रसंपन्न शास्त्री असलेल्या पित्याच्या आणि संस्कृत विद्यासंपन्न असलेल्या मातेच्या पोटी रमाबाईंचा जन्म झाला. पंडिता रमाबाईंनी स्वतः हिंदू धर्मातील संस्कृत ग्रंथांचा, पुराणांचा, शास्त्रांचा अभ्यास केलेला होता. तरीसुद्धा पंडिता रमाबाईंनी ख्रिस्ती धर्म स्वीकारला. रमाबाईंनी ख्रिस्ती धर्म का आणि कोणत्या परिस्थितीत स्वीकारला हे पाहायचे असेल तर रमाबाईंचे जीवनचरित्र, त्यांचे कार्य, त्यांच्या जीवननिष्ठा पाहणे, समजून घेणे अगत्याचे ठरते.

आज आपल्या देशात खेड्यापाड्यात, तळागाळातील लोकांमध्ये साक्षरता अभियान चालविले जात आहे. विशेषतः स्त्रियांसाठी शिक्षण प्रचाराची मोहीम जोरात चालू आहे. सव्वाशे-दीडशे वर्षांपूर्वी स्त्रियांना शिक्षण दिले जात नव्हते. स्त्रियांनी एखादा ग्रंथ हातात घेणे किंवा संस्कृत शिकणे म्हणजे पाप समजले जात होते. तरीसुद्धा राजघराण्यातील काही स्त्रिया थोड्या बहुत शिकत हे अनंत शास्त्री डोंगरे यांनी पाहिले होते. पुण्यातील पेशव्यांच्या राजवाड्यात अनंतशास्त्रींचे गुरू स्त्रियांना संस्कृत शिकवत हे पाहून अनंतशास्त्री प्रभावित झाले आणि त्यांनी प्रतिज्ञा केली की, आधी आपण स्वतः संस्कृत पंडित व्हायचे आणि आपल्या बायकोमुलांना संस्कृत शिकवायचे. कारण आपल्या धर्माचे सारे ज्ञान संस्कृतमध्ये आहे. हे त्यांनी ओळखले होते. बराच प्रयत्न करूनही त्यांना त्यांच्या पहिल्या पत्नीकडून काहीच प्रतिसाद मिळाला नाही. पण पहिल्या पत्नीच्या मृत्यूनंतर त्यांचे दुसरे लग्न झाले आणि लक्ष्मीबाईंनी मात्र त्यांना चांगलाच प्रतिसाद दिला.

रुढीग्रस्त समाजात अर्थातच हे मान्य होणे शक्यच नव्हते. समाजाने त्यांच्यावर बरीच टीका केली. त्यांना वाळीत टाकले. त्यांच्यावर चक्रमपणाचा आरोपही केला. अनंतशास्त्रींनी पुराणांतील स्त्रियांची वगैरे उदाहरणे देऊन खूप समजवायचा प्रयत्न केला, पण व्यर्थ. शेवटी समाजाचा निषेध म्हणून ते गंगामूळसारख्या डोंगराळ, एकाकी प्रदेशात आपल्या पत्नीसह येऊन राहिले. तिथेच त्यांचं कुटुंब विस्तारत गेलं. कृष्णाबाई, श्रीनिवास वगैरे भावंडांचा जन्म आणि शेवटी रमाबाईंचा जन्म तेवीस एप्रिल अठराशे अठ्ठावन्नला गंगामूळलाच झाला.

त्या वेळी दुष्काळाचे वातावरण होते. त्यामुळे गंगामूळ सोडून त्यांना कुटुंबाच्या पोषणासाठी कुटुंब पाठीशी घेऊनच तिर्थयात्रेस निघावे लागले. रमा त्या वेळी फक्त सहाच महिन्यांची होती. कुठेतरी मंदिरात उतरून, पुराणे वाचून, जपजाप्य करून दररोजचे अन्न मिळावावे, अशी यात्रा त्यांना कौटुंबिक गरजेसाठी बराच काळ चालू ठेवावी लागली. मात्र या काळात या दांपत्याने आपल्या मुलांचं शिक्षणही केलं, संस्कृत विद्यासंपन्न असलेल्या लक्ष्मीबाईंनीच या विद्येचं बाळकडू रमेला पाजलं. तल्लख बुद्धीच्या रमाबाईंनी अवघ्या बाराव्या वर्षी अठरा हजार श्लोक तोंडपाठ केले. प्रवास आणि निसर्गाच्या खुल्या शाळेत रमेला विविध अनुभवांचं शिक्षणही मिळालं. परिस्थितीच्या दाहकतेने तावून सलाखून त्यांचं व्यक्तिमत्त्व समृद्ध बनत गेलं. पुढे कुटुंबातील वडील, आई आणि थोरल्या बहिणीच्या पाठोपाठ मृत्यूने त्यांच्या अनुभवाच्या परिपक्वतेला धार चढत गेली. भाऊ श्रीनिवास आणि रमा दोघेच एकमेकांसाठी राहिले. पायी भ्रमण करत ते भारतभर हिंडत होते आणि आयुष्याची मार्गक्रमणा करत १८७८ मध्ये ती दोघं कलकत्त्यात आले.

त्या वेळी म्हणजे साधारण शंभर सव्वाशे वर्षांपूर्वीची ही गोष्ट आहे. कलकत्ता शहरात खळबळ उडाली होती. बातमी होती "एक तरुण, बुद्धिमान स्त्री, आपल्या बंगालमध्ये आली असून, अत्यंत रसाळ वाणीत तडफदार अशी व्याख्याने, प्रवचने करते. तिला अठरा हजार श्लोक पाठ आहेत." ही नवलाईची वार्ता कलकत्त्यात सगळीकडे पसरली होती. तिच्या आगमनानं सुशिक्षितांच्या वर्तुळात एक वेगळंच चैतन्य निर्माण झालं होतं. काही लोक तिला भेटून किंवा पत्राने व्याख्यानांची, चर्चेची, भेटीची, जेवणाची आमंत्रणे देत होते. तिच्या पांडित्याची, कुशाग्र बुद्धीची प्रचिती कलकत्त्याला एका विद्वानांच्या सभेत आली. कलकत्त्याला सिनेट हाऊसमध्ये तिच्या स्वागतासाठी एक खास जाहीर सभा आयोजित केली होती. संस्कृत पंडितांनी तिचा संस्कृतमध्ये परिचय करून दिला. त्यानंतर त्वरित परंतु नम्रपणे तिने त्या सत्काराला उत्तर दिले.

नाहं सरस्वती साक्षात् मन्यध्वे मां न शारदा ।<br>
किन्तु तस्माः सभामध्ये एकोऽहं परिचारिका ।।

याच वेळी बंगाली आणि पाश्चात्त्य विद्वानांनी या वीस वर्षीय विदूषीला सन्मानपूर्वक 'पंडिता रमाबाई सरस्वती' हा किताब बहाल केला.

त्यानंतर कलकत्त्यात ठिकठिकाणहून रमाबाईंना व्याख्यानांसाठी आमंत्रणे येऊ लागली. त्याच वेळी ब्राह्मो समाजाचे केशवचंद्रसेन यांच्याशी रमाबाईंचा परिचय झाला. वेदांचा अभ्यास करण्यास त्यांनी रमाबाईंना प्रोत्साहन दिले तेव्हा धर्मशास्त्रांचा, हिंदू कायद्यांचा रमाबाई विशेष अभ्यास करू लागल्या. परंतु त्या ग्रंथांमध्ये परस्परात मेळ नव्हता. एका गोष्टीबाबत मात्र त्यात एकवाक्यता होती. ती म्हणजे स्त्रीला ब्रह्मज्ञानाचा अधिकार नाही आणि ती स्त्री असल्यामुळे तिला मोक्ष नाही.

अती दुष्ट, पापी कसाही असला तरी नवरा हाच तिचा देव, स्त्रियांना दिलेले नीच स्थान पाहून रमाबाईंचे अंतःकरण व्यथित झाले. तेव्हा रमाबाईंनी वेदवेदान्ताचे अध्ययन करून स्त्रीचे महत्त्व पटवून देणारी, समाजप्रबोधनपर अशी व्याख्याने देण्यास सुरुवात केली. त्या वेळेस रमाबाईंनी दिलेल्या व्याख्यानांचे विषय प्रामुख्याने स्त्रियांच्या तत्कालीन करुण दशेविषयी आणि त्यातून बाहेर पडण्याच्या प्रेरणेविषयी दिसतात.

कलकत्त्यात रमाबाईंच्या जीवनाला एक वेगळीच कलाटणी मिळाली. या काळात रमाबाईंनी आपल्या धर्मातील तत्त्वांचा बराच अभ्यास केलेला दिसतो. त्याच वेळी मनाचा आत्मशोध पण चालू होता. आजपर्यंत आचरलेल्या धर्माबद्दल उपासना विधी, उपासतपास, मंत्रतंत्र यांवरील त्यांचा विश्वास डळमळीत होऊ लागला होता. त्यातले व्यर्थ जाणवू लागले होते. कारण या गोष्टींनी आत्मिक शांती मिळत नव्हती, की पोट भरत नव्हतं. कर्मकांडाने पुण्य गोळा करून मोक्ष मिळविण्याची वाट निरुपयोगी आहे हे त्या अनुभवावरून शिकल्या होत्या.

श्रीनिवासची रमाबाईंना चांगली साथ होती. परंतु १८८० मध्ये आपल्या या भावाचा मृत्यूही त्यांना पाहावा लागला. मग एकाकी पडलेल्या रमाबाईंनी ब्राह्मो असलेल्या बिपिन बिहारी मेधावी या भावाच्या मित्राबरोबरच नोंदणी पद्धतीने विवाह केला. प्रेम, प्रौढ, आंतरजातीय, आंतरप्रांतीय असा तो विवाह होता. त्या वेळी कलकत्त्यात ब्राह्मो समाजाचे महत्त्व वाढत होते आणि महाराष्ट्रातही प्रार्थना समाजाचा उदय झाला होता. रमाबाईंनी ब्राह्मो समाजाच्या अभ्यासास सुरुवात केली. सिलचरला राहत असताना 'सेंट लूकचे शुभ वर्तमान' हे बंगाली भाषेतील पुस्तक, मिशनरी असलेल्या मि. ॲलन यांनी रमाबाईंना दिले. पुराण आणि धर्मशास्त्रापेक्षा हे उतारे काहीतरी वेगळे आहेत याची रमाबाईंना जाणीव होऊ लागली आणि रमाबाईंचा कल ख्रिस्ती धर्माकडे होऊ लागल्याचे पाहून मेधावींनी मि. ॲलनला आपल्याकडे येण्याची बंदी केली. मेधावींना आपल्या पत्नीने ख्रिस्ती धर्मात प्रवेश करणे पसंत नव्हते. "ते अधिक जगले असते तर काय झाले असते, ते सांगता येत नाही", असे रमाबाई एके ठिकाणी म्हणतात. पतीच्या विरोधाची त्यांनी पर्वा केली नसती. पत्नीधर्माची चौकट त्यांनी झुगारून दिली असती. असेच त्यांच्या वरील म्हणण्यावरून वाटते. आपल्या मनाला पटणाऱ्या गोष्टींसाठी त्यांनी कधीच समाजाची पर्वा केली नसती. परंतु ती वेळच आली नाही. लग्नानंतर एकोणीस महिन्यांनीच मेधावींचा कॉलऱ्याने बळी घेतला. मनोरमा नावाच्या आपल्या छोट्या मुलीला घेऊन आणि अनिश्चित भविष्यासह, प्रबोधनात्मक व्याख्याने देत त्यांनी पुन्हा पायपीट सुरू केली. त्यानंतर न्यायमूर्ती माधवराव रानडे, डॉ. भांडारकर वगैरेंच्या आमंत्रणावरून सामाजिक, राजकीय वादळाच्या केंद्रस्थानात, साहित्य आणि संस्कृतीचे माहेरघर असलेल्या पुण्यात त्यांनी प्रवेश केला.

महाराष्ट्रात त्यांच्याबद्दल बातम्या आल्या होत्याच. त्यामुळे त्यांच्याबद्दल उत्सुकता निर्माण झाली होती. रमाबाई कितीही विदुषी असल्या तरी समाज त्यांच्याकडे शेवटी एकाकी, बिचारी, निराधार, विधवा ह्याच दृष्टिकोनातून बघत होता. पण रमाबाई मात्र 'स्त्री-धर्मनीती' या पुस्तकाच्या प्रस्तावनेत लिहितात. "प्रिय माणूस मेल्यास शोकात बुडून न जाता असे समाधान मानावे की, प्रेम एका जागी कोंडून न राहता त्या प्रेमाचा प्रसार इतर प्राण्यांवर करण्यास सवड लाभली आहे. "यावरून लग्न, पती हेच स्त्रीचं सर्वस्व मानण्याकडे त्या काळातही त्यांचा कल नव्हता, असे दिसून येते. एखाद्या स्त्रीचा पती असणे किंवा नसणे यावर तिचे भाग्य अवलंबून नाही, तर आपल्याजवळच्या सामर्थ्याचा उपयोग करून आपलं आयुष्य जीवन कसं अर्थपूर्ण करते, यावर अवलंबून आहे. हा रमाबाईंचा विचार आजच्या काळाच्या बराचसा जवळ आणणारा आहे.

पुण्याच्या वास्तव्यात त्यांचा फादर नेहेम्या गोन्हे आणि पंचहौद मिशनच्या मिस् हर्फर्ड वगैरेंशी परिचय झाला. मिस् हर्फर्डच्या साहाय्याने त्यांनी इंग्रजी शिकण्याचा प्रयत्न केला. पुण्यात त्यांच्या एकंदरीत जीवनाला आणि कार्याला विलक्षण वेग आला. धर्मानं घालून दिलेल्या बंधनातून स्त्रियांना मुक्त करण्याचा प्रयत्नास त्यांनी सुरुवात केली. दीन-दलित दुःखितांच्या वेदनेत त्या सहभागी होऊ लागल्या. बालविधवांना सन्मानाने जीवन जगण्यास प्रवृत्त करावयास त्या पुढे सरसावल्या. आपल्या ध्येयाने प्रेरित होऊन त्या इतक्या झपाटून गेल्या होत्या की, त्यांनी स्वतःला पुनर्विवाहाच्या बेडीत जखडून घेतलं नाही. अज्ञान, भोळेपणा, विनयाच्या फाजील कल्पना भेदरटपणा यामुळे भारतीय भगिनी कठोर गुलामगिरीत अडकलेल्या होत्या. घराघरांत कोंडलेल्या या भगिनींना मुक्त करण्यासाठी रमाबाईंनी महाराष्ट्र हीच आपली कर्मभूमी म्हणून निवडली.

स्त्रियांच्या उद्धारासाठी पुण्यात 'आर्य महिला समाजाची' स्थापना झाली. धर्म आणि परंपरांच्या जोखडातून बालविधवांना मुक्त करण्याचा तो एक प्रयत्न होता. शिक्षणाला त्यात प्राधान्य होतं. स्वावलंबी बनविण्याची त्यात जिद्द होती. पुरुष स्त्रियांना आपली मालमत्ता समजत. यातून सोडवणुकीचा तो प्रयत्न होता. स्त्री शिक्षणाचा उघड उघड पुरस्कार करीत असताना ब्रिटिश राज्यकर्त्यांचंही लक्ष रमाबाईंनी वेधून घेतलं. हंटर कमिशनपुढे रमाबाईंनी आपली साक्ष दिली. बालविवाह, बालवैधव्य, सामाजिक आणि धार्मिक समजुती आणि अपसमज या सर्वांमुळे स्त्रिया शिक्षणापासून वंचित राहतात, असे त्यांनी आपल्या साक्षीत सांगितले.

रमाबाई आपल्या प्रवचनातून, भाषणातून पुराण काळीसुद्धा स्त्री शिक्षण कसे घेत हे सत्यभामा, सावित्री, दमयंती वगैरेंची उदाहरणे देऊन सांगत. त्या काळी स्त्रियांनी व्याख्यानांना जाण्याची प्रथा नव्हती. पण आपले विचार बायकांपर्यंत पोहचले पाहिजेत म्हणून रमाबाई त्यांच्या व्याख्यानाच्या निमंत्रण पत्रिकेत अशी अट घालीत की, घरची एखादी स्त्री बरोबर आणणाऱ्या पुरुषालाच प्रवेश दिला जाईल. अत्यांतिक पुरुष वर्चस्वाच्या काळात आपल्या व्याख्यानासाठी पुरुषांना अटी घालणे ह्यात केवढातरी आत्मविश्वास आणि धैर्य दिसते. अशा प्रकारच्या प्रयत्नांमुळे

स्त्रिया थोड्याफार घराबाहेर पडू लागल्या होत्या. स्वतःच्या अवस्थेचे, समाजस्थितीचे त्यांना आकलन होऊ लागले होते.

रमाबाईंचा कामाचा व्याप वाढला होता. स्त्रियांच्या उद्धाराच्या कामासाठी, व्याख्यानांसाठी त्यांना वारंवार बाहेर जावे लागे. तेव्हा त्यांच्या मुलीस, छोट्या मनोरमेस त्यांनी ननजवळ सांभाळायला दिली. पुढील आयुष्यातसुद्धा मनोरमेच्या शिक्षणासाठी, संगोपनासाठी त्यांनी तिला सिस्टरजवळ वगैरे ठेवले होते. तरी त्या सदैव तिची काळजी घेत. दोघी मायलेकीतील भावबंध पत्ररूपाने प्रकट होत. मनोरमा पुढे आईच्या कार्यात मदत करताना दिसते.

आपल्या नियोजित कार्याला पाठबळ मिळावे आणि इंग्रजी शिकता यावे म्हणून पंडिता रमाबाईंनी इंग्लंडला जाण्याचे ठरविले. 'पंचहौद मिशन'च्या सेंट मेरीज होम मधील सिस्टर्सच्या सहकार्याने त्यांना इंग्लंडला जाणे सुलभ झाले. आपला प्रवासखर्च शक्यतो कोणावर पडू नये म्हणून त्यांनी 'स्त्री-धर्मनीती' नांवाचे पहिले मराठी पुस्तक १८८२ मध्ये लिहिले. सरकारने त्याच्या सहाशे कॉपी घेतल्या आणि इतरत्र विक्रीतून त्यांना बरीच मदत झाली. कुणाचाही फारसा पाठिंबा नसताना, जवळ पैसा नाही, इंग्रजी भाषेचं ज्ञान नाही अशा स्थितीत त्यांनी धाडसी पाऊल उचललं. पण त्यामुळेच त्यांनी आपला व आपल्या देशभगिनींच्या विकासाचा रस्ता मोकळा करून घेतला. समुद्र उल्लंघन करणे, ही गोष्ट धर्मबाह्य होती आणि ती एका स्त्रीनं करणं म्हणजे तर फारच भयंकर होतं. प्रवासाच्या अनुभवांवर आधारित 'इंग्लंडचा प्रवास' हे दुसरं पुस्तकही त्यांनी नंतर लिहिलं.

इंग्लंडमधील सिस्टर्स दयाकृत्ये करताना पाहून हिंदू आणि ख्रिस्ती धर्माचा त्या तुलनात्मक विचार करू लागल्या. ख्रिस्ती धर्मातील समानता, अनुकंपा, करुणा त्यांना भावली. मानवतेचा आणि करुणेचा मंत्र देणाऱ्या ख्रिस्ताकडे त्या आकृष्ट झाल्या. २९ सप्टेंबर १८८३ ला त्यांनी धर्मांतर केलं. त्यांच्या परदेशगमनावर आणि धर्मांतरावर पुण्यात आणि भारतात इतरत्रही बरीच टीका झाली. रमाबाई इंग्लंडमध्ये तीन वर्षे होत्या. तेव्हा विविध शास्त्रे, गणित, इंग्रजी भाषा त्या शिकल्या. इंग्लंडमध्येही आपला खर्च सर्वस्वी दुसऱ्यावर पडू नये म्हणून आपल्याला मिळणाऱ्या शिक्षणाच्या बदल्यात त्या वॉण्टेजमधील नन्सना मराठी आणि चेस्टनहॅमला संस्कृत शिकवीत.

अमेरिकेतील स्त्रियांच्या वैद्यक विद्यालयाच्या डिन डॉ. रेचल बॉडले यांनी डॉ. आनंदीबाई जोशी यांच्या पदवीदान समारंभाचे आमंत्रण केल्यामुळे१८८६ मध्ये रमाबाई फिलाडेल्फियाला गेल्या. तिथे आपल्या देशभगिनीचं कौतुक त्यांनी पाहिलं आणि स्वतःही केलं. रमाबाईंना स्वतः वैद्यकीय शिक्षण घेण्याची इच्छा होती, पण बहिरेपणामुळं ते जमलं नाही. अमेरिकेत रमाबाईंनी सामाजिक, शैक्षणिक क्षेत्रांची पाहणी केली. तेथील बालवाड्या पाहून आपल्या भारतातही तशा असणे आवश्यक आहे, असे त्यांना वाटले. म्हणून तिथल्या पद्धतीचा त्यांनी अभ्यास केला. तेथील शालेय क्रमिक पुस्तकांची त्यांनी भाषांतरे केली. ही पुस्तकं छापण्यासाठी आर्थिक साहाय्य मिळावे म्हणून स्वतः 'The High Caste Hindu Woman' हे इंग्रजी पुस्तक त्यांनी लिहिले. या पुस्तकाने अमेरिकन समाजाला एक विलक्षण हादरा बसला. त्यातूनच प्रेरित होऊन बोस्टन येथे रमाबाई असोसिएशनची स्थापना झाली. अनेक ठिकाणी व्याख्यान देऊन, दहा वर्षांपर्यंत तेथील लोकांनी आपल्या कार्यासाठी, मदत करावी असं आवाहन त्यांनी केलं. आपल्या स्त्री-शिक्षणविषयक कार्याला मूर्त स्वरूप देण्यासाठी दहा वर्षांच्या खर्चाची तरतूद आणि इमारत बांधणीच्या खर्चाची सोय करूनच त्या परत आल्या.

रमाबाईंच्या तेजस्वी व्यक्तिमत्त्वाने आणि अमोघ भाषण शैलीने रमाबाईंच्या कार्याविषयी अमेरिकन लोकांच्या मनात विश्वास निर्माण झाला होता. हिंदूस्थानातील विधवांच्या स्थितीचे चित्र त्यांनी प्रभावीपणे उभे केले. त्यांच्या प्रभावी भाषणांनी भारावून जाऊन त्यांनी रमाबाईंना भरघोस मदत केली. अमेरीकेतील वास्तव्यात खूप कष्ट करून आपल्या भावी कार्यासाठी अनुभव व मदत गोळा केली. हे काम करत असताना त्यांनी काळजीपूर्वक नियोजन करणे, झटपट निर्णय घेणे, पद्धतशीर आखणी करणे वगैरे व्यवस्थापनकौशल्याचे पैलूसुद्धा ग्रहण केले. रमाबाई अमेरिकेच्या पश्चिम किनाऱ्यावरून जपानमार्गे हिंदुस्थानात आल्या. जपानमध्ये त्या बारा-तेरा दिवस होत्या. 'जपान प्रवासाचे वर्णन' या पुस्तकात त्यांनी जपान देशाचे सौंदर्य, तिथल्या माणसांचे विशिष्ट व्यक्तिमत्त्व, आवडीनिवडी, तिथल्या राजकीय घडामोडी, स्त्रियांची बदलती परिस्थिती ह्याचे मार्मिक वर्णन केले आहे.

अमेरिकेतून परत आल्याबरोबर लगेच ११ मार्च १८८९ रोजी रमाबाईंनी मुंबईत 'शारदा सदन' या स्त्रियांचे वसतिगृह असलेल्या शाळेची स्थापना केली. काशीबाई कानिटकर यांना उद्‌घाटनाला बोलावले होते. सार्वजनिक समारंभात स्त्रीलाच अध्यक्ष म्हणून स्थान देण्याची ही पहिलीच घटना होती आणि ती रमाबाईंनी घडवून आणली होती. शारदा सदनातील गोदुताई ही बालविधवा पहिली विद्यार्थिनी. हीच पुढे महर्षी कर्व्यांची पत्नी झाली आणि नंतरच्या काळात मोठी सेवाभावी स्त्री म्हणून प्रसिद्धीस आली. शारदा सदन संस्थेच्या समितीवर असलेल्या न्या. रानडे, डॉ. भांडारकर यांनी रमाबाईंना सहकार्य दिले परंतु लोकमान्य टिळकांनी 'केसरी'तून त्यांच्यावर तोफ डागली. या शारदा सदनात मुलींना ख्रिस्ती प्रार्थनेत सहभागी केलं जातं अशी त्यांच्यावर टीका केली जाऊ लागली.

काही काळानंतर मुंबईतील गर्दी, महागाई याला कंटाळून अठरा विधवांना घेऊन रमाबाई नोव्हेंबर १८९० मध्ये पुण्यात आल्या. परंतु मुलींनी ख्रिस्ती व्हावे असे वातावरण निर्माण होत आहे या मुद्द्यावर न्या. माधवराव रानडे, डॉ. भांडारकर वगैरे सल्लागार मंडळींनी 'रमाबाई असोसिएशन' संस्थेचा राजीनामा दिला. पण रमाबाई खचल्या नाहीत. त्यांनी आपले कार्य सुरू ठेवले. स्त्रियांना आधार देऊन शालेय शिक्षणाबरोबरच व्यावसायिक शिक्षणही दिले जाऊ लागले.

पवित्र तीर्थक्षेत्री मुलींचा गैरवापर केला जातो असे त्यांना समजले

तेव्हा १८९५ मध्ये रमाबाईंनी तीर्थक्षेत्रांना भेटी दिल्या. पण त्यात त्यांना मनासारखे यश मिळाले नाही. १८९६ साली मध्य प्रदेशातील आणि १९०० साली गुजरायेतील दुष्काळग्रस्तांना रमाबाईंनी आधार दिला. त्या वेळी उच्चवर्णीय हिंदू महिला मिळत नाहीत म्हणून दुष्काळी लोकांना जमविण्याचा त्यांनी प्रयत्न लावला आहे, असाही आरोप त्यांच्यावर केला गेला. परंतु 'शारदाश्रम' तर कोणाही अनाथांसाठीच आहे अशी रमाबाईंची भूमिका होती.

१८९६ मध्ये प्लेगच्या साथीचा फैलाव झाला त्या वेळीही रमाबाई पुढे सरसावल्या. याच वेळी त्यांनी आपला आश्रम केडगावला हलवला. तिथे त्यांनी मुक्तिमिशन उभारले. वेगवेगळी उद्दिष्टे ठेवून त्यांनी तिथे अनेक घरे बांधली, विहिरी खणल्या, ओसाड अशा शंभर शंभर एकराच्या परिसरात त्यांनी अक्षरशः नंदनवन फुलविले. त्यांचं लिखाणही चालूच होतं. त्यांनी हिब्रू आणि ग्रीक भाषाही शिकून घेतली आणि बायबलच्या भाषांतराचे काम हाती घेतले. त्यांनी धार्मिक आणि इतर अशी पस्तीस पुस्तके लिहिली. काही वृत्तपत्रीय लेखनही त्यांनी केलं. त्यांची समाजसेवा विधवांसाठी केलेलं कार्य लक्षात घेऊन १९१९ मध्ये त्यांना "कैसर-ई-हिंद" सुवर्णपदक देऊन ब्रिटिश सरकारनं गौरव केला.

पुढे संस्थेची, त्यांच्या कार्याची एकूणच व्याप्ती वाढली. शिक्षण, खंबीर ध्येयनिष्ठा, अन्यायाच्या प्रतिकाराचे धैर्य, वडिलांकडून मिळालेला आत्मजाणिवेचा संस्कार आणि आध्यात्मिक प्रेरणेचा वारसा यामुळे पंडिता रमाबाई विजेसारख्या तेजस्वी, करारी आणि बाणेदार बनल्या होत्या. रमाबाईंच्या वडिलांनी त्यांना ज्ञानाच्या भांडाराचा जसा रस्ता दाखविला तसेच त्यांच्या मनातील स्त्री जातीवरील अन्यायाला प्रतिकार करण्याची प्रेरणा फुलवली. एक स्त्री असूनसुद्धा त्यांच्या कुटुंबात भावाबरोबर एक व्यक्ती म्हणून वाढविल्या गेल्या. प्रवास आणि शिक्षण बरोबरच झालं. म्हणूनच त्या व्यक्तिस्वातंत्र्यवादी होत्या. स्वतःस पटलेली त्यांची मतं पक्की असत. त्या कुठेही तडजोड करताना दिसत नाहीत. म्हणूनच धर्मबदल करतानासुद्धा त्या कोणत्याही गोष्टींना भुलून किंवा प्रलोभनामुळे विचलित होताना दिसत नाहीत. काही तत्त्व पटली, ती खुल्या मनानं स्वीकारली. त्या 'स्त्री' कडे एक व्यक्ती म्हणून पाहत म्हणूनच पुरुषांइतकेच अधिकार आणि व्यवसायाचे, शिक्षणाचे, धर्माचे स्वातंत्र्य स्त्रीला मिळाले पाहिजे असं त्यांचं मत होतं. स्त्री-पुरुषांना समान प्रतिष्ठा आणि हक्क, स्त्रीचे वस्तुमूल्य नाकारणे, स्त्री संघटनांची आवश्यकता, स्त्रीशक्तीचे सामर्थ्य वगैरे आजच्या स्त्री-मुक्ती चळवळीमागच्या संकल्पनाच रमाबाईंनी शंभर वर्षांपूर्वी स्त्री मुक्ती हा शब्द न वापरता आपल्या भाषणातून बोलून दाखविल्या, कृतीतून करून दाखविल्या.

असं म्हणतात समाजाच्या रूढ कल्पनेला धक्का देणारी माणसं थोर असली तरी समाजाकडून त्यांना विरोध होतो. ती नाकारली जातात. पंडिता रमाबाईंच्या बाबतीत तेच झालं. त्यामुळे 'अवघे विश्वची माझे घर' अशा वृत्तीने सहजपणे वावरणाऱ्या, नाना भाषा आत्मसात करणाऱ्या, पंडिता, विदुषी, उत्तम वक्त्या, कवयित्री, लेखिका, समाजसेविका शेवटी शेवटी केडगावच्या लहानशा मुक्तिमिशनमध्ये बंदिस्त होत गेल्या. साठीच्या सुमारास त्यांचं शरीर थकलं. आयुष्यभर धगधगणारे हे व्यक्तिमत्व ५ एप्रिल १९२२ मध्ये केडगावच्या मुक्तिमिशनमध्ये शांत झाले.

स्त्रियांच्या उद्धाराची तळमळ, त्यासाठी पंडिता रमाबाईंनी दिलेलं योगदान हे भारतीयांच्या दृष्टीनं अत्यंत महत्त्वाचं ठरतं. पुण्यातील सुधारक मंडळी, प्रार्थना समाजाच्या सभांतून किंवा स्त्रीहितकारिणी सभेद्वारे स्त्रियांना घराबाहेर पडून व्याख्याने ऐकण्याची, स्वतंत्र विचार करायला लावण्याची, थोडीफार मते मांडण्याची सवय लावत होते. त्या प्रक्रियेला रमाबाईंच्या व्याख्यानांनी, प्रवचनांनी चांगलीच गती मिळाली होती.

स्वतःच्या जगण्याविषयी रमाबाईंचा ठाम असा दृष्टिकोन दिसून येतो. ज्या गोष्टी त्यांना पटत नव्हत्या त्याबद्दल त्यांनी ठामपणे आपले विचार मांडले. त्यांच्या वैयक्तिक गरजा फारच थोड्या होत्या. त्यामुळेच त्या जन्मभर ताठ राहू शकल्या. आज पंडिता रमाबाई नाहीत, पण त्यांचे विचार निश्चितच समाजात रुजलेले दिसतात.

*सौ. माधुरी चौकीदार*
*बी-१, पुष्कर सोसायटी,*
*गोखले रोड, शिवाजी नगर, पुणे - ४११ ०१६.*

# मोक्षमार्गप्रदीप श्रीमत् दासबोध

सुरेशबुवा सोन्ना, रामदासी

"निर्माणस्थळ गौतमी परि महाकृष्णातिरी जो वसे ।
कांतासंग नसे, प्रपंचही नसे, आशा दुराशा नसे ।
ज्याला उत्तम रामदास म्हणती, त्रैलोक्य वंदीतसे ।
ऐसा सद्गुरू हा अनंतकविचा बद्धास तारीतसे ॥'

अनंतकविंच्या या श्लोकानुसार लहानपणापासूनच ऐहिक उपभोगात 'विरक्त' असणाऱ्या श्री. समर्थांनी वयाच्या बाराव्या वर्षी लग्नाच्या बोहोल्यावर उभे असताना, 'सावधान' शब्द ऐकला, आणि खऱ्या अर्थाने ते सावध झाले. लग्नाचा हा शुभ सोहळा प्रत्येकाच्याच जीवनामध्ये येतो. परंतु त्यातील 'सावधान' शब्दाने किती लोक सावध होतात? जे विरक्त वृत्तीचे असतात तेच सावध होवू शकतात. कविवर्य मोरोपंत म्हणतात,

'द्विज सावधान ऐसे सर्वत्र विवाहमंगली म्हणती ।
ते येक रामदासे ऐकिले तया असो सदा प्रणती ॥'

लग्नमंडपातून सावध होवून समर्थांनी पूर्णपणे ऐहिकाचा त्याग केला. लहानपणीच अंगी असणारी समर्थांची ही विरक्त वृत्ती साधकाला, उपासकाला योग्य मार्गदर्शन करणारी आहे. लग्न सोहळ्यातून पलायन करून समर्थांनी पुढे नाशिकजवळील टाकळी येथे बारा वर्षे तपश्चर्या केली. जीवनामध्ये तपश्चर्येला अत्यंत महत्त्व असल्याने समर्थांची अखंडपणे चाललेली बारा वर्षांची उपासना साधकाला आजही मार्गदर्शनपर ठरते. तपश्चर्या काळात रोज पहाटे उठून संगमावर स्नान-संध्या करावी, सूर्यनमस्कार घालावेत. त्यानंतर श्रीरामरायांची मानसपूजा करून संगमामध्ये कंबरभर पाण्यात उभे राहून एक प्रहरपर्यंत गायत्रीमंत्राचा जप करावा. दुसऱ्या प्रहरात "श्रीराम जयराम जयजयराम" या तारकमंत्राचा जप. माध्याह्न झाल्यावर माध्याह्नाची संध्या करावी. नंतर पंचवटीत जावून माधुकरी मागून परत येताना श्रीरामास माधुकरीचा नैवेद्य दाखवावा. पुढे त्या माधुकरीचे तीन भाग करून एक भाग गायीस, दुसरा संगमातील माशांना टाकावा, आणि तिसरा भाग स्वतः भक्षण करावा. दुपारपासून सायंकाळ पर्यंतचा समर्थांचा वेळ काही लेखन-वाचनामध्ये, तर काही नाशिक पंचवटीमध्ये विद्वान-शास्त्री पुराणिक यांचे प्रवचन ऐकण्यात जात असे. त्यानंतर रात्री चिंतन, मनन तसेच रामरायाची प्रार्थना करून झोपी जावे. अशा पद्धतीने अखंड बारा वर्षे चाललेली ही समर्थांची तपश्चर्या होती. या अखंड उपासनेमुळेच त्यांना प्रभुश्रीरामांची कृपा प्राप्त झाली म्हणून जीवनामध्ये तपश्चर्या, उपासना, साधना या गोष्टींना मोलाचे स्थान आहे. सद्यस्थितीत समर्थांच्या या उपासनेचा विचार न करता अनेक भक्तमंडळी नुसताच दासबोधाचा अभ्यास करताना दिसतात. या संदर्भात स्वतः समर्थांनीच स्पष्ट सांगितले-

"उपासनेचा मोठा आश्रयो । उपासनेविण निराश्रयो ।
उदंड केले तरी तो जयो । प्राप्त नाही ॥ दासबोध

वास्तव दासबोधाचा अभ्यास करण्यासाठी त्यातील ओवीवर केवळ चर्चाच करून ईप्सित साध्य होणार नाही, तर त्यासाठी उपासनेची बैठक महत्त्वाची आहे. आपण जेव्हा खऱ्या अर्थाने समर्थांचे दास होवू, तेव्हाच त्यांचा बोध समजेल व शाश्वताची प्राप्ती होईल.

बारा वर्षाच्या या अखंड तपश्चर्येनंतर प्रभू रामरायांच्या आज्ञेनुसार समर्थांनी पुढील बारा वर्षे तीर्थाटण करून संपूर्ण भारत भ्रमण केले. या भारत भ्रमणामध्ये भिक्षेच्या निमित्ताने समाजाचे सूक्ष्म निरिक्षण केल्यानंतर समर्थांना एक गोष्ट बारकाईने जाणवली. ती म्हणजे "प्रत्येक मनुष्याच्या देहामध्ये 'ईश्वर' राहिला असून मनुष्य प्राणी हा मूलतः ईश्वरस्वरूप आहे. तेव्हा समाजातील सर्व माणसे ही ईश्वर असूनसुद्धा, तसेच सर्वत्रच जर माझा श्रीराम राहिलेला असेल तर माणसे अशी दानवांप्रमाणे का वागतात? त्यावेळच्या संपूर्ण परिस्थितीचे अवलोकन करता ही गोष्ट आपल्या अधिक लक्षात येईल. समर्थांच्या वेळी सर्वत्रच अनाचार, भ्रष्टाचार माजला होता. धर्म हा परसत्तेच्या दारात आक्रंदत होता, स्त्रियांवरील अत्याचाराला तर सीमाच नव्हती. कोठेही चांगले असे काही दिसतच नव्हते. अशा प्रकारे राक्षसी वृत्तीने वागणाऱ्या मानवाला जवळ घेऊन संघटीत करून, 'तू देव आहेस, माणूस आहेस' हे त्याला समजविण्यासाठी समर्थांनी त्या काळात एक मोठी क्रांती केली. समर्थांची ही क्रांती म्हणजेच 'प्रत्येक माणसाच्या मनोवृत्तीमध्ये, आचरणामध्ये आणि विचार प्रक्रियेमध्ये ईश्वराभिमुख बदल घडवून आणणे यालाच मनुष्य जीवनाचे 'कल्याण' असे म्हणता येईल.

सध्याची वस्तुस्थिती पाहाता, आज माणूस माणसाशी माणसाप्रमाणे वागत नाही. सर्वत्र हेवे-दावे, तिरस्कार, मत्सर, संशय, क्रोध हे प्रकर्षाने जाणवते. अशा माणुसकीशून्य परिस्थितीत जर मनुष्याला ईश्वरप्राप्ती करून घ्यायची असेल तर श्री समर्थांच्या ग्रंथराज दासबोधातील अद्वैत तत्वज्ञानाचा विचार करून त्याप्रमाणे वागणे

आवश्यक आहे. समर्थांचा दासबोध म्हणजे महाराष्ट्राच्या संत वाङ्मयाच्या खजिन्यातील चमकणारा एक तेजस्वी हिरा होय. ज्याच्यायोगे अज्ञान अंधकार नाहीसा होवून ज्ञानाची ज्योत सतत तेवत राहिल. लहान मुलांपासुन ते वृद्धांपर्यंत सर्वांनाच सतत मार्गदर्शन करणारा असा हा दासबोध ग्रंथ, की ज्यामध्ये समर्थांनी सर्व विषय आणलेले दिसतात. ज्ञानाची साधना करणाऱ्या मोक्षाची इच्छा असणाऱ्या साधकांना तर हा ग्रंथ अत्यंत उपयुक्त आहे. म्हणून प्रस्तुत लेखाच्या माध्यमाने आपण थोडक्यात या ग्रंथातील पहिल्या समासावर चिंतन करणार आहोत. ज्या समासात समर्थांनी स्वतःच दासबोधाची फलप्राप्ती सांगितली.

सर्व संतवाङ्मयाचा विचार करता अनेक संतांनी वेदांतावर ग्रंथरचना केलेली आढळते. प्रत्येकाचे उद्दिष्ट 'ईश्वर प्राप्ती' हेच आहे. कोणत्याही ग्रंथाची सुरूवात करताना वैदिक परंपरेला अनुसरून प्रथमता मंगलस्वरूप असणाऱ्या अशा विघ्नहर्त्या श्री गणेशाचे स्तवन करूनच मग पुढे प्रत्यक्ष ग्रंथाला सुरूवात केल्याचे इतर संतांच्या ग्रंथामध्ये जाणवते. परंतु समर्थांचा ग्रंथराज दासबोध मात्र याला अपवाद आहे. कारण समर्थांनी दासबोध ग्रंथ लिहिण्यापूर्वी प्रारंभी अशा प्रकारचे नमन (स्तवन) केले नाही. दासबोधातील पहिला समास म्हणजे संपूर्ण ग्रंथाची प्रस्तावनाच. दासबोध ग्रंथाच्या श्रवणाने निश्चित काय मिळणार आहे? ग्रंथ लिहिण्याचा हेतू कोणता? ग्रंथात कोणकोणते विषय मांडलेले आहेत? तसेच या ग्रंथाला कोणकोणत्या इतर ग्रंथांचा आधार आहे. यासर्व गोष्टी प्रथमताच समर्थांनी स्पष्ट करून मगच पुढे ग्रंथाला प्रत्यक्ष सुरूवात केलेली दिसून येते.

दासबोधाचे जन्मस्थान असणारी ती पवित्र शिवथरघळ! त्या निसर्गरम्य शिवथरघळीमध्ये बसून समर्थ ज्यावेळेस दासबोध सांगू लागले त्यावेळेस त्यांना श्रोत्यांनी प्रश्न विचारला. प्रश्न विचारणारा हा श्रोता अज्ञान अंधकार, संशय, भ्रम, दुःख तसेच संसारातील अनेक दुःखानी ग्रासलेला असून शाश्वत समाधानासाठी, ईश्वर प्राप्तीसाठी अनेक मार्ग धुंडत होता. अशा श्रोत्याने आपल्या सहज प्रवृत्तीने समर्थांना प्रश्न विचारला, त्याच्या त्या प्रश्नांनीच समासाची सुरूवात झाली. ग्रंथाचा प्रारंभ झाला. श्रोत्याने विचारले-

"श्रोते पुसती कोण ग्रंथ । काय बोलिले जी येथ ।
श्रवण केलियाने प्राप्त । काय आहे ॥" दासबोध-१-१-१

दासबोधातील या पहिल्या ओवीतच १) ग्रंथ कोणता? २) या ग्रंथात काय सांगितले आहे आणि ३) या ग्रंथाचे श्रवण केल्यावर काय मिळेल? अशा तीन प्रश्नांचा समावेश होतो. या तिनही प्रश्नांची उत्तरे समर्थांनी यथार्थपणे दुसऱ्याच ओवीत दिली. ते म्हणतात-

"ग्रंथा नाम दासबोध । गुरूशिष्यांचा संवाद ।
येथ बोलिला विशद । भक्तिमार्ग ॥" दासबोध-१-१-२

प्रस्तुत ग्रंथाचे नांव 'दासबोध' असून हा ग्रंथ म्हणजे सद्गुरू आणि सद् शिष्य यांच्यामध्ये झालेला अध्यात्मिक सुसंवाद आहे. दासबोधामध्ये मुख्यत्वेकरून भक्तिमार्गाचे विवेचन केले असून पुढे समर्थांनी नवविधा भक्ती, शुद्ध ज्ञान, प्रखर वैराग्य, अध्यात्म यांची लक्षणे कशी असतात हे सांगितले. त्याचप्रमाणे मुख्य भक्ती कोणती? शुद्ध ज्ञान म्हणजे काय? शुद्ध उपदेश म्हणजे काय? आत्मस्थिती, सायोज्यमुक्ती, मोक्षप्राप्ती, मुख्य देव कोणता? वगैरे अनेक प्रश्नांचा मागोवा घेऊन हे सर्व विषय सोप्या पद्धतीने या ग्रंथात स्पष्ट केले आहेत. त्याचप्रमाणे महत्त्वाचे म्हणजे माणसाच्या मनामध्ये असणारे अनेक प्रकारचे संशय, विकल्प, भ्रम, ईश्वराविषयीच्या चुकीच्या कल्पना यातील संशय नांवाच्या शत्रूने आज संपूर्ण समाज पोखरलेला आहे. संशयामुळे फार मोठे नुकसान होते.

मनुष्य सुखप्राप्तीसाठी अहोरात्र धडपडतो पण या संशयामुळे त्याला सुखाचा क्षण प्राप्त होत नाही. याबाबत भगवद्गीता स्पष्ट सांगते-

"अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यती ।
नायं लोको ऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः ॥"

अशा या संशयामुळे होणारे नुकसान सर्वच संतांनी स्पष्ट केले आहे. या सर्वनाशास कारणीभूत असणाऱ्या संशयाचे मूळ पूर्णपणे नष्ट करण्याचे श्रेय दासबोध ग्रंथास देता येते. कारण समर्थांनी या सर्व गोष्टींचा छेद दासबोधात केलेला आढळतो.

पुढे समर्थांनी दासबोध ग्रंथास कोणकोणत्या ग्रंथाचा आधार घेतला ते स्पष्ट केले. त्यामध्ये उपनिषदे, ब्रह्मसूत्रे आणि वेद हे महत्त्वाचे आधार आहेत. परंतु त्यातूनही प्रामुख्याने आत्मप्रचीतीचाच म्हणजे स्वानुभवाचा आधार मुख्य आहे. याशिवाय शिवगीता, रामगीता, गुरूगीता, पांडवगीता, हंसगीता, भगवद्गीता वगैरेंचाही आधार ग्रंथास असल्याने या ग्रंथातील विचार हे साक्षात भगवंताचेच आहेत. त्यामुळे एखाद्या मत्सरी माणसाने जर यावर टीका केली तर या इतर सर्व ग्रंथाचा अव्हेर केल्यासारखे होईल व भगवंताच्या वचनावर अविश्वास असल्याचे स्पष्ट दिसून येईल. असे समर्थ स्वतः निश्चयाने सांगतात. याहीपुढे समर्थांनी आणखी स्पष्ट केले, ते म्हणतात "या ग्रंथाचा पूर्णपणे अभ्यास न करता जो उगीचच नांवे ठेवील, दूषणे देईल तो दुरात्मा व दुरभिमानी आहे. या मूर्खपणाच्या अभिमानातूनच मत्सराची निर्मिती होऊन त्यातून तिरस्कार प्रगट होतो आणि मग क्रोधाच्या आहारी जाऊन मनुष्याचे अकल्याण होते." या ठिकाणी समर्थांनी 'कामक्रोधादी विकारांनी बरबटलेला मनुष्य चांगला नसतो, हे अधिक स्पष्ट करण्यासाठी एका पौराणिक कथेचे उदाहरण दिले ते असे-

"समुद्र मंथनाचे प्रसंगी भगवान श्रीविष्णू मोहिनी रुपाने देव आणि दैत्य यांना अमृत वाटीत असताना राहूने ते लबाडीने म्हणजे देवांच्या पंगतीमध्ये जाऊन प्राशन केले. ही गोष्ट सूर्य-चंद्र यांनी विष्णूच्या लक्षांत आणून दिली. त्यावेळी राहूने घेतलेले अमृत पूर्णपणे पोटात जाण्यापूर्वीच भगवान श्रीविष्णूंनी त्याचा शिरच्छेद केला." या पौराणिक कथेचा आधार घेऊन समर्थ श्रोत्यांना सांगतात, "अमृत हे सजीव करणारे आहे हे त्रिवार सत्य असूनदेखील अंतरी काम, क्रोध, मत्सरादी विकारांनी नासलेल्या राहूचा नाश त्याच अमृत प्राशनामुळे ओढवला.

"कामक्रोधे लिथाडिला । तो कैसा म्हणावा भला ।
अमृत सेविताच पावला । मृत्यू राहो ।।" दासबोध

म्हणून दुराभिमान, मत्सर, तिरस्कार, काम, क्रोध इत्यादी विकार मनामध्ये ठेवून या ग्रंथाकडे पाहू नये" असे स्पष्टपणे सांगून समासाच्या शेवटी समर्थांनी या ग्रंथाच्या अभ्यासाने, श्रवणाने काय प्राप्त होईल त्याचे स्पष्टीकरण केले आहे.

प्रस्तावनारूप असणाऱ्या या समासात समर्थांनी शेवटी ग्रंथाची फलश्रुती सांगितली. समर्थ म्हणतात-

"नासे अज्ञान दुःख भ्रांती । शीघ्रचि येथे ज्ञानप्राप्ती ।
ऐसी आहे फलश्रुती । ईये ग्रंथी ।।" दासबोध

दासबोध ग्रंथाच्या श्रवणाने अज्ञान, दुःख व खोट्या समजूती यांचा समूळ नाश होऊन शीघ्रपणे म्हणजे तत्काळ खऱ्या, शुद्ध ज्ञानाची प्राप्ती होईल. आळशी असणारे साक्षेपी म्हणजेच उद्योगी बनतील, दुर्गुणी माणसे उत्तमगुणी होतील, पापी माणसांना पश्चाताप होऊन ते त्वरित भक्तीमार्गाकडे वळतील, व स्वतःचे आत्महित साधून जीवनाचे कल्याण करून घेतील. 'मी देह आहे' अशा देहबुद्धीला दृढ पकडल्यामुळे मनुष्यास दुःख होते. त्या देहबुद्धीतील असणारे अनेक धोके नष्ट होतील. तसेच नाना प्रकारचे संशय, त्यातून निर्माण होणारे भ्रम हे समूळ नष्ट पावतील आणि शेवटी संसारातील दुःखाचा पूर्णपणे नाश होऊन संसार सुखमय होईल. मग संसार जरी सुरू असला तरी त्यात निर्माण होणाऱ्या अडचणींवर मात करण्याचे एक आगळे सामर्थ्य या ग्रंथाच्या श्रवणाने निश्चितपणे प्राप्त होईल असे समर्थ ठामपणे सांगतात व शेवटी महत्त्वाचे प्रतिपादन करतात ते म्हणजे, "ही दासबोध ग्रंथाची सांगितलेली फलश्रुती त्रिवार सत्य आहे. हे जरी खरे असले तरी या ग्रंथाचा अभ्यास करणाऱ्या अभ्यासार्थींची मनोवृत्ती, मनातील विकार जसे असतील तसेच फळ त्यांना मिळेल. हे निश्चित.

"जयाचा भावार्थ जैसा । तयास लाभ तैसा ।
मत्सर धरी जो पुंसा । तयास तेंचि प्राप्त । दासबोध

ग्रंथराज दासबोधामधील स्वतः समर्थांनीच सांगितलेल्या या फलश्रुतीचा सूक्ष्म अभ्यास केला तर लक्षात येते की सद्यस्थितीत मनुष्याला जर आपल्या जीवनाचे सार्थक करून घ्यायचे असेल तर त्याने 'दासबोध' हाच ग्रंथ वाचून त्याचे मनन करणे अत्यावश्यक आहे. सर्व संतांनी मानवाच्या कल्याणासाठीच उपदेश केला. संतांचे अभंग, त्यांच्या ग्रंथातील ओव्या, ग्रंथांची पारायणे, ओव्यांवर केवळ चर्चा करणे ह्या सर्व गोष्टी आपण करतोच. पण संतांचे विचार हे जेव्हा प्रत्यक्ष आचरणात उतरतील तेव्हाच मनुष्याच्या मनोवृत्तीमध्ये बदल होईल. जोपर्यंत मनोवृत्तीत बदल होत नाही तोपर्यंत काहीही केले तरी ते निरर्थकच ठरेल. वास्तव लहानांपासून ते वृद्धांपर्यंत तसेच मोक्ष जिज्ञासा असणाऱ्या साधकांना, सर्वांनाच सतत मार्गदर्शन करणाऱ्या या ग्रंथाचा अखिल मानवाने विचार करावा आणि आपल्या जीवनाची सफलता करून घ्यावी. याच एका सद्हेतूने समर्थांच्या या समासाचा विचार केला.

समर्थांनी शेवटपर्यंत प्रभू श्रीरामाचे दास्यत्व केले. रामाचे दास म्हणूनच ते राहिले. तेव्हाच त्यांना ज्ञान झाले. मा. अण्णाबुवा नेहमी सांगतात- "तुम्ही दास व्हा, बोध तुमच्या पाठीशी आहेच." अशा प्रकारची दास्य भक्ती सर्वांकडून करून घ्यावी हीच समर्थचरणी प्रार्थना करून मागतो-

'समर्थे समर्थ करावे ।'

।। जय जय रघुवीर समर्थ ।।

*सुरेशबुवा सोन्ना, रामदासी*
*मु. पो. सज्जनगड, जि. सातारा.*

# कसे आमचे स्वामीजी ?

अनुजा

देव व दानव यांच्यात जेव्हा समुद्रमंथन झाले तेव्हा त्यातून चौदा रत्ने निघाली; परंतु त्या सर्वांहून अमोल असे एक रत्न १२ जानेवारी १८६३ रोजी भारताला – नव्हे जगाला मिळाले. पिता विश्वनाथ व माता भुवनेश्वरी यांच्या प्रखर शिवनिष्ठेमधून जन्माला आलेल्या या बाळाचे नाव 'नरेंद्र'.

दिव्य अंश घेऊन जन्माला आलेल्या या मुलाचा लहानपणी खेळही दिव्यच असे. ध्यानाचा! पण तो खेळही पूर्ण एकाग्रतेने खेळला जाई. त्या एकाग्रतेमधून खरच समाधी लागलेली असताना घाबरलेल्या सवंगड्यांनी नरेंद्रच्या मातेला धावत बोलावून आणले. खेळही दिव्य, दृश्यही दिव्य. छोट्या नरेंद्रच्या पाठी फणा धरून उभा असलेला नाग जणू आशीर्वाद देत होता. 'यशवंत हो जयवंत हो'. दिवस अशाच दिव्य अनुभूतीतून जात होते. जीवनामध्ये अलगदपणे सद्गुरूंनी प्रवेश केला. सर्व शक्ती, बळ नरेंद्रच्या पाठी उभे करून त्या महात्म्याने जगाचा निरोप घेतला. त्या शक्तीच्या शुद्धत्वामधून खेतडीच्या महाराजांना पुत्रप्राप्तीचा आशीर्वाद नरेंद्रच्या मुखातुन गेला व बऱ्याच वर्षांनी प्राप्त झालेल्या त्या पुत्ररत्नाच्या आनंदाप्रीत्यर्थ नरेंद्राची विवेकाची, त्यागाची भूमिका लक्षात घेऊन महाराजांनी त्यांचे आदराने, कौतुकाने जाहीर नाव बदलले. नवीन नाव झाले 'विवेकानंद'.

भारत प्रवासात काही दोस्तमंडळींबरोबर अरण्यातून जात असताना अचानक उधळलेला, माजलेला बैल समोरून आला. सर्व मित्र घाबरून पळाले. बिचारी मिस मुल्लर, तिला कुठे पळावे हेच कळेना. एवढ्यात तिच्या लक्षात आले पळायला नकोच. असे एक ठिकाण आहे ते म्हणजे स्वामींच्या पाठी लपणे. स्वामी हातांची घडी घालून शांतपणे त्या भयानक बैलाच्या नजरेला नजर देऊन उभे होते. दृश्य अद्भूत होते. मिस मुल्लर थरथर कापत ते पाहत होती. तासाभराने तो बैल स्वामींच्या नजरेतील स्थिरत्व, तेज बघून खाली मान घालून निघून गेला, आक्रमक पवित्रा बदलून व निर्वैरतेन पौरुषत्व हे स्त्रीचे रक्षण करण्यासाठीही असते हे बाकीच्यांना कृतीमधून दाखवून.

'चित्त शुद्ध तरी शत्रू मित्र होती
व्याघ्रही न खाती सर्व तया.'

याच अर्थाचा श्लोक गुणगुणत स्वामींनी शांतपणे चालायला सुरुवात केली असेल, असेच त्यांच्या त्या रुबाबदार व्यक्तिमत्त्वाकडे पाहून वाटते.

भारतरूपी महातीर्थाची यात्रा पूर्ण झाल्यावर भारतातील त्या वेळच्या दरिद्रीनारायणाकरिता, वैभवात लोळणाऱ्या पाश्चात्त्य राष्ट्रांना भारताच्या आध्यात्मिकतेचा संदेश पोचविण्याकरिता स्वामीजी सर्वधर्म परिषदेसाठी अमेरिकेत गेले. सहजासहजी हा बेत जमला नव्हता. संकटांची साथ होतीच; परंतु त्याची भीती कधी वाटली नाही, फिकीर कधी केली नाही. सभा सुरू झाली. स्वामी बोलायला उभे राहिले. समोरचा प्रचंड विद्वान, भपकेबाज जमाव उत्सुकतेने या साध्या भगव्या वेषातील जबरदस्त आत्मविश्वास असलेल्या व्यक्तीला निरखून पाहत होता. येरा गबाळ्याचे काम नव्हतेच त्या सभेमध्ये बोलण्याचे. शांत, तेजस्वी जाणवले. आपल्या पाठीमागे अनेक तपस्वी, फक्त आपल्यालाच दिसणारे, उभे आहेत. त्यात एक जराजीर्ण तपस्वीही होता. त्याने आपला वरदहस्त पुढे केला. आज्ञेचे पालन झाले व स्वामींच्या मुखातून अद्भूत, शुद्ध प्रेमाने थबथबलेले शब्द बाहेर पडले,

'अमेरिकेतील माझ्या बंधुभगिनींनो' टाळ्यांचा कडकडाट चालू असतानाच भारताचे आध्यात्मिक वैभव मोठ्या अभिमानाने सांगितले गेले. तेही कुठल्याही एक पंथाचा पुरस्कार न करता. खरा तो एकचि धर्म जगाला प्रेम अर्पावे. त्या जगाला समजून चुकले, 'विवेकानंद ही अजोड विभूती' काळ पुढे सरकत होता. शिष्यसमुदाय वाढत होता. त्यामध्ये मिस मार्गारेट नोबल, मिस् बाल्डो, मिसेस ओलवुल, मिस् मॅक्लिऑड वगैरे अनेक स्त्रिया होत्या. परंतु ब्रह्मचर्याचे ते मूर्तिमंत प्रतिक सांगून गेले.

'चारित्र्याची जाण असू दे,
संदेशच हा मनी धरा'

हळूहळू अवतारसमाप्तीची जाणीव होऊ लागली. स्वामीजींनी मोहपाश दूर सारायचे असतात हे जणू दाखवून देण्यासाठीच मृत्यूच्या स्वाधीन क्षणाला भगिनी निवेदितांना (मार्गारेट नोबल) गूढ पूर्वसूचना देऊन बाजूला सारले. खरे प्रेम, शुद्ध प्रेम मोहपाशात बसू शकत नाही आणि म्हणूनच त्या आत्म्याला सद्गती मिळते, ही सत्यता पटवून दिली.

ते म्हणत असत, 'दुसरा विवेकानंद जन्माला आला, तरच तो पहिल्या विवेकानंदाने काय कार्य केले हे सांगू शकेल आणि तरीसुद्धा योग्य वेळी कितीतरी विवेकानंद निर्माण होतील.' शुद्ध रूप, शुद्ध तत्त्वांत मिसळून गेले.

आठवणी दाटतात, डोळे भरून येतात; तेच डोळे बोलून जातात.

'असे आमचे स्वामीजी'.

●●●

# गीतेतील सांख्यज्ञान - अध्याय २ रा

सौ. ज्योती प्र. जांभोरकर

गीतेत भगवंतांनी सांख्ययोगाला अग्रक्रम दिला आहे. दुसऱ्या अध्यायातील दुसऱ्या श्लोकापासून भगवान बोलायला सुरुवात करतात. इथूनच सांख्यतत्त्वज्ञान सुरू होते. प्राकृतिक घटना तपशीलवार कळतात ते शास्त्र किंवा ज्ञान म्हणजे सांख्य. सं + ख्या असा विग्रह केल्यानंतर त्यातून गुह्यज्ञान असाही अर्थ निघतो. भगवंतांनी अर्जुनाला दिलेले सर्वच ज्ञान गुह्यतम आहे. सांख्यबुद्धी सर्व घटनाक्रमामागील तत्त्वांचा शोध घेते. या शोधातूनच देहबुद्धी ही क्षुद्रबुद्धी आहे याचा बोध होतो. समर्थ वारंवार हेच सांगतात 'देहबुद्धी ते आत्मबुद्धी करावी!' त्रिविध तापाने पोळलेल्या बद्ध मनुष्याला मुक्त करण्यासाठीच प्रस्तुत तत्त्वज्ञानाची निर्मिती आहे.

गीतेचा जन्म झाला त्या वेळची कुरुक्षेत्रावरील परिस्थिती सर्वांना माहीत आहे. अर्जुन भगवंताचा सखा आहे, आप्त आहे. दोघांचे एकमेकांवर प्रगाढ प्रेमही आहे. ऐन युद्ध सुरू करण्याच्या वेळी आप्तांना, गुरूजनांना पाहून अर्जुन दुःख, शोक, मोह व्याप्त झाला आहे. आप्तांच्या रक्ताने हात रंगवून सुख उपभोगण्याची त्याची इच्छा नाही. मी यांना मारणार, माझ्यामुळे हे मरणार या विचारांनी तो गलितगात्र झाला आहे. त्याला आलेली बद्धता अज्ञानामुळे आहे. त्याची दुःख प्रकृती या अव्यक्तत्त्वापासून निर्मित असून विनाशी, नश्वर, क्षर देहासाठी आहे. युद्ध करणे हा क्षत्रियाचा स्वधर्म. तो विसरून युद्धानंतरचे भीषण परिणाम तो भगवंताला सांगतो. मनुष्य एकदा मोहग्रस्त झाला, की आपल्या नैष्कर्म्याला सुविचारांची वस्त्रे नेसवू लागतो. मी मारणार, माझे आप्त मरणार हे विचार माझेपणाच्या अहंकारातून उद्‌भवणाऱ्या अज्ञानीपणाचे लक्षण होय. गुरूजनांना आणि आप्तांना मारून सुख भोगण्यापेक्षा संन्यास स्वीकारून भिक्षा मागणे योग्य असेही त्याला वाटते.

अर्जुनाने विचारात घेतलेल्या गोष्टी पाहिल्यातर लक्षात येते की तो सुसंस्कृत होता. भिक्षा मागून जगण्याची त्याची वृत्ती अनासक्ती दर्शविते. परंतु अर्जुनाचे हे विचार वरवरचे आहे. शरीरात वास करणाऱ्या नित्य शुद्ध मुक्त पुरुषाची त्याला कल्पना नसावी असे वाटते. कुटुंबीयांना वाचविण्याची प्रबळ इच्छा मनातील गोंधळाला कारणीभूत आहे हे तो समजला. त्या गोंधळातून सुटण्यासाठी, समस्येची उकल करण्यासाठी 'शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम' म्हणून भगवंताला शरण आला आहे. अर्जुनाने शिष्यत्व पत्करल्यानंतर श्रीकृष्णाने तत्काळ गुरूची भूमिका स्वीकारली. देहात वास करणाऱ्या नित्यशुद्ध मुक्त पुरुषाचे रूप त्याला स्पष्टपणे सांगितले.

देही नित्यमवध्योऽयं देहे सर्वस्य भारत
तस्मात्सर्वाणि भूतानि न त्वं शोचितुमर्हसि ॥

पुरुष प्रकृती संयोगाने सृष्टी उत्पन्न होते. मुमुक्षु पुरुषाला मोक्ष प्राप्त करून देण्याचे कार्य प्रकृतीचे असते. शरीरात राहणारा हा पुरुष कधीही ठार मारला जाऊ शकत नाही. हा पुरुष म्हणजे शरीरातील चैतन्यतत्त्व होय. शरीर जड असून चैतन्यसत्तेच्या योगाने देहाचे चलनवलन होते. मन, बुद्धी, अहंकार हेसुद्धा देहाशीच निगडित असलेले विकार होत. देहस्थ अज्ञानाने मनुष्य इंद्रियाधीन होऊन सुखदुःखादी द्वंद्वाचा अनुभव घेतो. सुख मृगजळासारखे असले तरीही सुखासाठी मनुष्याची धडपड सुरू असते. या द्वंद्वातून जीवाला मुक्त करण्याकरिता जे गुह्यज्ञान भगवंतानी अर्जुनाला सांगितले तेच सांख्य होय.



अर्जुनाच्या डोळ्यांवर मनावर मोहाची झापड आली आहे ती दूर करण्यासाठी गीतेच्या प्रारंभाला सुरवात सांख्यतत्त्व-ज्ञानापासूनच केली. ज्ञानेश्वर माऊली लिहितात, "तू एक वधिता । आणि सकळ लोकु हा मरता । ऐसी भ्रांते झणे चित्ता । येवो देसी." देहातील त्या पुरुषतत्त्वाचा, आत्म्याचा तू वध करू शकणार आहेस का? आत्म्याचे नित्यत्व, दुसरा देह धारण करण्याची त्या चैतन्याची सहजप्रवृत्ती सांगण्यासाठी दिलेले सुंदर उदाहरण सर्वांना माहीतच आहे. 'वासांसि जीर्णानि यथा विहाय नवनि गृह्णाति नरोपराणि । तथा शरीराणि विहाय जीर्णान्यनानि संयाति नवनि देही ।।

देहाच्या मृत्यूनंतर जीवात्मा पोशाखाप्रमाणे देह बदलतो. बुडणाऱ्या मनुष्याच्या कपड्यांबद्दल हळहळ वाटणे जेवढे मूर्खपणाचे, तेवढेच देहरूपी वस्त्राचा नाश होण्याची चिंता करणे अज्ञानीपणाचे लक्षण होय.

चैतन्य हा सांख्याचा पुरुष आणि प्रकृती उपाधी होय. दोन्ही नित्य, अविनाशी आहेत. विनाशी आणि अनित्य देहाशी पुरुष एक्य करतो म्हणून देहनाशाबरोबर अजन्मा, शाश्वत अव्यय पुरुष नष्ट होतो अशी अज्ञानाने भ्रांती होते. सांख्यांच्या मते अव्यक्त जड प्रकृतीत जग अव्यक्त रूपात आहेच. प्रवृत्ती पुरुष संयोगाने दृश्यात अभिव्यक्त होते. सत् असा परमात्मा सर्व पदार्थांचे उत्पत्तिस्थान आहे. त्यामुळे सर्व जड चैतन्य त्याची सत्कार्योत्पत्ती असून सर्व जीवांचे तो उत्पत्ती स्थान आहे. सर्व जीवांच्या ठायी या सत्चा अंश असला तरी जीवात्मा गौण आहे. हे समजण्यासाठीच सांख्यशास्त्र आणि गीतेचे प्रयोजन.

नैनं छिन्दानी शस्त्राणि नैनं दहति पावकः ।
न चैन क्लेदयन्त्यापो न शोषयति मारुतः ॥

पुरुषाचे रूप असे कर्मकर्तृत्वविरहित आहे. पूर्ण जगत प्रथम अव्यक्त दशेत असते. मग व्यक्त दशेत आणि पुन्हा अव्यक्त दशेला प्राप्त होते.

वाट्याला आलेले विहित कर्म इश्वराज्ञा समजून करावे. सात्त्विक स्वधर्माचरणाने मनुष्य सुख दुःख, लाभ-हानी, जय पराजय या द्वंद्वापलीकडे जातो. ही द्वंद्वे मनाच्या वृत्ती आहेत. या वृत्तींशी एकरूप झाल्याने मी सुखी, मी दुःखी असे वाटू लागते. आत्मानात्मविवेक ज्याला साधतो तो या वृत्तींशी एकरूप न होता साक्षीभावाने वाट्याला आलेले कर्म करतो. यालाच 'समत्वं योग उच्यते' म्हणतात. क्षत्रियाचे स्वधर्माचरण युद्ध करणे, म्हणून अर्जुना युद्धाकरिता युद्ध कर' ऐसेया मने होआवे । परि दोसु न घडे स्वभावे । म्हणोनि आता झुंजावे । निभ्रांत तुवा ॥

शरीर आणि जीवात्मा यांचे पृथक्करणात्मक वर्णन गीतेतील सांख्यात भगवंतांनी अर्जुनाला सांगितले. अर्जुन ज्या परिस्थितीत सापडला आहे, ती परिस्थिती प्रत्येकाच्या जीवनात येते. मनुष्याचे मनच कुरुक्षेत्र आहे. मनाची द्विधा अवस्था, भावना आणि कर्तव्यकठोरता यामधील ताणतणावांचे विवेचन गीता होय. अर्जुनाच्या समोर जी समस्या उभी आहे त्या समस्येचे उत्तर भगवंतांनी दिले असे म्हणण्यापेक्षा समस्येकडे पाहण्याचा दृष्टिकोन बदलण्याचे सामर्थ्य या सांख्यज्ञानातून त्यांनी अर्जुनाला दिले.

*सौ. ज्योती प्र. जांभोरकर*
*४५, श्रीरामनगर, नागपूर २५.*



# झेप

भीती नको धरू अपयश येता, यश ते उभे पुढे
धैर्याने दे झुंज सदा ती, येईल ते बापुडे,
यश अपयश हे असति सोबती तुझ्या जीवनाचे
सोबत त्यांची कधी सुटेना कर्म करीत जा तुझे,
जा तू अपुला मार्ग धरूनि घेता साक्ष मनाची
नसेच भीती तुला कधीही यश अपयशाची,
यशकिर्तीची हाव नको ती साधण्यास कर्म
कर्म करीत जा धर्म मानुनि कळे तुला ते वर्म,
अपयश येता कधी न खचता झेप घेइ तो पुढे
यश कीर्तीचा हार फुलांचा गळ्यात त्याच्या पडे,
पण धुंदी यशाची मद्य असे ती कैफ चढवते फार
त्या मद्याला दूर सारती तेच खरे थोर;-

***श्री. के. एन. रिसबुड***
*जी. १७, राजश्री शाहू सोसायटी,*
*पुणे-सातारा रोड, पुणे - ४११ ०३७*

# भक्ती

**ह. भ. प. वामनबुवा प्रल्हादशास्त्री भट**

भगवत् भाव सर्वाभूती ।। या नाव माझी भक्ति

हेचि भजन ज्यासी अनहंकृती ।। विज्ञानप्राप्ती ते त्यासी एकनाथी भागवत (३९९)

सुख दुःख उद्वेग चिंता ।। अथवा आनंदरुप असतां

नामस्मरणेविण सर्वथा । राहोच नये ।। श्रीराम ।। ४/३/४

जीव व ब्रह्म एकच न मानिता अग्नीच्या ठिणग्यांप्रमाणे जीव हे ईश्वराचे अंश आहेत. मायात्मक जगत् मिथ्या नसून माया ही एक परमेश्वराच्या इच्छेने ईश्वरापासून विभक्त झालेली शक्ती आहे आणि माया परतंत्र झालेल्या जीवास मोक्ष प्राप्तर्थ्य लागणारे ज्ञान ईश्वरानुग्रहाखेरीज होणे शक्य नसल्यामुळे भगवत भक्ती हेच काय ते मोक्षाचे साधन आहे. "सर्वधर्म सोडून मला एकट्याच शरण ये" असा भगवंतानी उपदेश केला आहे. (सर्वधर्मान परित्यज्य मामेकं शरणं व्रज)

ब्रह्मात्मैक्यरूप मोक्ष प्राप्त होण्यास जी अनेक साधने आहेत. त्यांपैकी भक्तिमार्ग हे साधन अत्यंत सुलभ आहे. श्रवण, कीर्तन, विष्णोस्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य, आत्मनिवेदन हे भक्तीचे नऊ प्रकार आहेत. भागवतात प्रल्हादमुखाने भक्तीचे वरील प्रकार सांगितले आहेत.

हरिकथा निरूपण, अध्यात्म निरूपण, पुराण श्रवण ही श्रवण भक्ती आहे. परमात्मा सगुण निर्गुण उभयरूप असल्यामुळे सगुण लीला ऐकाव्यात, अध्यात्म ऐकावे.

कर्ममार्ग - उपासना मार्ग-ज्ञानमार्ग-गुरूभक्तीमार्ग-योगमार्ग-वैराग्यमार्ग हे सर्व ऐकावे. अनेक व्रतांचे, तीर्थाचे, दानाचे महत्त्व ऐकत असावे. विज्ञान-तत्त्वज्ञान-भूगोल रचना नानाविध ग्रंथ ब्रह्मदेवांची स्थाने, नवखंडे-चौदा भुवने यांची वर्णने ऐकावीत. नवविधा भक्ती कोणती, चतुर्विधा मुक्ती कोणती-उत्तम गती कोणती- हे सर्व ऐकून घ्यावे, पिंड ब्रह्मांड रचना नाना तत्त्वांचा विचार, सारासार असे जे ब्रह्ममाया निरूपण – मोक्षप्राप्तीचा उपाय हे सर्व माहीत असावे. वेद-शास्त्रे, पुराणे, वेदांच्या निरसनाचे प्रकार ऐकावेत. हे सर्व काही ऐकावे. परंतु त्यातील सार शोधून घ्यावे व असार जाणून त्यागावे. विभक्ती सोडून भक्तीचे मूळ शोधावे, ती श्रवण भक्ती. भगवत भजनाचा दुसरा प्रकार.

म्हणोनी कीर्तनाचा अगाध महिमा ।।

कीर्तने संतोषे परमात्मा ।।

सकल तीर्थे आणि जगदात्मा ।। कीर्तनी वसे ।। ४/३/३१

सगुण हरी कथा करावी-भगवंताची कीर्ती वाढवावी-नित्य नवा अभ्यास करून कीर्तन साहित्य संपादून-हरी कीर्तनाने ब्रह्मांड भरून टाकावे, कीर्तनाची आवड धरावी, कीर्तनाने परमात्मा संतुष्ट होतो. त्यामुळे सर्वांचा श्रवण भक्तीने उद्धार करता येतो.

देवाचे सुंदर रूप वर्णावे-यश, कीर्ती प्रताप महिमा वर्णावा-सर्व भक्तांना सुखाने डौलवावे, चित्तातील भ्रम दूर करावा. श्रोत्यांना तन्मय करावे, पदे-दोहरे, श्लोक-प्रबंध इ काव्यरचना म्हणावी. अनेक रसांचा परिदोष करावा. भक्तिज्ञान वैराग्याची लक्षणे सांगावी अध्यात्म निरूपण करून माया ब्रह्माचे विवरण करून अवघ्यांना वेदपरायण, बहुश्रुत करावे. आत्मबुद्धीचा निश्चय सापडल्याने श्रोते-वक्ते निःसंदेह होतात. कीर्तनाने परमात्मा संतुष्ट होतो. वक्तृत्वाचा अधिकार फार मोठा आहे. त्यामुळे सर्व अध्यात्म स्पष्ट, संदेहरहित प्रासादिक बोलावे-ब्रह्ममोल कीर्तनी रंगवावा उपासना व गुरूपरंपरा राखावी.

स्मरण देवाचे करावे । अखंड नाम जपत जावे ।।

नाम स्मरणे पावावे ।। समाधान ।। ४/३/२

तिसरी नामभक्ती म्हणून वर्णिली आहे. देवाची अनंत नामे आहेत. त्यांच्या सहस्र नामांपैकी कोणत्याही एका नामाचा जप केला तरी सार्थक होते. दुसरे कोणतेही साधन न करताही नामस्मरणाने परमेश्वर संतुष्ट होतो. नामस्मरणाचा महिमा अगाध आहे. स्वभक्तांचा सांभाळ परमेश्वर त्यांचा धावा ऐकून करीतो. चारही वर्णाच्या सर्व लोकांस नामस्मरणाचा अधिकार आहे.

पादसेवन चौथी भक्ति ।। पावन करीतसे त्रिजगती

जये करिता सायुज्य मुक्ति ।। साधकास होती ।। ४/५/१५

व्यक्तीची उपासना श्रेष्ठ की अव्यक्तोपासना श्रेष्ठ हा वाद न घालता भगवंताचे ठायी चित्त स्थिर करण्याचा अभ्यास, ज्ञान, ध्यान इ. उपायांनी वाढतो.

पूर्ण माझे भक्तिचा पार-मजही न कळे साचार

यालागी मी भक्ताचा आज्ञाधार ।। नुलंधी उत्तर सर्वथा ।।

पादसेवन भक्तीत कायेने, वाचेने सद्गुरूचरणाची मोक्षप्राप्त्यर्थ सेवा करता येते. त्यामुळे आत्मनिवेदन, विदेही स्थिती, अलिप्तपणा, सहजावस्था उन्मनी, विज्ञान इत्यादी समाधान म्हणजे विदेहस्थिती दाखविणारी संकेतस्थाने दिसून येतात. यात गुह्य उकलते म्हणून यास गुरूगम्य मार्ग म्हणतात. म्हणून सन्मार्ग कळण्यासाठी सत्संग धरावा. संत-सज्जनांचे ठायी हरी भजनोपाय सापडतो. म्हणून यांच्या ठायी श्रद्धा ठेवून त्यांची सेवा करावयास पाहिजे.

पाचवी अर्चन भक्ती यात ईश्वराच्या पूजेबरोबर देवालये-वनोपवने, पुष्पवाटिका, पर्णशाळा इ. स्थापना असून त्यांत भक्त-भाविकांचे समुदाय मिळवून महोत्सव करावे व भगवंताचे गुणानुवाद सद्भावे गावे.

देव-साधुसंत-सज्जन यांना वंदन करावे-ही सहावी भक्ती.

अनन्यपणे, निष्कपटपणे, अहंकारविरहित केलेल्या नमस्काराने दोषांचे डोंगर भस्मसात होतात.

सातव्या दास्य भक्तीने देवाचे वैभव वाढवावे, सख्य भक्तीने देवाशी परम सख्य करावे आपण मिथ्या असून देव सत्य आहे व देव भक्तांचा अभेद आहे, या म्हणण्याचे रहस्य आत्मनिवेदनभक्तीने उघडते.

संसार तरणोपायी । हेची एक मुख्य पाही ॥
मोक्ष लागे इच्छापायी ॥ इतर साधने काय बापुडी ॥ १४/५२

ह. भ. प. वामनबुवा प्रल्हादशास्त्री भट
कीर्तनाचार्य, कीर्तनरत्न (सिन्नरकर महाराज)
तुलसी सोसायटी, ए ब्लॉक नं. ९,
पारिजात नगर, नासिक नं. ४२२ ००५.

## ज्योतिष कणिका

**'ज्ञान'**

पत्रिकेत बसला होता ।
'चित्रा' नक्षत्री बुध ।।
भाषा अन् गणिताचे ।
ज्ञानही होते अगाध ।।

**'व्यवहारी'**

माणूस तसा व्यावहारी ।
शास्त्रीय अभ्यास होता ।।
पत्रिकेत चंद्राला ।
मृगनक्षत्री मान होता ।।

**'बौद्धिकता'**

छापखाना अन् स्टेशनरी ।
तत्सम धंदेच बरे ।।
मृग नक्षत्री गुरूचे ।
बौद्धिक अधिष्ठान खरे ।।

**'चंचलता'**

उत्तम असते ग्रहणशक्ति ।
तरीही चंचलता येते ।।
'मृग' नक्षत्री रविचे ।
असेच फल मिळते ।।

**'मायावी'**

माणूस मोठा थापेबाज ।
पण मायावी असतो ।।
'मृग' नक्षत्री मंगळ ।
'मेकॅनिकल' लाईन देतो ।।


पंडित हिंगे,
अमरबाग, गाडीतळ-हडपसर,पुणे-२८.

## अभंग

नाही माझी ती थोरवी
यावे तुक्याचे विमान
माझ्या अभंगाचा चरण
व्हावा तुझे पायी ॥

नाही माझी ती पुण्याई
यावा गळी तुझा हार
महाद्वारीचा महार
व्हावे पांडुरंगा ॥

नाही भाग्य चालण्याचे
धरुनिया तुझे बोट
तुझ्या पायातली वीट
देवा माझी व्हावी ॥

नाही माझी थोर भक्ती
यावा बहरुनी मळा
संतासंगे हा सोहळा
यावे फुल उंबरासी ॥

नाही नामात भुलूनी
मळली मी कधी माती
आता सजीव ही मूर्ती
तुझ्या हातुन घडावी ॥

नाही नाही देवा काही
माझे पसाय मागणे
गावे सावळे मी गाणे
मनी भीमा प्रगटावी ॥

**विलास सूर्यकांत अत्रे**

# श्री सद्‌गुरवे नमः

सौ. शैलजा जोशी

मज हृदयी सद्‌गुरू । जेणे तारिलो हा संसारपुरु ।
म्हणौनि विशेषे अत्यादरु । विवेकावरी ।। (अ. १. २१)

ज्ञानेश्वरीतील या ओवीत सद्‌गुरूचा महिमा किती यथार्थतेने वर्णिला आहे! ती ओवी वाचताच तिचा अर्थ मनात पालवत जातो. हृदयात स्थान दिलेल्या सद्‌गुरूच्या सान्निध्यानेच ह्या संसारपुरातून बाहेर पडता येते. पैल किनारा गाठता येतो. लोभ, मोह, माया, संभ्रम, हव्यास, लोकेष्णा, अहंकार, सुखदुःख रूपातील संसारपुरात बुडून जात असताना सद्‌गुरू त्या मायापुरातून बाहेर काढतो. ज्ञानाची दृष्टी देतो. आत्म्याची सत्ता कोणती हे सत्य आकलून येते. परमेश्वरी चैतन्य, ब्रह्म याच्या भेटीत जीवनाचे अंतिम हित आहे ही यथार्थतेने जगण्याची दिशा मिळते. परमार्थ आणि ऐहिक तथाकथित सुख यातलं काय निवडावं यातला राजहंसी विवेक येतो. तो परिसस्पर्शच असतो.

सद्‌गुरूचा महिमा काय वर्णावा? 'खरं तर काय वानु आता, न पुरे ही वाणी' अशी अवस्था होते. सद्‌गुरू सान्निध्यातच सुखसमाधान शांतीच्या वाटा गवसतात. जीवन उजळते. अंतरीचा दिवा प्रकाशतो. जीवीचा विसावा भेटतो. अंतरातील चैतन्याला जाग येते. शाश्वताचे धागे उलगडत जातात. चिदानंदात तल्लीनता येते. ॐ काराचे बीज अंकुरते. मनाच्या लतेला शांतीची पालवी फुटते. कैवल्याचे चांदणे भेटते.

त्यासाठी सद्‌गुरू भेटावा लागतो. गुरू समर्थ असावा लागतो. म्हणूनच गुरूंचे स्तर आहेत ते लक्षात घ्यावे लागतात. समाजात तथाकथित गुरू असतात. ते लोकांना फसवितात. बुवाबाजीवर ताशेरे झाडले जातात. अशा तथाकथित गुरूपासून सावध राहावे लागते. समाजात लोकांचे उद्धार करणारे, लोकांना सन्मार्ग दाखवणारे सद्‌गुरूही असतात. त्यांचे सान्निध्यही हितावह असते. या दृष्टिकोनातूनच गुरूंचे स्तर जाणावे लागतात.

पहिल्या प्रकारचे गुरू अत्यंत स्वार्थी असतात. ते स्वतःला गुरू म्हणवून घेतात. स्वतःचा उदो उदो करतात. ते फसवे असतात. डामडौल, दिखाऊ झगमगाट व प्रदर्शन यांनी लोकांना आकर्षून घेतात. लोकांच्या अंधश्रद्धेचा, भोळसटपणाचा, अगतिकपणाचा फायदा घेऊन त्यांना लुबाडतात, आपलं भोक्तृत्व पुरे करून घेतात.

दुसऱ्या प्रकारचे गुरूही स्वार्थानेच आपल्याला गुरू म्हणवून घेतात. त्यांना काही सिद्धी प्राप्त झालेल्या असतात. त्या सिद्धीच्या बळावर ते चमत्कार करतात. लोक त्यांच्या नादी लागतात. हे गुरू अहंकारी असतात. स्वतःचे स्तोम माजवतात. स्वतःच्या चैनीसाठी, विलासासाठी त्या सिद्धीचा दुरुपयोग करतात. लोकांचे पैसे लुबाडताना तिळमात्रसुद्धा लोकोद्धाराचा हेतू त्यांच्या मनात नसतो.

तिसऱ्या प्रकारचे गुरू गुरू म्हणवून घेण्यास उत्सुक असतात. त्यांचा भर ग्रंथवाचनावर असतो. पण त्यांना जे आध्यात्मिक वाचलेलं असतं ते त्यांना आत्मसात झालेलं नसतं. ते ज्ञान पोपटपंचीने, थोर पुरुषांची वचनं उद्‌धृत करून लोकांना सांगतात. पांडित्याचा त्यांना अभिमान असतो. आपल्या विद्वत्तेच्या देखाव्याने सर्वांनी गुरू म्हणावे असे वातावरण ते निर्माण करतात. पण आध्यात्मिक दृष्टीने त्यांना काहीही साध्य झालेले नसते. त्या दृष्टीने ते सामान्य पातळीवरच असतात.

खरा गुरू हा सद्‌गुरू असतो. तो परमात्म्याच्या असणेपणात असतो. तो मूळ परमेश्वर शक्तीच्या केंद्राशी निगडित असतो. त्या आनंदात तो मग्न असतो. आध्यात्मिक अनुभूतींनी तो विश्वात्मक झालेला असतो. 'विश्व हेचि माझे घर' अशी त्याची मती स्थिर झालेली असते. त्याला लौकिक, कीर्ती, प्रतिष्ठा कशाचीही आसक्ती नसते. द्रष्टेपणाने तो लोकोद्धार करतो. 'अवघाची संसार सुखाचा करीन, आनंदे भरीन तिन्ही लोक' असा ब्रह्मज्ञानाने लोकांचा उद्धार करण्याची त्याची तळमळ असते.

तो खरा असामान्य, अलौकिक व दिव्य असतो. आत्मसाक्षात्कारी असतो. आत्मानंदाची अमृतमय माधुरी त्याने चाखलेली असते. 'आता उरलो उपकारापुरता' हेच त्याच्या आयुष्याचे व्रत असते. सामान्यात सामान्यपणे राहून त्यांच्या भावना जाणून, त्यांच्यात समरस होऊन तो लोकोद्धार करतो.

अर्भकासाठी । पंते हाती धरिली पाटी ।।
तैसे संत जगी । क्रिया करूनी दाविती अंगी ।।
बालकाचे चाली । मात जाणुनि पाऊल घाली ।।
तुका म्हणजे नाव । जनासाठी उदकी ठाव ।।

अशा प्रकारे लोकोद्धारासाठीच सद्‌गुरूची जीवनगंगा वाहत असते. लोकांसाठीच ते या संसारात असतात. लोकांसाठीच त्यांनी आपली नाव भवसागरात घातलेली असते.

सद्‌गुरूचे सान्निध्यही चैतन्यदायी व आनंददायी असते आणि प्रत्ययकारी असते. सूर्यदर्शनाने माणूस उल्हसित होतो. पुनवेच्या चंद्रदर्शनाने आनंदित होतो. तसाच गुरूसान्निध्याचा परिणाम असतो. अशा वेळी सद्‌गुरूचैतन्य व भक्तांचे चैतन्य यांचा समन्वय होतो. न

बोलता 'शब्दाविण संवादिजे असाच संवाद होतो, चिदानंद भेटतो, शांती मिळते. परमेश्वरी शक्ती उराउरी भेटते.

सद्‌गुरू सान्निध्यात भक्त असला की त्याच्या वृत्ती क्षय पावत नाहीत. पण स्वस्थ होतात. एखादी वृत्ती उभी राहिली तरी ती लगेच निवळते. भक्त काही विचारीत नाही, गुरू काही सांगत नाही. ही मौनाचीच भाषा असते. सतारीचे सूर वाजले की तरफेच्या तारा वाजू लागतात. तसाच हा समन्वय घडून येतो.

भक्तामध्ये सुप्तावस्थेत अध्यात्म असते. दैवी शक्ती व दैवी गुण असतात ते सद्‌गुरूसान्निध्यात हळूहळू वाढायला लागतात. वर्षानुवर्षे ज्या ऐहिक संस्कारांना भक्त चिकटून बसलेला असतो ते संस्कार गुरूसान्निध्यात बाजूला व्हायला लागतात आणि भक्तात असलेले दैवी शक्ती व दैवी गुण त्याच्या अंगात मुरायला लागतात. हे सर्व सहज घडते.

सद्‌गुरू भक्ताला मंत्र देतो त्या वेळी त्यांच्या संवेदना असतात. शक्ती असते, लहरी असतात, त्या भक्तामध्ये संक्रमित होतात. त्या मंत्राचे अक्षर भक्ताने उच्चारल्यावर त्या शक्तीचा परिणाम होतो.

सद्‌गुरू आध्यात्मिक अनुभवाने युक्त असतात. भक्ताची त्या दृष्टीने प्रगती व्हावी या दृष्टीने ते अनुग्रह करतात. प्राणाहूती देत असतात. हा अनुग्रह सद्‌गुरूच्या दृष्टीनेही होतो. भक्त एका विशिष्ठ अनुभूतीवर आला आणि सद्‌गुरू ट्रान्समध्ये असले की त्यांच्या कृपादृष्टीने भक्तांची स्थिती सद्‌गुरूसारखी होते. 'आपणासारखे करिती तात्काळ' असे म्हटलेलेच आहे. भक्तांनाही आत्मनंदाची अनुभूती मिळते. 'आनंदाचे डोही आनंद तरंग' अशी त्याची अवस्था होते. व्यवहारात वागतानाही भक्तांचे मन, बुद्धी, चित्त ऐहिक सुखाच्या मागे सैरावैरा धावत नाही. वळवाच्या सरीप्रमाणे वृत्ती उभी राहते आणि झटदिशी जाते, असा भक्ताला अनुभव येतो.

भक्तावर अनुग्रह करत असतानाही मी काही विशेष करतो अशी सद्‌गुरूंची भावना नसते. नदीचे पाणी संथगतीने वाहत असते, तशाच गतीने सावकाश सद्‌गुरू अनुग्रह करीत असतात आणि भक्ताला आपल्यात बदल होत आहे, याची जाणीव होत राहते.

सद्‌गुरू भक्ताच्या भावना परमेश्वराच्या बाजूला म्हणजेच मूळ स्रोताकडे-ब्रह्माकडे-आत्मानंदाकडे वळवतो. त्याच्या जीवनप्रवाहालाच वळण देतो. या मूळस्रोताशी भक्ताचा मिलाप झाला, की द्वैत सरते. मी तू पण सरते. भक्त मूळ स्त्रोताशी एकरूपतो. मग परतणे नसतेच. बिंदू सिंधूत मिळतो. नदी सागरात एकरूपते. तसेच घडते. पण यासाठी भक्ताची ज्ञानेंद्रिये व कर्मेंद्रिये ह्यांना स्वस्थता यावी लागते. ते कार्यही सद्‌गुरू करतो.

सद्‌गुरू भक्तामध्ये असलेले सत्त्व-रज-तम गुण सम करतो. त्यासाठी सद्‌गुरू प्रत्येक गुणाला एक कंगोरा करतो. मग तिन्ही गुण एकत्र येतात. शंभर टक्के पूर्णत्व येते. एका फळीला खाच काढली की दुसरी फळी त्यात चपखल बसते. एका विशिष्ट जास्त प्रमाणात असलेल्या भक्ताच्या गुणाला सद्‌गुरू खाच काढतो. उदा. एखादा भक्त तापट आहे तर सद्‌गुरू तमोगुणाला खाच काढतो. व त्याला सत्त्व व रजोगुण जोडतो. हे जोडून तयार झालेल्या गुणात हे तिन्ही गुण असतात, पण ते सम झालेले असतात.

सद्‌गुरूने भक्ताच्या डोक्यावर हात ठेवला म्हणजे भक्ताला पूर्ण संवेदना होतात. त्यासाठी सद्‌गुरू त्या संवेदना भक्ताच्या मनाच्या कक्षेत आणतो. भक्ताचे मन ज्ञान मिळवायचे म्हणून प्रत्येक गोष्टीमागे सैरावैरा धावत असते. सद्‌गुरू हे सर्व भक्ताच्या मनातून बाजूला सारतो. त्याच्या मनावर आत्मानुभूतीचा प्रकाश पाडतो. फोटो काढताना नुसते झाकण काढले की आत चित्र उमटते. तसेच घडते. भक्ताचे सैरावैरा धावणे बाजूला काढले की त्याच्या मनावर आत्मानुभूतीचा प्रकाश पडतो.

नामाच्या तीन तऱ्हा आहेत. वैखरी, मध्यमा आणि पश्यन्ती वाणी. मध्ये नाम असते. सद्‌गुरू भक्ताच्या पश्यन्तीमध्ये नाम सुरू करतो. जगात वावरताना झालेल्या ऐहिक संस्कारामुळे माणूस बद्ध असतो. सद्‌गुरू त्याला जोरदार वळण देतो. सद्‌गुरू त्याच्या सिद्ध शक्तीची सबंध ताकद केंद्रित करून जेव्हा अनुग्रह करतो तेव्हा भक्ताच्या पश्यन्तिवाणीमध्ये नाम चालू होते. ते अखंड असते. सद्‌गुरू भक्तात शक्ती संक्रमित करतो.

सद्‌गुरू भक्ताला प्रत्येक गोष्ट सांगत नाही. एकदम सरळ अनुभव देतो. काहीतरी वेगळं घडतय, हे भक्तांच्या लक्षात येतं. ज्या वेळी भक्ताची कुंडलिनी खाली उतरते त्या वेळी पुढच्या बाजूने विशुद्धापासून स्वाधिष्ठानाशी आल्यावर ती स्थिर होते. जसजशी ती कुंडलिनी हळूहळू खाली जाते तसतसा भक्त सर्व विश्वात एकदम उभा राहतो. तो भक्त space मध्ये असतो. म्हणजेच आकाशात असतो. भक्त अवकाशातून आकाशात गेल्यावर त्याचे सैरावैरा पळणारे मन स्थिर होते. मीपणा नाहीसा होतो. तो भक्त मूळ स्रोताशी एकरूप होतो. त्या स्रोताशी त्याचे अद्वैत घडते.

सद्‌गुरू आपल्याला पाहिजे तसा शिष्य शोधण्याच्या प्रयत्नात असतो. एका विशिष्ट पातळीवर आलेला मनुष्य त्यांनी पाहिला की सद्‌गुरूला आनंद होतो. सद्‌गुरूचा त्या माणसावर प्रभाव पडतो आणि तो माणूस त्याच्याकडे येऊ लागतो. चोवीस तास अष्टौप्रहर सद्‌गुरूचं त्याच्यावर अवधान असतं. कुंभारणीने अळी ठेवलेली असते. ती अळी भोवती गरगर फिरत असते. त्यामुळे ती अळी कुंभारीण होते. ती अळी फुलपाखरू होऊन उडायला लागते. इतकी तिच्यात प्रगती होते. तशी प्रगती सद्‌गुरू शिष्याची करतो. पण ते शिष्य सद्‌गुरूंच्या अवधानात अडकलेला असतो. पण ते त्या शिष्यांना कळत नाही. त्या शिष्याला सद्‌गुरूंचे सतत स्मरण होते. सद्‌गुरू आपले गुण शिष्यामध्ये प्रकर्षाने यायला पाहिजेत यासाठी सतत जागरूक असतो.

मूळ स्रोतापासून मनुष्य येतो आणि परत त्याला मूळ स्रोताकडे जायचे असते. हा परतीचा प्रवास सद्‌गुरूमुळे त्या भक्ताचा होऊ शकतो. मूळ स्रोताची सात वर्तुळे असतात. सद्‌गुरू त्या सप्तवर्तुळातून भक्ताला आणतो. जास्तीत जास्त पाचव्या वर्तुळापर्यंत सद्‌गुरू भक्ताला नेतो.

मनुष्य हा सत्त्व-रज-तम (उत्पत्ती, स्थिती, लय) या तीन परिमितीमध्ये हीच पहिली तीन वर्तुळं असतात. मनुष्य जेव्हा चवथ्या वर्तुळात जातो तेव्हा त्याला तीन वर्तुळांमधील सर्वकाही कळतं. त्या वेळी वृत्ती बहिर्मुख असतात. त्या काहीशा अंतर्मुख होतात. मनुष्य पाचव्या वर्तुळात गेला, की चौथ्या वर्तुळातील सर्वकाही कळतं. त्या मुनष्याला वस्तू अंतर्बाह्य दिसू लागतात. मनुष्य सहाव्या वर्तुळात गेला की आपणच सगळे करीत आहोत हे त्याला जाणवते. स्रोताच्या तो एवढा जवळ गेलेला असतो की त्याच्या हातून निर्मिती घडावयास लागते. मनुष्य सातव्या वर्तुळात म्हणजेच मूळ स्रोतामध्ये आल्यावर भक्तामध्ये असलेली गतिमानता व विश्वामध्ये असलेली गतिमानता जाऊन स्थिरत्व येतं. अशा वेळी भक्त सहजस्थितीत येतो. नुसते असणेपण असते. तिथे काही राहत नाही. नुसते 'तम' असते. मिळालेले ज्ञानसुद्धा अज्ञान होते. काही जागेवर नाही असे नेणतेपण येते. सद्गुरूशी तद्रूपता येते. अशा प्रकारे सद्गुरू परतीच्या वाटेवर भक्ताला नेऊन सोडतो.

हे सगळं सद्गुरू करू शकतो. सद्गुरू नुसता परमेश्वराजवळ पोहोचलेला असतो असे नव्हे. परमेश्वर करत असलेल्या गोष्टी (जे गृहीत धरले आहे त्या गोष्टी) सद्गुरू करतो. सद्गुरू परमेश्वराचे गुण आत्मसात करतो. त्यामुळे त्याच्या सहज बोलण्यातही एक द्रष्टेपण येते.

सद्गुरू सर्वे सर्वा असतो. दिवा लावताना काजळी काढली तरच वात पेटते. भक्ताची अज्ञानाची काजळी सद्गुरू काढतो. ज्ञानदीप लावतो. भक्ताची दृष्टी बहिर्मुख असते ती अंतर्मुख करतो. काचेतून भक्त बाहेरचे जग पाहतो. सद्गुरू काचेमागे पारा लावतो. आरशात भक्त स्वतःला पाहून भक्त अंतर्मुख होतो. स्वतःतल्या आत्म्याची ओळख करून घेतो. सद्गुरू भक्ताच्या वृत्तीत बदल घडवतो. वाल्मीकीचे उदा. सर्वश्रुतच आहे. सद्गुरू भक्ताच्या वृत्तीत नम्रता, संवेदनशीलता आणतो. भक्ताच्या वृत्ती समधा होतात. सुखदुःख समेकृत्वा अशी वृत्ती होते. त्याच्या अंतरातून सुखाचा झरा वाहतो. बाह्यावर सुख अवलंबून राहत नाही. वृत्तीत कालपत्री अलिप्तता येते. अर्थातच सद्गुरू भक्ताची कुवत जाणून सारं काही करतो.

भक्ताच्या चकोरल्या मनाला सद्गुरूच्या चैतन्य चांदण्याचे पारणे होते. सद्गुरूच्या चैतन्यमय सान्निध्यात भक्त शाश्वताचे धागेदोरे उकलू शकतो. भक्तमानसात अमृत लहरी लहरतात. मौन अर्थावते. शांती भेटते. संवाद जुळून येतो. आत्मानुभूती येते. अंतरीची खूण भक्ताला भेटते. इवलेसे पंख आकाश स्पर्शून जातात. अंतरात नीलिमा जागतो. निळी ज्योत तेवते. सोऽहम्‌चा संवाद घडतो. अशा अगाध, अपार सद्गुरूचा महिमा कसा वर्णावा? तो कसा आकळावा? शब्द चौकटीत ते धित् कसं साठवावं.

ज्ञानेश्वरांनी म्हटलंच आहे,

एवढे जिये महिमेचे करणे । ते वाचा बळे वानूं मी कवणे ।
का सूर्याचिया आंगा उटणे । लागत असे ?।
केऊता कल्पतरूवरी फुलौरा ?। कायसेन्ति पाहुणेरु क्षीरसागरा।
कवणे वासी कापुरा । सुवासु देवो ।
चंदनाते कायसेनि चर्चावे । अमृताते के उते रांधावे ।
गगनावरी उभवावे । घडे केवी ?।
तैसे श्री गुरूचे महिमान । आकळिते के असे साधन ?।
हे जाणोनिया मियां नमन । निवांत केले ॥

खरोखरच अशी अवस्था होते. मग संपूर्ण समर्पित भावाने सद्गुरूंना वंदन करावेसे वाटते. सद्गुरूंची अगाधता आकळत नाही. पाऊस कितीही बरसला तरी चातकाला थेंबच घेता येतो. तरीही त्या थेंबाने जीवनाला परिसस्पर्श होतो. प्रकाशाच्या वाटा उजळतात. चिदानंदाने वृत्ती आनंदित होते. जिवीचा जिव्हाळा भेटतो. उरी प्रकाशाचा 'ओम' प्रकटतो. भवसागरातून नाव पैलतीराला लागते.

म्हणूनच सद्गुरूच्या भेटीलागी अंतरात आस असते. 'चक्र वाक् पक्षी वियोगे वाहती, तैसे मजप्रती झाले आता' अशी अवस्था होते. सद्गुरू भेटीचीच भूक लागते. त्याला आर्त आतूर साद घालाविशी वाटते. सद्गुरूंना विनवावेसे वाटते.

तू माय मी लेकरू । मज नको अव्हेरु ।
बाळाचा हाकाऊ । ऐक आता ॥
मेघे व्यापले गगन । लोपले चंद्र किरण ।
तैसे माझे जीवन । झाले आता ॥
धावुनिया येई । आता लवलाही ॥
मेघाची ही फळी दूर करी ॥
पडू दे चांदणं । आसावले मन ।
मागावं का मागणं । असता तू माय ॥
तुजवीण कोण । मज भवतारण ॥
कासावीस प्राण । तरी अन्तराय ?
आणि म्हणूनच सद्गुरूवे नमः ॥

*परमपूज्य श्री. भाऊसाहेब आंबेकर महाराज यांच्या विचारांच्या आधारे.*

*सौ. शैलजा जोशी, एम्.ए. बी.एड्.*
*३१० सयश चेंबर्स, ११४९ सदाशिव पेठ,*
*पुणे ४११ ०३०.*

***ओवी ही विठ्ठल । विठ्ठल अभंग ।***
***शब्द ओळ अंग । विठ्ठल रे ॥***
***श्रवण विठ्ठल । विठ्ठल मनन ।***
***अनावी चिंतन । विठ्ठल रे ॥***
***मन हे विठ्ठल । विठ्ठल हा भाव ।***
***सहज स्वभाव । विठ्ठल रे ॥***
***विदेही म्हणावे । देहबुद्धी कोण? ।***
***विठ्ठल कारण । विठ्ठल रे ॥***

**विलास सूर्यकांत अत्रे**

# हिंदुत्वाची पताका

सौ. स्मिता आव्हाड

आज स्वामी विवेकानंदांच्या विश्वविजेत्या व्याख्यानाचे कार्यक्रमशतक साजरे करतोय. मला अतिशय आंनद वाटतो आहे की, एक शतक झाले तरी त्याचे पडसाद अजून सर्वत्र असे निनादताहेत की जणू ही आजचीच घटना आहे, आजच त्या योग्याने सर्व जगाच्या ह्रदयावर विजय मिळवला. हा विजय खरोखर अलौकिक आहे. लोक विजय मिळवतात ते युद्ध, रक्तपात, कपट, मानहानी, आक्रमण, एकमेकाचे हक्क हिरावून घेऊन. पण ह्या आमच्या थोर तपस्वीने तो एक केवळ प्रेमाच्या शब्दांनी 'जिंकला'. सर्व जग भरभरून ह्या योग्याची गौरवगाथा गाऊ लागले. सर्व लोक त्याचे गुणगान गाऊ लागले. काय होता तो मंत्र?

'My dear brothers and sisters' अन ह्या एका मंत्राने जग भारावले. टाळ्यांचा कडकडाट झाला. मोजून ५ मिनिटे दिली गेली ते किती वेळ बोलत राहिले अन मंत्रमुग्ध होऊन लोक कितीवेळ ऐकत राहिले ह्याचे भान नव्हते. जणू प्रेमाने दिव्यास्त्र सोडले होते. त्या दिव्य, सत्य, प्रेमाने सर्व जग जिंकण्याची किमया केली होती. जादू केली होती.

होतील कितीही योध्ये,
अन् झाले असतील
कितीही पण
प्रेमाने जग जिंकणारा
हा एकच वीर
स्वामी विवेकानंद

ते सत्य आजही सूर्य प्रकाशाप्रमाणे तळपत आहे. ते सत्य सांगणारी विभूतीही किती महान? किती तेजस्वी? किती थोर? किती आत्मनिष्ठ असेल? आजही त्या जादूभरल्या शब्दाने मन गहिवरून येतं, डोळे भरून येतात, ह्रदय कृतज्ञ होतं.

ते तेज किती जाज्वल्य होतं याच एक छोटंस उदा. सांगते. असेच एका पाश्चिमात्य महिलेने स्वामींना विचारले, 'रोमन संस्कृतीचे जसे अवशेष आढळतात तसे तुमच्या हिंदू धर्माचे कां नाही?' त्यांना तेजाने झळाळणारे शब्द ऐकू आले.

"ज्या संस्कृतीचा ऱ्हास होतो त्या संस्कृतीचे अवशेष आढळतात, आमचा हिंदू धर्म अजून चांगला जिवंत आहे, 'तेव्हा त्याचे अवशेष कसे आढळतील बरे?"

स्वामींनी सर्व धर्मीयांवर सारखेच प्रेम केले. कोणाला धर्म बदलायला सांगितले' नाही की नवीन पंथ निर्माण केला नाही. त्यांनी एकच आवाहन केले, माणूस प्राणी जिथे आहे तिथे हा सत्य-ज्ञानाचा धर्म झाला तर जगात शांतता आपोआपच नांदणार आहे, हा त्यांना विश्वास होता. म्हणूनच त्यांनी ज्ञानसत्र चालूच ठेवले, अपवाद घेतले स्वकीयांचे, अनेकांनी चिखलफेक केली त्यांच्यावर, चारित्र्यावर, वर्तणुकीवर. पण हा जराही विचलित झाला नाही. स्वकीयांनी दोष लावल्याची खंत वाटली ना? पण तिळभरच! कारण त्यांना माहीत होते, चिखलफेक करणारे कसे होते ते! स्वामी जिथे जिथे गेले तिथे त्यांनी प्रेमाने, स्नेहमय वर्तणुकीने सर्वांना आपलेसे केले. म्हणूनच शेकडो योजन दूर आपली मायभूमी सोडून लोक त्यांच्यासाठी येथे आले. भारत हीच त्यांनीही आपली कर्मभूमी मानली. त्याप्रमाणे कार्यही केले. त्याचे उदा. भगिनी निवेदिता.

स्वामींच्यामुळे जगात सर्वत्र हिंदू धर्मतत्त्वाला मान्यता मिळाली. पुन्हा एकदा जगात हिंदू धर्माची पतका फडकली. हिंदू धर्मतत्त्वाला सर्वत्र मान्यता मिळाली. पुन्हा एकदा जगात हिंदू धर्माबद्दल आदर, उत्सुकता, प्रेम, निर्माण झाले. भौतिकवादात पाश्चिमात्य देश कितीही पुढे गेलेले असोत, आध्यात्मिकात भारताशिवाय पर्याय नाही, हे त्रिवार सत्य त्यांना मान्य करावेच लागले. स्वामी म्हणत पूर्ण जग जिंकायला आजचा एकच योगी पुरेसा ठरेल.

जगात आपल्या धर्माला मान्यता मिळवून देताना त्यांना स्वकीयांबद्दल जराही विसर पडलेला नव्हता. दरिद्रीनारायणाची सेवा हे व्रत त्यांनी आजन्म स्वीकारलं. त्या महान विभूतीची मातृभूमी मात्र आज जातीय दंगलीनी, आपापसातल्या हेवादाव्यांनी छोट्या क्षुल्लक गोष्टींनी विदीर्ण झाली आहे. कुठे वसुदेव कुटुंबकमचा सिद्धांत अनुसरणारे स्वामी विवेकानंद अन् कुठे आजचा दळभद्री जाती व दंगली घडवणारा (हिंदू भारतीय समाज) क्षुद्र मानव?

आजची परिस्थिती बघितल्यावर वाटतं, ह्या देशात पुन्हा एकदा स्वामींनी जन्म घ्यावा अन् स्वधर्माची ओळख करून द्यावी. हे परमेश्वरा, ह्या युगातही धर्माला ग्लानी आली आहे तेव्हा वचन दिल्याप्रमाणे हे प्रभू पुन्हा अवतार घे. पुन्हा अवतार घे. पुन्हा अवतार घे.

*सौ. स्मिता आव्हाड*
*'श्री' कल्पना सोसायटी,*
*वॉर्ड नं. ७, श्रीरामपूर.*

# मानसपूजा

**सौ. मंदाकिनी भास्कर सोमण**

श्री ज्ञानोबारायांनी आपल्या ज्ञानेश्वरीत म्हटले आहे, देव पूजूनी पहावा, शेत पेरून पहावे, अर्थात् उखर जमीन पहाण्यापेक्षा हिरवे हिरवे शेत पहायला मनाला खूपच आनंद होतो. तसेच घरच्या देवाची पूजा करून पहायला फारच सात्विक आनंद होतो. देवाला पंचामृती स्नान घातलेले असावे, अत्तर लावलेले असावे, निरनिराळी रंगीबेरंगी सुगंधीत फुले अर्पण केलेली असावी. दरवळणारा मंद सुगंध, उदबत्तीचा वास, निरांजन, समईचा शांत, गंभीर आनंद देणारा प्रकाश, या साऱ्यांनी कसे मन प्रफुल्लित होऊन जाते आणि त्या पूजेकडे क्षणभर स्थिर होऊन जर पाहिले तर मनाला सात्विक आनंद मिळतो. मन काही काळ तिथे चिकटतेच आणि तेच दृश्य पुढे काही काळ मनावर ठसा उमटवून जाते.

पण एक गंमत आहे. कर्म म्हटले की त्यांत थोडासा अहंकार, थोडीशी अपेक्षा हे आलेच. म्हणून तर रामदास स्वामी म्हणतात ना, 'यथासांग ते कर्म काही घडेना । घडे कर्म ते पुण्य गाठी पडेना.' पूजा करताना आपले संपूर्ण लक्ष देवाकडे नसते. त्याला गंध उगाळले की नाही, आज फुले चांगली मिळालीच नाहीत, आज सोमवार बेलांचे पान हवे होते, निरांजनामध्ये वात चांगली बसलीच नाही, ह्या उदबत्तीचा सुगंध एवढा चांगला नाही, नाहीतर फारच चांगला आहे, आणि एखाद्या वेळेस पूजेची तयारी जर व्यवस्थित केली नसेल तर थोडाफार क्रोधही येतो. उपकरणे स्वच्छ नसतील तरी राग येतो. म्हणजे कारण काहीही असू दे. आपण पूजेकडे एक कर्म आणि ते मी करतो आहे आणि एक काम उरकून दुसऱ्याला मदत करतो आहे असे वाटते. दुसरे मी रोज पूजा करतो हा सूक्ष्म अहंकार आणि माझी पूजा चांगलीच होते, चांगली पूजा केली आहे असे म्हणावे ही अपेक्षा! हे काही नसेल तर ते एक इतर कर्मासारखे कर्म म्हणून उरकले जाते. त्यांत एकाग्रता, प्रेम हे साधारण बेताचेच असते आणि पूजेच्या वेळी मनात इतर अनंत विचार येत असतात. तरीपण अजिबात पूजा न करण्यापेक्षा अशी केली तरी चालेल. निदान काही क्षण तरी त्यातला आनंद मिळेल.

आता संत सांगत असतात, जो परमार्थ मार्गाला लागला त्याने देवाची मानसपूजा करावी. मानसपूजा भगवंताला फार आवडते. मानसपूजा म्हणजे मनानी कल्पनेमंध्ये केलेली पूजा. याचे तीन फायदे आहेत.

१) मानसपूजा करायची म्हणजे मूर्ती आपल्या डोळ्यासमोर सतत राहावी लागते.

२) आपल्याला हवे ते उपचार हवे तेवढे घेऊन पूजा करता येते. त्याला श्रम करावे लागत नाहीत. पैसा खर्च करावा लागत नाही.

३) मनाला एकाग्र होण्याची संवय होते. कारण उपास्य मूर्ती मन जर इकडे तिकडे गेले तर जाते ना! एकाग्रता वाढायला मदत होते व ही एकाग्रता आनंद तर देतेच पण इतर कोणत्याही ठिकाणी एकाग्रता होऊ शकते, सवय लागते.

मानसपूजा कशी करायची याबद्दल पुष्कळांच्या मनांत कुतूहल असते. आपले जे उपास्य दैवत असते किंवा एखादी मूर्ती आपल्या डोळ्यासमोर चटकन येत असेल ती मूर्ती अगर आपल्या गुरूंची मूर्ती अगर त्यांच्या पादुका काहीही पूजेकरता घेतले तरी चालेल. मात्र रोज तेच घ्यावे. विशेषतः लहान मुलांना गणपती, मारूती, कृष्ण वगैरे फार आवडतात.

ती मूर्ती आपल्या डोळ्यासमोर आणावी. उदा. पंढरीचा पांडुरंग घेतला तर स्वस्थ बसावे, नमन करावे व आपल्या डोळ्यासमोर पांडुरंग



आणावा. पायापासून डोक्यापर्यंत न्याहळीत जावे. त्याला सांगावे, 'पांडुरंगा! अरे आता मी तुला आंघोळ घालतो आहे, पहिले कपडे काढावे, दागदागिने, मुकुट काढावा. त्याचे अंगाला सुगंधी तेल लावावे. तेल लावताना बोलावे, 'भगवंता तू खूप दमतोस रे, किती कामे तुला असतात आणि दिवसभर अगदी उभा असतोस रे, पाय रगडताना त्याला म्हणावे, 'तुझे पाय फार दुखत असतील नाही'. जसं आपण आपल्या मुलांशी, प्रेमाच्या माणसाशी बोलतो तसे बोलावे. नंतर दूध (कोमट), दही, मध, तूप, साखर हे अंगाला लावावे. कल्पनेतील पूजा असल्याने घागरीच्या घागरी दूध-दही घेतले तरी कमी पडणारच नाही. मग गरम पाण्यानी आंघोळ घालावी. त्याचं अंग अगदी मऊ फडक्याने हळूहळू पुसावे. त्याला अत्तर लावावे, सर्व कपडे घालावे, दागिने घालावे. मुगुट घालावे. रोज निरनिराळे कपडे, दागिने घालावे. निरनिराळ्या फुलांचे हार घालावे. अगदी थंडीतसुद्धा उत्तम मोगऱ्याचा, सोनचाफ्याचा हार घालता येतो. अगदी कुठल्याही फुलांचा! कल्पना केली की हार तयार. मग समया, उदबत्त्या लावाव्या. निरांजने लावावी. तबकात ठेवावी. भगवंताची आरती करावी. देवाला नैवेद्य करावा. त्याला पाट चांदीचा मांडावा, ताट चांदीचे सुरेख घ्यावे, वाट्या पण चांदीच्या असाव्यात. लोटा भांडे चांदीचे ठेवावे आणि भगवंताला म्हणावे, 'पांडुरंगा आता चला ना जेवायला!' मग प्रत्येक पदार्थ त्याचे नांव तोंडाने उच्चारून वाढावा. देवा आज नारळाची चटणी केली आहे, फार तिखट नाही बरका! लिंबू आहेच. तुला काकडी आवडते म्हणून काकडीची कोशींबिर केली आहे. अरे! आणि आज पाच पक्वाने केली आहेत बर का! करंजी, लाडू, साखरभात, श्रीखंड, जिलेबी अगदी तुला हवे ते घे हं!' भात वरण वाढावे. भाज्या १-२ वाढाव्यात. आमटी, आलूची भाजी, भजी, तूप! मनाला येईल तो पदार्थ वाढावा. भगवंत जेवत आहेत अशी कल्पना करावी आणि तो आपल्यालाही घास भरवत आहेत, देत आहेत अशी कल्पना करून मजेत भोजन व्हावे. नंतर त्याच्या हातावर गरमपाणी घालावे. टॉवेल पुसायला द्यावा आणि गोविंदविडा अर्पण करावा. प्रेमाने त्याचेकडे पाहावे आणि शेवटी त्याला सांगावे, 'भगवंता, पांडुरंगा आता तुला बसायला जागा म्हणजे माझे हृदय बरका! माझ्या अंतरी अखंड तुझा वास व्हावा, मग मी हृदयांत तुला कधीही, केव्हाही, कुठेही पाहू शकेन.

ह्या पूजेचा आनंद फार असतो. हा आनंद सात्विक असतो. देवाला प्रेम हवे असते. ते यामुळे देता येते आणि आपल्या अंतरी भगवंत आहे ही अखंड जाणीव राहाते. ही पूजा करण्यास पहाटेची वेळ चांगली असते. शक्यतोवर एका जागी एकाच ठराविक वेळी पूजा करावी. नाहीच जमली तर केव्हाही करावी व आनंद लुटावा. प्रपंचामध्ये खूप धावपळ असते. जमेल तेव्हा हे साधावे. कोणत्याही वेळेला केली तरी चालेल. समर्थांनी दासबोधांत दास्य भक्तीचे निरूपण करताना, चवथ्या दशकांत, सातव्या समासांत म्हटले आहे की 'ऐसी हे सातवी भक्ति । निरोपिली यथा मति । प्रत्यक्ष न घडे तरी चित्ति । मानसपूजा करावी ।।२७।।'

ही मानसपूजा आपल्याला हवी तेवढी वाढविता येते व झटकन ही करू शकतो. प्रथम सुरूवात असेल तर थोडा वेळच करावी, उपचार थोडेच करावे. कारण मूर्ती डोळ्यासमोर जास्त वेळ राहात नाही. पण निराश होऊ नये. सवईने ती खूप वेळ राहू शकते, एवढेच नव्हे तर ती हालचालही करू शकते!

ही मानसपूजा लहान मुले अगदी ५ वर्षापासून चांगली करतात. ती निरागस असल्याने चटकन एकाग्र होतात. मात्र त्यांना पूजा कशी करावयाची ते सांगावे लागते. ही एकाग्रता अभ्यासातही उपयोगी पडते. तसंच आपल्या हृदयात भगवंत आहे ह्याची जाणीव होते. लहान मुले चांगली एकाग्र होतात असा अनुभव आहे. हा त्यांच्या मनावर चांगला संस्कार होतो.

*सौ. मंदाकिनी भास्कर सोमण*
*तुळशीबागवाले कॉलनी,*
*जालदा हौसिंग सोसायटी,*
*ब्लॉक नं. ९, पर्वती, पुणे-९.*

# लोकशाही आणि आजचा समाज

राजेश का. उंडे

भारत स्वतंत्र होऊन आज सुमारे ५० वर्षे होत आली. स्वातंत्र्याबरोबरच आपण लोकशाही राज्यपद्धती स्वीकारली. भारतीय समाजातल्या तळागाळातल्या आणि प्रत्येक नागरिकाचा सर्वांगीण विकास करणे हा लोकशाहीचा प्रमुख उद्देश. परंतु आज स्वातंत्र्यानंतर ५० वर्षांनीसुद्धा देशातील अनेक सुशिक्षित लोक बेरोजगार आहेत. कित्येकांना दोन्ही वेळच्या अन्नाची भ्रांत आहे. कित्येकांना राहण्यास चार भिंतींची वास्तू नाही. कित्येक शहरांत नागरिकांच्या वाहतूक, सांडपाणी इ. सारख्या अनेक समस्या आहेत. तुम्ही आम्ही निवडून दिलेली नेते मंडळी या गोष्टीकडे सोईस्करपणे काणाडोळा करतात. शेवटी याला जबाबदार कोण? हा प्रश्न न राहवून पुढे येतो. व्यवस्थित पणे विचार करता याला जबाबदार दुसरे तिसरे कोणी नसून आपणच आहोत, हे लक्षात येईल. किंबहुना हे कटू सत्य आहे. कारण लोकशाही प्रशासन प्रद्धतीत जनता ही सार्वभौम असते. किंवा लोकांनी लोकांच्या हितासाठी लोकांसाठी चालवलेले राज्य म्हणजे लोकशाही. ही लोकशाहीची व्याख्या सर्वश्रुत आहेच. परंतु त्याचा व्यापक अर्थ समाजावून घेण्याच्या फंदात आज तरी कोणी पडत नाही. आणि त्याचमुळे या अनेक समस्या भारतीय समाजात निर्माण झाल्या आहेत आणि आज प्रत्येक जण आमच्या या समस्या, त्या समस्या घेऊन पुढे येतो. मात्र त्यांची जबाबदारी तो खचितच टाळतो. लोकशाहीचा खरा अर्थ समजावून घेण्याची आजच्या घडीला खरी आवश्यकता आहे. किंबहुना आजच्या काळाची ती एक गरज होऊन बसलेली आहे.

लोकशाही राज्य पद्धती हा एक जीवनमार्ग आहे. किंबहुना एका कल्याणकारी जीवन पद्धतीचा शोध आहे. ज्यात दंडुकेशाहीचा शक्य तितका कमी वापर करून व्यक्तीच्या विचारांचा, प्रज्ञेचा त्याच्या स्वयंभू स्वयंस्फूर्त कृतीचा समन्वय साधला जातो. म्हणजेच व्यक्ती ही लोकशाहीचा केवळ महत्त्वाचा घटक नसून तो केंद्रबिंदू आहे आणि हाच बिंदू शिथिल, निष्काळजी बेजबाबदार असेल तर तो खऱ्या अर्थाने यशस्वी लोकशाही-समाजाची निर्मिती करू शकणार नाही. पर्यायाने देशाचा सोडा; परंतु स्वतःचाही विकास तो करू शकणार नाही. लोकशाही राज्यात राज्यासाठी व्यक्ती नसून व्यक्तीसाठी राज्य असते याची त्याला आज तरी जाणीव नाही.

लोकशाहीने आज आपणास अनेक मूलभूत हक्क आणि अधिकार दिलेले आहेत. उदा. जीविताचा हक्क, स्वातंत्र्याचा हक्क. व्यक्तीला त्याच्या स्वतःच्या जीवनाला न्यायालयीन सरंक्षण असते, स्वातंत्र्याच्या हक्कात व्यक्तीला विचारांचे स्वांतत्र्य असते, आपले विचार तो परखडपणे समाजात मांडू शकतो, व्यक्तीला राजकीय स्वातंत्र्य असते, यात सर्वात महत्त्वाचे म्हणजे व्यक्ती स्वतःच्या मनाने आपल्या नेत्यास निवडून देऊ शकते. मात्र त्यात त्याने आपल्या स्वातंत्र्याचा गैरवापर करू नये, हे अपेक्षित असते. तसेच व्यक्तीला लोकशाहीत आर्थिक स्वातंत्र्य असते आणि आर्थिक स्वातंत्र्यावरच बहुतांशी राजकीय स्वातंत्र्य अवलंबून असते. कोणताही आर्थिक गुलामगिरीत असलेला समाज आणि व्यक्ती आपले राजकीय स्वातंत्र्य अबाधित राखू शकत नाही. याचे अगदी जवळचे उदा. म्हणजे आजकाल पुढारी सर्रासपणे मते विकत घेतात. म्हणजे आर्थिकदृष्ट्या सबळ, आर्थिकदृष्ट्या दुर्बलांना सहजपणे नमवू शकतात. दिवसरात्र पैशासाठी कष्टणारा गरिब वर्ग कोणत्या तोंडाने अशी दारात आलेली लक्ष्मी नाकारेल? पण तेथे दोष त्याचा नसतो तर त्याच्या परिस्थितीचा असतो. सभोवतालच्या परिस्थितीने मनुष्य घडला जातो तो असा. परंतु अशा परिस्थितीचे ते गुलाम बनतात. परंतु जो परिस्थितीचा गुलाम न बनता शक्य तितके जो परिस्थितीलाच पालटविण्याचे सामर्थ्य अंगी बाणण्याचा प्रयत्न करतो, त्यालाच खरा पुरुषार्थ असतो. किंबहुना मनुष्याच्या जीवनाला यामुळेच अर्थ प्राप्त होतो. हेच अर्थपूर्ण जीवन, हाच पुरुषार्थ लोकशाहीत अभिप्रेत आहे. पण अजूनतरी भारतीय समाज याला प्रतिकूल आहे. त्याला लोकशिक्षणाची नितांत आवश्यकता आहे.

नागरी स्वातंत्र्याचाही व्यक्तीला लोकशाहीत अधिकार असतो. यात प्रामुख्याने वृत्तपत्र स्वातंत्र्य सभा व संघटना स्वातंत्र्य यांचा समावेश होतो. परंतु स्वातंत्र्य म्हणजे स्वैराचार नव्हे, तर या लोकशाही प्रशासनाच्या चौकटीत राहून व्यक्तीने स्वतःच्या व्यक्तिमत्त्व विकासाबरोबरच देशाचे एकंदरीत व्यक्तिमत्त्व विकसित करावे. हेच लोकशाहीत जनतेकडून अपेक्षित असते.

परंतु आजचा समाज पाहता असे खेदाने म्हणावे लागते, की लोकशाहीसारख्या कल्याणकारी राज्य पद्धतीचा स्वीकार करूनसुद्धा आज अनेक जण दुःखी आहेत आणि त्यांच्या दुःखाचे कारण तेच स्वतः आहेत ही खेदाची गोष्ट. या दुःखी मनांवर आजतरी एकच उपाय म्हणजे लोकशिक्षण. मुळात शिक्षण म्हणजे ज्या प्रक्रियेने व्यक्तीचे विचार प्रगल्भ होतात, बुद्धी चौकस होते, मनातला आत्मविश्वास जागा होतो आणि ज्ञानाचे संवर्धन होते ती प्रक्रिया म्हणजे शिक्षण. तर आपली समाजात, समाजाची देशात आणि देशाची जगात स्थिती काय आहे, न्याय-अन्याय म्हणजे काय याची तीव्रतेने जाणीव होणे म्हणजे लोकशिक्षण.

आज ४० ते ५०% भारतीय समाज निरक्षरतेच्या अंधारात

चाचपडत जगतोय. त्यात भर म्हणजे आजही त्यांच्यावर जात, पात, धर्म यांचा पगडा आहे. बहुसंख्य भारतीय समाज खेड्यात राहतो. स्वातंत्र्यानंतर आजपर्यंत या गोष्टींकडे दुर्लक्ष झाले आहे. किंबहुना याचा फायदाच काही राजकीय गोटातून घेतला जातो. म्हणूनच त्यांना केवळ शिक्षण देऊन सुशिक्षित करण्यानं हा प्रश्न सुटणार नाही. त्याबरोबर लोकशिक्षणाची आवश्यकता आहे. ते कुठल्याही शाळेत – शिक्षण संस्थेत घेता येत नाही. तरी ती आपणा सुशिक्षित नागरिकांची जबाबदारी आहे. श्री समर्थांनी म्हटलेच आहे.

आपणासी जे जे ठावे ते ते दुसऱ्यासी शिकवावे । शहाणे करून सोडावे । सकळ जन । आज नेतेमंडळींनी ही जबाबदारी घेतली (?) आहे असे दिसत असेल तरी ते या गरीब, अशिक्षित जनतेची दिशाभूल तर करीत नाहीत? अशी शंका वाटते म्हणूनच विशेषतः तरुणांनी आपली सामाजिक जबाबदारी आणि आपण समाजाचे काही निश्चितपणे देणे लागतो या भावनेने त्यांच्यात लोकजागृती घडवून आणणे हे महत्त्वाचे आहे. हेच तर कार्य गांधीजी, नेहरू आदी नेत्यांनी रामदास, तुकाराम, ज्ञानेश्वरादी संतांनी आणि विवेकानंदांसारख्या महंतांनी केले. केवढे विशाल स्वप्न होते त्यांचे, पण आज त्यांचे तुकडे झाल्यासारखे वाटतात.

परंतु ते स्वप्न आपल्या स्वयंभू आणि स्वयंस्फूर्त कृतीने पुन्हा सत्यात उतरवण्याचा महान प्रयत्न तरुणांनी करावयास हवा. प्रत्यक्ष कृती हवी. केवळ मनात इच्छा आणि भावना असून उपयोग नाही. सामाजिक भावना ही तीन प्रकारे व्यक्त करतात. शब्दांनी, अश्रूंनी आणि कृतीने. शब्दांनी सामाजिक भावना व्यक्त करणे हा सर्वात सुकर मार्ग झाला. परंतु भ्रष्टाचाराच्या, निरक्षरतेच्या अन् दारिद्र्याचा वादळात सापडलेल्या समाजात प्रबोधन घडवून आणण्याचे सामर्थ्य त्यात खचितच नाही.

अश्रूंनी आपली भावना व्यक्त करणे हा दुबळा मार्ग झाला. स्वतःच्याच हृदयातली आग ज्यांना विझवता येत नाही ते अश्रू समाजातला वणवा काय विझवणार? म्हणूनच आजतरी आपल्या समाजात प्रबोधन करण्याचा एकच मार्ग म्हणजे कृतीचा. ज्या मार्गात अडचणी जास्त आहेत, पण परिणाम मात्र खात्रीशीरपणे होतो. प्रचंड जनसागरात खळबळ घडवून आणण्याइतपत सामर्थ्य कृतीतच आहे.

याच मार्गाने तर गांधीजी, नेहरू, रामदास, तुकाराम आणि विवेकानंदांसारख्या विभूती गेल्या. त्याचमुळे आज तरी देहाने ते आपल्यात नसले तरी त्यांच्या विचारांनी आणि अजरामर कार्यांनी या विभूतींच्या स्मृती अजूनही आपल्या पटलावर आहेत. त्या गेल्या नाहीत आणि जाणारही नाहीत. त्यांची मार्गदर्शक जीवनमूल्ये आदर्श म्हणून जरी आपण घेतली तरी या परिस्थितीच्या भोवऱ्यात अडकलेल्या आणि मानवी नितिमूल्यांचा विसर पडलेल्या आणि पाणी आटलेल्या तळ्यासारखी स्थिती झालेल्या या समाजात कितीतरी प्रगती होईल यात तिळमात्र शंका नाही.

*राजेश का. उंडे,*
*८३, पंचवटी कॉलनी, तळेगाव दाभाडे, ४१० ५०६.*

# स्वामी कलकत्त्याचे, स्मारक कन्याकुमारीला!

शाम मदनराव भुर्के

निसर्गाने या जगामध्ये विविधता आणली आहे. जीवसृष्टी असलेल्या पृथ्वीवर आपल्याला जन्म मिळाला म्हणून आपण सारे भाग्यवान आहोत. "देव रंगारी-रंगारी त्रिभूवनाचा रंग करी, लक्ष ८४ चे ठसे वेगळाले केले कसे" या ठशापैकी एक म्हणजे मनुष्य प्राणी, आपले जीवन सुखद आणि आनंदी व्हावे म्हणून मानव विविध कला आणि शास्त्रे शिकू लागला. मग या गोष्टी तो आईकडून शिकला असेल, वडिलांकडून शिकला असेल किंवा गुरुंकडून शिकला असेल. त्यांच्याप्रति आदरभाव व्यक्त करताना तो म्हणतो मातृदेवोभव, पितृदेवोभव, आचार्यदेवोभव, अतिथीदेवोभव अशा भावनेने शिकलेल्या लोकांचा समुह म्हणजे "समाज" आणि या समाजाचे बनते ते एक राष्ट्र, त्या राष्ट्राला असतो एक मानाने डोलणारा ध्वज. त्या राष्ट्रातील एकता टिकविणारी सर्व जनतेची मने म्हणजे राष्ट्रीय एकात्मता.

मला या संदर्भात एक गोष्ट आठवते. एकदा एका घरामध्ये एक लहान मुलग खेळत होता, खेळता खेळता, त्याच्याहाती भारताचा नकाशा लागला. त्याला कल्पना नव्हती की हा आपल्या महान देशाचा नकाशा आहे. त्याच्या हातून तो नकाशा फाटला. त्याचे तुकडे झाले. जवळच असलेल्या वडिलांच्या लक्षात ही गोष्ट आली तेव्हा ते त्याच्यावर फार रागावले. ते म्हणाले, "अरे, भारताचा नकाशा फाडलास तुला काही कळते का नाही? आता तो होता तसा करून दे." असे म्हणून ते पुन्हा वर्तमानपत्र वाचत बसले. थोड्याच वेळात मुलगा मुळूमुळू रडतच त्यांच्याकडे आला आणि म्हणाला, "बाबा हे पहा, मी कागद जुळवलाय. तुम्ही म्हणालात म्हणून होता तसा केलाय." बाबांनी पाहिले तर खरोखरच भारताचा नकाशा बरोबर जुळवला होता. एवढ्या लहानमुलाने नकाशा कसा काय जुळवला याचे त्यांना आश्चर्य वाटले. त्यांनी मुलाला विचारले, बाळा हे तुला कसे रे जमले?" त्यावर मुलगा म्हणाला, "बाबा, मला भारताचा नकाशा जमला का नाही ते माहित नाही पण या नकाशाच्या मागे एक माणसाचं चित्र होतं आणि माणसाला कुठे डोकं असतं, कुठे हात असतात, कुठे पाय असतात हे मला माहिती होतं. मी ते सारे जागच्या जागी ठेवले आणि माणूस जमवला." वडिलांनी पाहिले की अरेच्चा माणूस जुळला गेला तर देशही जुळतो. तो एकसंध राहतो. त्याची अखंडता कायम राहाते. माणसानं जमवून घेणं म्हणजे प्रत्येकानं दुसऱ्यांबद्दल आदरभाव दाखवणं प्रेम व्यक्त करणे. आपल्या देशात विविध भाषा बोलल्या जातात. मुळात कोणतीही भाषा ही चांगलीच असते. ती बोलणाऱ्या माणसानं तिचा वापर प्रेम व सहकार्य यासाठी केला म्हणजे झाले. आपल्या देशाला सर्वसामान्य एक भाषा हवी म्हणून आपण हिंदीला राजभाषेचा दर्जा दिला आहे. सर्वांनी हिंदीभाषेबद्दलचं प्रेम वृद्धिंगत करून तिचा जास्तीत जास्त उपयोग केला तर ते भारतीय एकात्मतेला पोषकच होणार आहे. आपल्या देशात विविध चालीरिती आहेत, विविध राज्यांची खास अशी वेशभूषा आहे. अशा विविधतेने नटलेला असा भारत माझा देश आहे. म्हणून म्हटलं जातं, भिन्नता मे एकता यह भारत की विशेषता. Unity in diversity is the peculiarity in India. काही वर्षांपूर्वी मी आंतरराज्य छात्रजीवन दर्शन या कार्यक्रमाअंतर्गत अरुणाचल प्रदेश येथील एका कुटुंबात राहिलो होतो. या कार्यक्रमानुसार महाराष्ट्रातील विद्यार्थी अरुणाचल प्रदेशातील कुटुंबात राहिले होते तर पुढे काही दिवसांनी तेथील विद्यार्थी महाराष्ट्रातील कुटुंबात राहिले. मी तिथे राहिलो ते त्यांच्या घरातील एक घटक असल्याप्रमाणे. बोमदिला या गावी मी राहिलो होतो. तिथून आणि काही उंचीवरील प्रदेशामध्ये आम्ही गेलो होतो. १३,००० फूटावरील एका झोपडीवजा शाळेला आम्ही भेट दिली. कडाक्याची थंडी होती. वर्गामध्येसुद्धा धूकं पसरलं होतं आणि त्यातील छोट्या-छोट्या मुलांनी पाहुणे आले म्हणून एकदम उठून जयजयकार केला, "जयहिंद". त्यांनी जणगणमन हे राष्ट्रगीतही गाऊन दाखविले. तेव्हा माझ्या ध्यानात आले की अरुणाचल सारख्या दूरच्या प्रदेशातही आपल्या भारत देशाबद्दलचे प्रेम ओसंडून वाहत आहे. तेथील लोकांनी केलेले अगत्य, दाखविलेला जिव्हाळा यामुळे निरोप घेताना पाऊले जड झाली होती पण मनामध्ये एक गोष्ट रुजली की, सोलापूर हो या गुवाहाट्टी अपना देश अपनी मिट्टी. त्यानंतर अरुणाचल प्रदेश मधली कोणतीही बातमी वृत्तपत्रात आली तरी मी आपुलकीच्या भावनेने वाचू लागलो. आजही मला तेथून पत्रे, भेटकार्डे येतात. त्यामुळेच इतक्या दूरच्या प्रांताबद्दलही जवळीक निर्माण झाली. भारतीय एकात्मता केवळ शब्दामध्ये न राहता त्याची मनोमनी प्रचीती आली.

काही वर्षांपूर्वी मी व माझी पत्नी हिमालयामध्ये गिर्यारोहणासाठी गेलो होतो. यालाच इंग्रजीमध्ये ट्रेकिंग असे म्हणतात. दिल्लीहून बसने रायसन या बेसकॅंपवर पोहोचलो. रायसन हे कुलू आणि मनाली यांच्यामध्ये बियासनदीच्या काठी वसलेले आहे. रोज सुमारे २० कि. मी. चालून ११ दिवसात हिमालय ही काय चीज आहे हे जवळून पाहिले. आमची ६० जणांची तुकडी होती. भारतामधील विविधप्रांतातील गिर्यारोहक आलेले होते. ते एकमेकांमध्ये त्यांचे राहणीमान, सण,

पोषाख, चाली-रिती, सामाजिक जीवन याबद्दल माहिती सांगत. त्यामुळे प्रत्येकाला अन्यप्रांत आपलेसे वाटत. रात्री कँमफायरचा कार्यक्रम होई. त्यामध्ये विविध मनोरंजनाचे कार्यक्रम होत. वेगवेगळ्या भाषांमधली गाणी ऐकायला मिळत. मनामध्ये विचार येत, किती प्रांतातले हे लोक किती तरी जातीचे धर्माचे पण आपण सारे भारतीयच आहोत. "सारे जहाँ से अच्छा, हिंदोस्ता हमारा". या गिर्यारोहणामध्ये सर्वाधिक उंचीवर गेलो तो होता चंद्रखाणी पास. जवळजवळ संपूर्ण दिवस त्यादिवशी बर्फातूनच चाललो. बर्फाच्या उतरंडीवर घसरगुंडी खेळलो. हिमाचल प्रदेशमधील गिर्यारोहणातील मार्गदर्शक आम्हाला बर्फातून चालायचे कसे, इजा न होता घसरायचे कसे याचे शिक्षण देत होते. हिमाचल प्रदेश सारख्या दुर्दम्य भागातील मार्गदर्शक आपल्याच देशातील अन्य प्रांतातील भारतीय बंधुभावाने एकत्रित होतात; बंधुना मदतीचा हात देत होता. दृश्य फारच मनोहारी होते. भारत मातेचे आदरणीय असे शीर म्हणजे महाकाय व तितकाच मनोहारी हिमालय. तिथे विविध प्रांतातील सहजीवनाचा आंनद घेतात, हीच भारतीय एकात्मता. याच सफरीमध्ये आम्ही हिमालयातील मनीकरण हे ठिकाण पाहिले. मनीकरण म्हणजे कानातील मणी. पार्वतीच्या कानातील मणी पडल्यावर तिने तो शंकराला शोधून आणण्याची विनंती केली. शंकाराला मणी काही सापडेना. तेव्हा त्याने रागाने तिसरा डोळा उघडला. त्यामुळे हिमालयासारख्या बर्फाच्छदीत भागातही गरम पाण्याचे झरे या ठिकाणी आढळतात. गरम पाण्याच्या कुंडामध्ये आम्ही स्नान केले आणि बाहेर पडलो. तो जवळच शिखांचे लंगर होते. लंगर म्हणजे या ठिकाणी प्रसादाची सोय असते. सर्व जाती धर्माच्या लोकांना येथे प्रवेश असतो. शिख लोकही, गरीब असो श्रीमंत असो लंगरमध्ये आवडीने सेवा कार्य करतात.

तामिळनाडूमधील गिर्यारोहक गुजराती, महराष्ट्रीयन, ओरिसा इ. गिर्यारोहकांबरोबर हिमाचल प्रदेशामधील लंगर मध्ये जेवायला बसला होता. शिख बांधव साऱ्यांना प्रेमाने वाढत होते. हे भावपूर्ण वातावरण म्हणजे आम्ही विविध प्रांतातील लेकरे ही भारतमातेचीच आहोत हेच दाखवून देत होती.

मनीकरणमध्येच एक राममंदिरही होते. तियेही विविध धर्माचे लोकांना प्रसाद मिळत होता. आपण भारतामध्ये जेवढा भाग फिरून पाहू त्याबद्दल आपल्या मनात प्रेम निर्माण होते आणि हा सारा भाग माझ्या देशातला आहे याची जाणीव होते.

स्वामी विवेकांनदांचे जीवनकार्य म्हणजे भारतीय एकात्मतेचे मूर्तिमंत उदाहरण. नरेंद्र नांवाचा बंगालमधील विद्यार्थी देशासाठी काही करावे या भावनेने अस्वस्थ झाला होता. माझा देश आहे तरी काय, येथील जनता राहते कशी ते प्रत्यक्ष पाहावे, त्यांना जाणून घ्यावं म्हणून त्यांनी पदभ्रमण यात्रा सुरू केली. बंगालमधून निघून बिहार, हि. प्रदेश, दिल्ली, उ. प्रदेश, गुजरात, मध्यप्रदेश, महाराष्ट्र, कर्नाटक, केरळ, तामिळनाडू एवढा प्रांत ते पायी हिंडले. विविध भाषांची चालीरितींची वेषभूषांची माणसे त्यांनी पाहिली. चालत्या बोलत्या भारताचं त्यांनी दर्शन घेतले. ते दर्शन घेतच ते कन्याकुमारीला पोहोचले. तेथे तीन दिवस ध्यानस्थ बसून त्यांनी भारत मातेच्या उद्धाराचा विचार केला. त्यांनी केलेले हे राष्ट्रीय एकात्मतेचे कार्य संपूर्ण भारतवासीयांना प्रेरणादायी व्हावे म्हणून त्याच शिलेवर विवेकांनद स्मारक उभे करण्यात आले. या स्मारकाच्या निधीसाठी आपले माजी पंतप्रधान पं. जवाहरलाल नेहरू यांनी भारतातील सर्व राज्यांना आवाहन केले. कोट्यावधी जनतेने प्रत्येकी रुपया देणगी देऊन या स्मारकास मौलाचा हातभार लावला. बंगालमधील एका सत्पुरुषाचे तामिळनाडू येथील कन्याकुमारीमध्ये भारतातील सर्व राज्यांच्या सहकार्याने स्मारक उभे राहिले हे खरे भारतीय एकात्मतेचे प्रतीक. या स्मारकाच्या महिरपीमध्ये विविध राज्यातील नानाविध प्रकारच्या वाद्यांच्या प्रतीमा दर्शविल्या आहेत.

वाद्य म्हणजे आनंदाचे प्रतीक. मिले सुर मेरा तुम्हारा तो सुर बने हमारा, असे सुर उमटवणारे माध्यम. विविध राज्यातील ही भावना एकत्र दाखवल्यावर भारतीय एकात्मता ही अधिक दृढमूल झालेलीच दिसते. अशी स्मारक पाहायची ती या देशातील सर्व बांधवांवर प्रेम करण्याची शक्ती जोपासण्यासाठीच. त्यातून अनुभवायचं, "अलग भाषा अलग वेष फिरभी अपना एक देश".


*शाम मदनराव भुर्के*
*रिजनल मॅनेजर, बँक ऑफ महाराष्ट्र*
*सोलापूर*


---

# एक दिस असेच घडावे

*देणाऱ्याने देतच जावे*
*घेणाऱ्याने घेतच जावे*
*एक दिस असेच घडावे*
*देणाऱ्याचे हातच घ्यावे ।*
*दिपे दीप प्रज्वलित करावे*
*आसमंत उजळून भरावे*
*एक दिस असेच घडावे*
*मीच दीप होऊन जळावे ।*
*पुष्पाने त्या गंधीत व्हावे*
*भावपुष्प प्रभुपदी अर्पावे*
*एक दिस असेच घडावे*
*पुष्पच व्हावे सुगंध उधळीत फुलवीत जावे ।*
*रामनाम ओठात धरावे*
*हृदयातही त्याला वसवावे*
*एक दिस असेच घडावे*
*आत्मारामी विलीन व्हावे ।*

श्रीराम

**वेणू**